महाराष्ट्र-कुटुंब-माला


निर्माल्य-( माझ्या गोष्टी भाग २ रा. )

संपादक व लेखक-नारायण विनायक कुलकर्णी

प्रकाशक-विठ्ठल रामचंद्र खाडिलकर

३९१, नारायण, पुणें.

---

आर्टिस्ट

श्री. बाळकृष्ण राजे पुणें

मुद्रक

टेक्स्ट-१ ते ६४ पृष्ठें

श्री. गणेश काशिनाथ गोखले

गणेश प्रिंटिंग प्रेस-शनिवार पेठ, पुणें.

टेक्स्ट-६५ ते २०० व बाकी सर्व पृष्ठें

श्री. कृ. ह. सहस्रबुद्धे

प्रोप्रायटर-श्रीज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.

---

मुंबईचे प्रमुख एजंट-

मेसर्स - परचुरे, पुराणिक आणि मंडळी

माधवबाग-मुंबई ४

प्रमुख प्रचारक—वि. बा. मोडक

कोल्हापूर, शाहूपुरी.

# "माले"च्या प्रचारकार्याचा
# अहवाल

" **महाराष्ट्र–कुटुंब–माला** " व्यवस्थित व नियमितपणानें चालवितां येण्यासाठीं छोटीशी योजना तयार केली व त्याप्रमाणें १९३७ च्या आगस्टमध्यें प्रत्यक्ष कामाला आरंभ केला.

आरंभ आगस्टमध्यें कोल्हापुरापासून केला. कोल्हापूर, बावडा, बेळगांव, धारवाड, गदग या भागांत मालेचे संपादक श्री. नारायण राव कुलकर्णी यांनीं आपल्या मित्रमंडळींच्या सहाय्यानें प्रचारकार्य केलें; तेव्हां जी रक्कम मिळाली तींतून " **ती कोणाची ?** " हें मालेचें २२ वें पुष्प प्रसिद्ध केलें.

नंतर डिसेंबर १९३७ च्या सुरवातीस कोंकण प्रांतांत प्रचारास जावयाचें श्री. नारायणरावांनीं ठरविलें; परंतु त्यांना आजाराने गांठल्यानें, महिना-दीडमहिना व्यर्थ गेला. त्यामुळें २३ व्या पुष्पाचें प्रकाशन ठरल्या मुदतींत करणें अशक्य झालें.

जानेवारी ता. १५ ला मी व श्री. कुलकर्णी मुंबईस गेलों. मुंबई व नाशिक या ठिकाणीं आम्हांला डॉ. **अ. ना. भालेराव,** L. C. P. S. **कु. पिरोज आनंदकर,** B. A., B. T., T. D, श्री. **वि. गो. फाटक,** B. A. सेक्रेटरी, मराठी ग्रंथसंग्रहालय मुंबई; वाङ्मयप्रभु श्री. **खंडेराव त्रिलोकेकर,** सं. ' प्रमोद ' यांनीं व श्री. **वा. श्री. पुरोहित** B. A, श्री. **पी. बी. औरंगाबादकर,** प्रभृतींनीं तनु-मनानें आपुलकीचें सहाय्य दिलें.

मुंबई-नाशिक येथें जी रक्कम मिळाली, तींतूनच आजचें २३ वें पुष्प–" **निर्माल्य**–माझ्या गोष्टी भाग २ " हें प्रसिद्ध करतां येत आहे.

ठिकठिकाणीं ' माले'च्या योजनेचा पुरस्कार चांगला होत असल्याचें आढळून आलें. हितचिंतक मित्रमंडळीही मिळाली. त्यांच्या सहाय्यानें आतांपर्यंत जे आश्रयदाते मिळाले, त्यांचीं नांवें सन्मानपूर्वक ' **ती कोणाची ?** ' व ' **निर्माल्य** ' पुस्तकांतही आनंदानें नमूद केलीं

आहेत ! ज्या ज्या थोर मंडळींनीं प्रेमपूर्वक अनेक प्रकारांनीं सहाय्य दिलें त्यांचे उपकार मानणें पवित्र कर्तव्यच आहे ! आमची योजना संकल्पाप्रमाणें सिद्धीस जाईल व आमची ' माला ' ही चांगली नांवारूपास लौकर येईल अशी खात्री वाटूं लागली आहे !

' योजने'चा पुरस्कार केला जातो व सहाय्य मिळतें हें खरें; पण कार्य अतीशय मंद गतीनें होतें. पण त्याला इलाज नाहीं.

योजनेचा प्रचार करण्यास मुबलक वेळ मिळाला पाहिजे, म्हणून या वेळीं श्री. नारायणरावांना नवीन पुस्तक लिहावयाला न लावतां, त्यांच्या गोष्टींचा संग्रह काढण्याची कल्पना निश्चित करावी लागली. या संग्रहांतील सर्वच गोष्टी वाचकांस आवडतील अशी आशा आहे. तरीही ग्रामीण कथा लिहिण्यांत श्री. कुलकर्णी याचा हातखंडा आहे, हें सुप्रसिद्धच आहे. त्यांच्या अशा कथांपैकीं **निर्माल्य, खाशाबा, प्रीतीचें देऊळ, पोलिसी पाहुणचार अस्पृश्योद्धार, वजिऱ्या, 'मोत्या'ला गोळी घातली** इत्यादि आम्हीं प्रस्तुत संग्रहांत कांहीं कथा मुद्दाम दिल्या आहेत; त्या सर्व वाचकांस विशेषच आनंदित करतील असा आम्हांला पूर्ण भरवंसा आहे

या संग्रहांत एकंदर १३ गोष्टी दिल्या आहेत. याकरितां सदर 'पुष्पास' " **त्रयोदशगुणी विडा** " असेंसुद्धां आकर्षक व चटकदार नांव देतां आलें असतें; परंतु "**निर्माल्य**" हें नांव त्या नांवाइतकें चटकदार असो नसो; पण जास्त अन्वर्थक व उचित आहे; हें कोणीही समंजस मान्य करील ! असो.

यानंतरचें 'मालें'तील पुष्प—श्री. नारायणराव कुलकर्णी यांनीं लिहिलेली कादंबरी "**ग्रहणापूर्वी सुटका !**—" असून, पुढील वर्षांत, कु. पिरोज आनंदकर, प्रो. वा. म. जोशी, श्री. वा. श्री. पुरोहित, कु. कुमुदिनी प्रभावळकर, इत्यादि प्रथितयश लेखक—लेखिकांनीं लिहिलेल्या कादंबऱ्या 'माले'ला मिळणार आहेत. हें आनंददायक वर्तमान आजच सांगण्यास हरकत नाहीं !

' ती कोणाची ?' या पुस्तकावर, नवाकाळ, विविधवृत्त, विहार, प्राविण्य, विद्याविलास, सत्यवादी, निर्भीड, ज्योत्स्ना, मन्वंतर, इत्यादींनीं

तत्परतेनें आपापले अभिप्राय व्यक्त करून 'महाराष्ट्र-कुटुंब-माले'च्या कार्यास यथायोग्य प्रसिद्धी दिल्याबद्दल आभारी आहोंत.

'माले'च्या योजने'सही नवाकाळ, नवा मनु, प्राविण्य, प्रमोद, निर्भीड, इत्यादींनीं स्वतंत्रपणें व आनंदानें प्रसिद्धी दिली आहे. त्याकरितां त्यांचे त्यांचे स्वतंत्र आभार मानणें अगत्याचें आहे.

"निर्माल्या"चे पहिले चार फॉर्म आमचे परममित्र श्री. गणेश काशिनाथ गोखले, मालक, गणेश प्रिं.वर्क्स, पुणें यांनीं-आनंदानें दिले व 'माले'च्या कार्यास सहाय्य केलें याबद्दल माला त्यांची नेहमींच ऋणाईत आहे.

आमच्या झालेल्या प्रचाराचा अहवाल वर दिला आहेच. या नंतर आम्हीं पुढील दोन महिने-कोंकण, मुंबई-इत्यादि ठिकाणीं हिंड णार आहोंत. त्या त्या भागांतील 'माले'वर प्रेम ठेवणाऱ्या मित्रांनीं अगत्यपूर्वक सहाय्य करावें व 'माले'ला ग्राहक मिळवून द्यावेत, अशी त्यांना प्रेमाची पण आग्रहाची विनंती आहे!

२९१, नारायण पेठ, पुणें
ता० ७ मार्च १९३७

आपला नम्र,

विठ्ठल रामचंद्र खाडिलकर

# ❀ निर्माल्य ❀





———

# १

# नाटकवाला !

" कोण ? काय पाहिजे आपल्याला ? कोणाकडे आलांत ? "

" जागा भाड्यानें पाहिजे आहे. बाहेर **To let** पाटी लागली आहे म्हणून आंत आलों. जागा पहावयाला मिळेल का ? "

" ठीक आहे, आहे जागा. आपल्याला किती हवी आहे ? या, आपल्याला जागा दाखवितों. आपण कायम भाडेकरी आहांत का ? "

" नाहीं. फार तर तीन महिनेपर्यंतच ! "

" मग त्या मानानें आपल्याला भाडेंही जास्त पडेल. हो, अगोदर सांगून ठेवतों. कायम बिऱ्हाडकरूंची गोष्ट वेगळी, दुसऱ्या भाडेकरूंची निराळी ! खरें आहे ना माझें म्हणणें ? "

" ठीक आहे ! कांहीं हरकत नाहीं ! "

" आपण काय सरकारी नोकर आहांत? कोणत्या खात्यांत? हं, इथून भाड्याची जागा द्यायची. ती पहा पश्चिमेची जागा रिकामी आहे. वारा फार छान येतो. तिकडे पाण्याचे नळ आहेत. पलीकडे आड आहे. फ्लशिंगचे संडास आहेत. गैरसोय कोणती नाहीं. आमचा त्रास भाडेकरूंना पोंचायचा नाहीं. भाडेकरूंचा आम्हांस नाहीं. लहान मुलांना मोकळ्या अंगानें खेळायला पैस आंगण आहे. उन्हाचाही त्रास नाहीं. अंगणांत झाडांची चांगली सांवली आहे—पहा, जागा पसंत करा—रजेवर आलां आहांत कीं कांहीं तपासणीसाठीं?"

" छेः छेः तसं कांहीं नाहीं. **नटवर नाटक मंडळींतील** मी एक नट आहें. आमची नाटक मंडळी इथें आली असून तिचा तीन महिने मुक्काम आहे. मला स्वतंत्र जागा हवी आहे म्हणून पहात आहें. आपली जागा मला पसंत आहे!"

"काय! आपण-तुम्हीं नट आहांत? नाटकांत आहांत. माझी जागा आपल्याला भाड्यानें मिळणार नाहीं! साफ सांगतों. **नाटकी** आहांत हें अगोदर सांगितलं असतं तर जागा दाखविण्याचे घेतले हे श्रमही घेतले नसते! चला, जा. नाटकी लोकांकरितां आमची जागा नाहीं!"

असें म्हणत मालक मोहरा फिरवून आणि जागच्या जागीं उभे राहून एकसारखे ताड्ताड् बोलूं लागले! नाटकांतला आहें, इतकें कळण्याचा अवकाश! क्षणापूर्वीचा मालकांचा आवाज, चर्या, अवतार, भाषा, विनय, उत्सुकता, वगैरे चट्सारीं एकदम बदललीं! प्रथम आवाज अदबीचा होता तो उर्मटपणाचा झाला, चर्या आनंदीत होती ती क्रोधपूर्ण बनली, अवतार साधाभोळासा दिसला तो रुद्रावतारसा

झाला, विनय विलयाला गेला, उत्सुकतेची जागा तिरस्कारानें बळकावली ! इतका चमत्कार क्षणमात्रांत एका **नाटकी** या कल्पनेनें केला !

मी बाबुरावांच्या—त्या नटवर्यांच्या बरोबर—होतोंच. मालकमजकुरांच्या ठिकाणचा झालेला फरक पाहून मी आश्चर्यानें थक्कच झालों. त्यांच्या तोंडचा पट्टा चाललेला ऐकून मी अगदीं हतबुद्ध झालों व आळीपाळीनें त्या घरमालकांकडे आणि बाबुरावांकडे टकमकां पहातच राहिलों. मालकमजकुरांच्या तोंडाचा पट्टा चालू होता. बाबुराव शक्य तितका शांत दिसत होता. तो आपल्याकडून कांहीं खुलासा करण्याचा प्रयत्न करीत होता, पण मालक अजूनही बाबुरावाच्या प्रयत्नाला यश येऊं देत नव्हते. त्या घराच्या बाहेर केव्हां एकदां पडेन असें मला झालें होतें. **नाटकवाला** म्हणतांच त्या घरमालकाला नाकाला मिरच्या झोंबल्याप्रमाणें कां व्हावें याचा उलगडा माझ्या मनाला करतां येईना. त्या मालकाच्या बोलण्याचा, वर्तनाचा मला अत्यंत संताप आला होता; वाटलें कीं ताड्दिशीं त्याचें श्रीमुख रंगवावें. माझ्यापेक्षां खरें म्हटलें तर बाबुरावाला किती तरी पटीनें राग यायला पाहिजे होता, अद्वातद्वा बडबडणाऱ्या त्या एका तोंडाचीं दोन तोंडें त्यानेंच केव्हांना करायला पाहिजे होतीं. पण बाबुराव अजूनही शांत होता. त्याचेंच आतां मला नवल वाटावयाला लागलें.

बाबुरावाचा मी हात धरला आणि त्याला बाहेर खेचूं लागलों; घरमालक आपल्याला बोलूंच देत नाहीं ही खात्री झाल्यासारखी होऊन तोही बाहेर पडण्याकरितां वळला, तोंच बाहेरचा गलबला ऐकून घरांतून दोन बायका बाहेर आल्या. त्यांनीं कोण आहे ? काय चाललंय् ?

म्हणून पृच्छा केली. उत्तर देणें शिष्टाचाराला धरूनच होतें म्हणून बाबुराव वळून म्हणाला, " भाड्यानें जागा पाहिजे होती. घराला बाहेर पाटी दिसली म्हणून आंत येऊन चौकशी केली. मालक पहिल्यादां देतों म्हणाले, आतां नाहीं म्हणताहेत— "

" होय, काय झालं जागा नाहीं म्हणायला यांना ? " बाबुरावांचें ऐकून घेऊन नंतर एक बाई घरमालकांना उद्देशून म्हणाली.

" आमची जागा **नाटकवाल्यांकरितां** नाहीं ! हे नाटकवाले आहेत आणि—"

" मग ! असतील नाटकवाले ! पण त्यांना जागा द्यायला काय हरकत आहे ? " मालकाच्या दुसरेपणाच्या तरुण बायकोनेंच विचारलें.

" त्यांना जागा द्यायला काय हरकत आहे ! " तोंड वेंगाडून त्या बाईचेंच वाक्य मालकानें म्हटलें आणि पुढें म्हटलें, "तुमच्याइतका मी गाढव नाहीं नाटकवाल्यांचा शेजार पत्करायला ! तुम्हां बायकांना काय नाटकवाला म्हटला कीं हवासा वाटायचाच ! तो गोडबोल्या असतो, शेजारी झाला म्हणजे फुकट नाटकाला नेतो; तुम्हां बायकांना तें पाहिजेच असतें! बायकांची जात म्हणजे हुरळली मेंढी, लागली लांडग्याच्या पाठीमागें ! आणि नाटकवाल्यांना त्यांच्याशिवाय दुसरं काय पाहिजे ? नाटकाच्या फुकट पासावर नाटकी लोक बायका भुलवीत असतात आणि बायकाही भुलतात ! हे नाटकी म्हणजे पुरे लफंगे, बदमाष, दारुडे, व्यसनी, छंदीफंदी, हलकट, पाजी—"

" Stop ! hold up your tongue " त्या माणसाचे पाजी प्रलाप सहन न होऊन मी एकदम मध्येंच ओरडलों! "असें बेजबाबदार

काय बडबडतां ? जागा द्यायची नसेल तर देऊं नका ! डोक्यावर घेऊन बसा ! पण बडबडतां काय असे ? बाबुराव, चल बाहेर ! ऐकत काय राहिला आहेस ! या राजेश्रींना नाटकवाले म्हणजे माणसं नव्हेतच असंच वाटतंय् ! चल, हीच जागा तुला काय दूध देते ! छप्पन जागा तुला मिळतील. काढ पाय येथून ! "

मालकाची बडबड चालूंच होती. बाहेर आलेल्या बायका जागच्या-जागीं थिजल्या होत्या. बाबुरावांच्या मनांतून त्या घरमाकांस ' मी नाटकवाला असलों तरी मला बायको आहे, मुलं आहेत, आई बहिणी आहेत; गृहस्थपणाची जबाबदारी मला कळते, तेव्हां जागा द्यायची नसेल तर नका देऊं. पण असें वेडेंवाकडें बोलूं नका, आणि सर्रास मत ठोकून देऊं नका ' असें सरळ सांगावें आणि मग बाहेर पडावें, असें होतें. पण आंतां तसें सुनावण्यांत तरी काय विशेष अर्थ होता ? म्हणून मी त्याला बोलूं दिलें नाहीं; तोही हट्टाला पेटला नाहीं. आम्ही त्या घराच्या बाहेर मुकाट्यानें पाय काढला. पश्चात् त्या म्हाताऱ्या घरमालकाची आपल्या बायकोशीं एकसारखी वटवट चालूं होती, ती किती वेळ चालली होती कुणास माहीत !

— २ —

त्या घराच्या बाहेर पडल्यावर किती तरी वेळ बाबुराव व मी अगदीं मुकाट्यानें चाललों होतों. कुठें चाललों होतों कोण जाणे ! माझें तर लक्ष रस्त्याच्या दोन्ही बाजूंच्या घराकडे "To let" कुठें आहे काय

याकडे मुळींच नव्हतें ! बाबुरावांचें असल्यास नकळे ! माझ्या मनांत अनेक विचाराविचारांचा नुसता गोंधळ उडून राहिला होता ! **नटवर नाटक मंडळी** सारखी सर्वश्रेष्ठ गुणी नाटक मंडळी त्यांतला लोकप्रिय उच्च दर्जाच्या भूमिका करणारा बाबूराव बर्व्यांसारखा गुणी नट आणि त्याला एकाद्या घरमालकाकडून अशीं उणीं उत्तरें ऐकावीं लागावीं, याचा अर्थ काय ? आमच्या सामजांत कलेचें चीज नाहीं, नटांना मान नाहीं, नाटकधंद्याला प्रतिष्ठा नाहीं, हें कसें ? काय, नाटकधंदा करणें, कलेची सेवा करणें, त्या कलेवर प्रामाणिकपणानें पोट भरणें गुन्हा आहे ? पाप आहे ? गुणवंताला मान देणें, जवळ करणें, शेजार स्वीकारणें, हें सामाजिक दृष्ट्या भयंकर कृत्य आहे ? काय, आहे तरी काय ? बाबुरावांच्या गुणावर लुब्ध होऊन मी त्यांच्याशीं स्नेह संपादन केला ही काय चूक केली ? त्यामुळें मला समाजांत कांहीं कमीपणा आला कीं काय ? गुणवंताला—कलावानाला जो समाज जवळ करीत नाहीं, त्याची चहा करीत नाहीं, तो कसला समाज ? इत्यादि विचारांनीं जर माझें माथें इतकें भडकून गेलें होतें, तर बाबुरावांच्या डोक्याचें काय झालें असेल ? त्याला काय वाटत असेल ! चालतां चालतां सहज मी त्याच्याकडे पाहिलें. तो गंभीरही दिसला नाहीं, हंसराही वाटला नाहीं, चिडलेलाही आढळला नाहीं. माझ्याच मनाचें मी त्याच्यावर प्रतिबिंब पाडलें तर मला त्या तीनही विकारांचें मिश्रण मात्र आढळलें. मी त्याच्याकडे पाहिलें, त्यानें माझ्याकडे पाहिलें. तो किंचित् गालांतल्या गालांत हंसला आणि म्हणाला, " कां रे, आतांची गोष्ट तूं आपल्या मनाला जास्तच लावून घेतलीस वाटतें ! "

" होयच नाहीं तरी ! मी या वेळीं संभावीत–पाजी समाजाबद्दलच विचार करीत होतों ! "

" छेः छे ! समाजाबद्दल असे आततायीपणानें अनुदार उद्गार काढूं नकोस ! तूं या गोष्टीवर इतका संतापलास ! "

" आणि तुला कांहींच वाटलें नाहीं वाटतें ! "

" कांहीं नाहीं विशेष ! अरे, मी या धंद्यांत पडल्यापासून मला असल्या गोष्टींचा चांगला सराव झाला आहे. दर मुक्कामाला अशा ना तशा, कशा किती तरी गमती घडत असतात, आणि या गंमती आमच्या आंगवळणीं पडल्या आहेत ! "

" या काय गंमती ! वाः ! तूं तरी मोठा हाच आहेस ! जो समाज तुम्हांला इतका तुच्छ लेखतो—"

" पण मी विचारतों, समाजानें नाटकवाल्यांना कां तुच्छ लेखूं नये!"

" कां तुच्छ लेखावें ! "

" हं, असं विचार ! सांगतों. आमचा नाटकधंदा म्हणजे खरोखरच स्वतःला उल्लू करणारा आणि दुसऱ्याला उल्लू बनविणारा आहे. या धंद्यांत कलेकरितां केवळ खपणारे फारच थोडे असतात. बाकी बहुतेक पोटभरूच ! बाह्य भपक्याला, चवचाल स्वातंत्र्याला भाळणारे आणि भुलणारेच फार असतात ! आरंभीं तर या धंद्यांत " आचारी-पाणके-वाढपी and Co. " च असत ! त्यांचें अज्ञान, भांग-गांजा-अफू-दारू-बाहेरख्याली या सारखीं त्यांच्या अज्ञानामुळें त्यांना चिकटलेलीं व्यसनें, यांची माहिती तुला असती, तर तुला आतां जितका वैताग आला आहे तितका आला नसता ! ते लोक छंदीफंदी असत, लफंगे असत.

त्यांचें अंतर्बाह्य वागणेंही छाकटें—छचोरपणाचें असे ! डोळ्यांत सुरमा घातलेले, डोकीवर भरजरी उंची अशी वांकडी टोपी असलेले, थोबाड रंगविलेले, गालांत तंबाखूचा चोंथा घोळणारे, रस्त्यानें विड्या-सिगारेटचे निलाजरेपणानें फवारे सोडणारे, टोपी-पटक्याच्या बाहेर मुद्दाम बावऱ्या काढणारे, चकचकीत तांबड्या गंधाची बारिक टिकली दोन भिवयांच्या बरोबर मध्यावर ठोकून दिलेले, अंगांत पातळ मलमलीचा सदरा, त्यावर भडक तांबड्या—हिरव्या ताप्त्यांचें जाकिट घातलेले, तसेंच तलम जॉन मिलचें पुढें—पाठीमागें सोगे सोडून धोतर नेसलेले, जाकिटाच्या खिशांत घड्याळाची रोल्डगोल्डची नुसतीच सांखळी लटकाविणारे, हातांच्या दाही बोटांत लक्ष्मीधरासारख्या आंगठ्या अडकवून पोरकटपणाला उत्तेजन देणारी हातांत बारीकशी वेताची छडी गरगर फिरवीत चालणारे, जाकिटाच्या खिशांत रंगीबेरंगी दस्तरुमाल मुद्दाम बाहेर दिसेल अशा बेतानें ठेवणारे, पायांत दिल्लीचा नखरेल चढाव चढवून आणि सर्वांगाला भडक भपके मारणारे सुगंध चोपडून खिडक्यांकडे पहात पहात जाणारे, पुढें चालणाऱ्या कुलवतीचा एकसारखा पिच्छा पुरविणारे किंवा समोर येऊन जाणाऱ्या कुलस्त्रीकडे मान मोडेपर्यंत वळून पाहून खांकरून खोंकरून आपल्याकडे लक्ष वेधविण्यांत स्वर्गसौख्य मानणारे असे पूर्वी एक वेळचे नाटकवाले—"

"हें मला सर्वस्वीं कबूल आहे, पण ते पूर्वी होऊन गेले; आतां काय त्याचें ?—"

"शिमगा जातो पण कवित्व राहातें ना मागें ! ते आम्हां नाटकवाल्यांचे पूर्वज सध्यांच्या आमच्या पिढीला थोडेफार भोवावयाचेच !

कांहीं त्यांचे आनुवंशिक दुर्गुण, कांहीं आमचे स्वतःचे ! म्हणून अजू-
नही आजच्या सारखे गंमतीचे प्रसंग मधून मधून उद्भवतात ! त्याला
काय करायचें ! '' बाबुराव बोलला. त्यावर मला कांहीं विशेष
बोलतां येईना. काय बोलणार ? मला आपलें बोलणें पटलेसें वाटून
बाबुराव आणखी पुढें म्हणतात, '' अरे, आतां हें तर कांहींच नाहीं.
आतां घडले असले प्रसंग सध्यांच्या काळीं तरी कधींमधींच उद्भवतात.
एरव्हीं तुझ्यासारखे शहाणे समंजस सद्गृहस्थ मला किंवा माझ्या-
सारख्यांना कसे वागवितात तें तूंच पहाना ! तूंही समाजाचा घटक
आहेस, ते आतांचे घरवालेही घटक आणि मीहि घटकच ! पूर्वीच्या
काळीं आतांच वर्णन केलेले ते आमचे पूर्वज एखाद्या गांवीं गेले
म्हणजे तो गांव आमच्या त्या रंगीढंगी पूर्वजांना पाहून अगदीं हवाल-
दिल होऊन जाई. त्यांचीं नाटकें पहावयाला लोक जात पण म्हणतात,
एरव्हीं गांवांतून ते लोक भटकूं लागले म्हणजे घरवाले घराचीं दारें
लावून घेत; मुलीबाळींना माजघरांत हांकलीत; जसा कांहीं गांवांत
नाटकवाले लोक येणें म्हणजे प्लेग, कॉलरा, एन्फ्लुएन्झासारखा दारुण
रोगच गांवावर धाड घालायला आला आहे, अशी लोकांची समजूत
होई. तशी तर आतां स्थिति नाहीं ना ? त्यावेळीं आतांच्या घरवाल्या-
सारखेच लोक जास्त असत. आतां तुमच्यासारखेच जास्त आहेत.
हलक्या लोकांच्या हातांतून वरच्या दर्जाच्या लोकांत कोणतीही कला
आणायची म्हणजे त्यासाठीं झटणाराला हा असला त्रास थोडासा
भोगावा लागणारच ! तें कार्य जर आजच्या पिढींत आम्हीं करतों
तर इतका चिखल आंगावर यायचाच ! आतां आम्हीं जर असेंच

नीटपणें वागूं तर आमच्या पुढील पिढीला इतकाही त्रास पोंचणार नाहीं ! सध्यांच पहा ना, आम्हीं नाटकवाले असून आपण प्रतिष्ठितपणाचे नागरिकत्वाचे हक्क आम्हांला देतां, आम्हींही उपभोगतों. आज नाट्य-सृष्टींत राहणारे-वागणारे असे किती तरी सज्जन आपणांस दिसून येतात, कीं ते घरीं किंवा घराच्या बाहेरही वागत असतां **नाटकी** हें निंदाव्यंजक विशेषण त्यांना लावण्याची समाजांतील कोणाचीही छाती नाहीं—"

"त्याच सज्जनांपैकीं तुम्हीं एक आहांत, हें मी जाणतों. म्हणूनच ना मघाशीं त्या संभाविताचा मला राग आला !" मी बाबुरावाला मध्येंच थांबवून म्हटलें.

"तुम्हीं त्यांना थांबविलेंत, हें ठीक झालें. मी थांबविलें असतें वा त्यांना उद्धट उत्तर दिलें असतें तर मी मात्र खराच नाटकी ठरलों असतों. पण तें जाऊं द्या." बाबुरावानें आपलें व्याख्यान पुढें चालूं केलें, "आजच्या नटांच्या सुप्रतिष्ठित वागणुकीमुळें आपल्यासारखे आमच्या धंद्याच्या व्यतिरिक्त लोकही कुलीन स्त्रियांनीं नाटयकलेची उपासना करावयाला पुढें यावें, असें धीटपणें मतप्रतिपादन करूं लागले आहेत. जे लोक गांवांत नाटकवाले आले कीं घराचे दरवाजे लावून घेत, मुलीबाळींना मागील दारीं लपवीत, त्यांच्या मताची मजल आजच्या नाटकवाल्यांनीं इतक्यावर आणली हें काय थोडें आहे ? जो समाज उदार मनानें आम्हांला इतका मानूं लागला आहे, त्याला काय आम्हीं शिव्याशाप द्यायचे !"

या बोलण्यानें बाबुरावानें माझें तोंडच बंद केलें. माझा मीच ओशाळल्यासारखा झालों. बाबुरावानें केलेली समजूत मला पटली,

पण अजून त्या घरवाल्यावरील माझा घुस्सा कमी झाला नव्हता. म्हणून मी बाबुरावाला म्हटलें, " तुमचें सगळें म्हणणें मी मान्य करतों. समाजाचा विषय आपण सोडून देऊं. पण त्या मघांच्या म्हाताऱ्या घरवाल्यानें कां असें वागावें ! माझा कटाक्ष त्यावर आहे—तुम्हीं कांहीं पूर्वींच्या छटेल नाटकवाल्यासारखे नाहींत. इतकेंच काय पण तुम्हीं होऊन सांगितल्याशिवाय तुम्हीं नाटकवाले आहांत हें देखील त्याला कळलें नाहीं, असें असतां—"

" यावरून एवढेंच म्हणावयाचें कीं, हा ज्याचा त्याचा स्वभावगुण आहे ! " माझ्या मनाचें समाधान करण्याकरितां बाबुराव म्हणाले. " तुम्हांला यांच्याबद्दल असें वाटलें, पण मी दुसऱ्या एका घरवाल्याची गंमतीची गोष्ट सांगतों आणि मग तुम्हालांच विचारतों कीं, त्यासंबंधानें तुमचें मत काय होईल ! त्यावर तुम्ही रागावाल कीं लोभावाल ! "

मी बाबुराव नवीन घरवाल्याची गोष्ट काय सांगतात त्याकडे उत्सुकतेनें लक्ष देऊन राहिलों.

— ३ —

आम्हीं बोलण्याच्या भरांत बरेच दूरवर भडकलों होतों. गांव संपून बरेच बाहेर आलों होतों. पाय दुखूं लागल्याचा भास होऊं लागला त्यावेळीं ध्यानांत आलें कीं, आम्हीं कोठच्या कोठें चाललों आहोंत. शेवटीं रस्त्याच्या बाजूला छोट्याशा पुलाचा एक कठडा दिसला त्यावर जाऊन आम्ही बसलों. नंतर बाबुरावानें सुरुवात केली—

## नि र्मा ल्य

" आज भाड्यानें घर पाहाण्याचा समारंभ पुरेच. आतां उद्यां परवां सावकाश पाहूं. हं, तुम्हांला पुण्याच्या आमच्या घरवाल्याची गंमत सांगायची नाहीं का ! आमचें पुण्याला ज्या वाड्यांत बिऱ्हाड असतं तिथली गेल्या वर्षांतलीच गोष्ट बरं का ! गोष्ट नाजुक आहे, विशेष स्फोट करण्यासारखी नाहीं; पण उदाहरणादाखल आणि तुम्हांला म्हणून सांगायला हरकत नाहीं. " अशी प्रस्तावना करून ते गोष्टीकडे वळले.

" आम्हीं पुण्यांत ज्या वाड्यांत राहतों, त्या वाड्याचा मालक वयानें माझ्या एवढाच आहे. मनमिळाऊ आहे, दिलाचा दिलदार आहे. मला तो नुसता भाडोत्री किंवा नाटकवालाच समजत नाहीं, तर मित्र मानतो. साधारण माझ्या आईच्या वयाचीच त्याची आई आहे. माझी आणि त्याची बायको एकमेकींशीं अगदीं सख्ख्या बहिणीसारख्या वागतात. त्यांच्या वयांत फारसें अंतर नसून एकमेकींचीं मनेंही चांगलीं मिळालीं आहेत. थोडक्यांत सांगायचें म्हणजे ते घरवाले आणि आम्ही भाडेकरी असलों तरी वागत मात्र तसें नाहीं. अगदीं घरोब्याच्या–सलोख्याच्या नात्यानेंच वागतों. ते गृहस्थ माझ्या आईला वचकतात, चांगला मान देतात. माझ्या आईचा करडा स्वभाव तुम्हांला माहीतच आहे. अजूनही ती केव्हां तरी बजावतेच कीं, ' बाबू, संभाळून वागत जा. बोलून चालून तूं नाटकवाला; आपल्याकडून कोणाच्या वाळल्या पाचोळ्यावर पाय पडतां कामा नये ! ' आणि अनेक वर्षांच्या संवयीनें कुठें कसें वागायचें हें आम्हां सर्वांच्या चांगलें आंगवळणीं पडलें आहे.

" हें झालें. आतां आम्हीं ज्या घरांत राहतों, त्या घराचें थोडंसं वर्णन करतों म्हणजे पुढें जें मी सांगणार आहें त्याची तुम्हांला नीट कल्पना

येईल. आमचें घर दुमजली, तिघई आहे. निम्या भागांत आम्हीं राहतों, निम्यांत मालक राहतात. खालीं दोघांना सामान्य असा दिवाणखानाच आहे म्हणाना. दोन्ही माड्यांवर जायला त्या त्या बाजूला स्वतंत्र जिने आहेत. त्यामुळें कोणाचा कोणाला तसा उपसर्ग पोंचत नाहीं. शिवाय दोघांनाही सामान्य असा एक मध्येंच जिना आहे. त्याचा उपयोग खालच्या दिवाणखान्यांत जाण्यायेण्यास दोघांनाही सारखाच करून घेतां येतो. त्या जागेंत बायकांच्या सुखसोयीकरतां कडीपाटाचा झोंपाळा आहे. माझ्या बायकोला त्या झोपाळ्याचा फारच छंद! एवढा तेवढा वेळ मिळाला कीं, ती आपली त्या झोंपाळ्यावर कांहीं तरी गुणगुणत बसेल. ती गेली कीं, तिनें आपल्या मालकिणीला हांक मारलीच. तिलाही तो झोंपाळा फार आवडता आहे. कित्येकदां त्या दोघी मैत्रिणी त्या झोंपाळ्यावर, एकमेकींच्या गळ्यांत गळा घालून निजतात देखील! आणि या त्यांच्या आवडीच्या संवयीमुळेंच गेल्या वर्षी एक गमतीची— मी आतां जी तुम्हांला सांगणार आहे ती—गोष्ट घडली.

“ गेल्या वर्षी आमची मंडळी पुण्यालाच होती. एका नाटकाच्या दिवशीं काय झालें, कीं रात्रीं २ वाजल्यानंतर नाटक संपवून मी घरीं आलों. नेहमींच्या पद्धतीप्रमाणें दार उघडण्यासाठीं आईला हांक मारली. आईला हांक मारायची पण दार उघडायला आमच्या श्रीमतीनें यायचें हें ठरलेलें. पण त्या दिवशीं तसें झालें नाहीं. मी आईला हांक मारली आणि आईच हातांत कंदील घेऊन दार उघडायला आली. मी आंत गेलों. आईशीं थोडा वेळ इकडचें तिकडचें बोलून मी माडीवर गेलों. वर येऊन पाहिलें तो तिथें ती दिसली नाहीं. खालींही आईजवळ नव्हती

हें मी नुकतेंच पाहिलें होतें. 'ही गेली कुठें!' अशी साहजिकच शंका उद्भवली. ती दिसली नाहीं म्हणूनच मनाला कसेंसेंच वाटलें. त्यांतून त्या दिवशीं माझें डोकेंही बरेंच चढलें होतें. हांकेला उभी नाहीं, हवी त्या वेळीं जवळ नाहीं म्हणून थोडासा तिचा रागसुद्धां आला. पुन्हां आईकडे जाऊन चौकशी करावी, तर तिकडूनही संकोच वाटूं लागला. तशाच स्थितींत बराच वेळ वर ताटकळलों. झोंप तर येणें शक्यच नव्हतें. कितीतरी वेळानें मला आठवले कीं, कदाचित् दिवाणखान्यांत खालीं झोंपाळ्यावरही झोंपी गेली असेल. कल्पना यावयाचाच अवकाश, चट्कन उठलों, मधल्या जिन्याचा दरवाजा उघडला आणि हलकेच खालीं गेलों. दिवाणखान्यांत कंदिल बारीक करून ठेवला होता, तेवढाही प्रकाश डोळ्यावर येऊं नये म्हणून कागदाचा कपटा कंदिलाच्या काचेच्या आणि त्या काचेला संभाळणाऱ्या तारेच्या वेष्टनांत अडकवून ती बाजू झोंपाळ्याच्या बाजूस केली होती. माझी कल्पना खरी ठरली. तोंडावर लुगड्याचा पदर घेऊन, एक हात उशाला घेऊन आणि दुसरा हात झोंपेच्या भरांत झोंपाळ्याच्या खालीं लोंबता ठेऊन बाईसाहेब झोंपल्याचें आढळलें. क्षणापूर्वींचा माझा राग मावळला. क्षणभर वाटलें कीं, बिचारी गाढ झोंपली आहे तेव्हां कशाला आतां तिला त्रास द्या. पण दुसऱ्याच क्षणीं दुखणाऱ्या डोक्यानें ठणकून जाणीव दिली कीं, तिला उठविलें नाहीं तर डोकीला अमृतांजन कोण चोळणार! मन निर्दय केलें आणि पुढें झालों. लोंबकळणारा हात धरला आणि हलकेंच उठविण्याच्या हेतूनें वर उचलिला तोंच—अरे बापरे! ती चटकन घाबऱ्या घाबऱ्या उठली! पण ती—ती नव्हती!—ती

आमच्या घरमालकाची सौभाग्यवती–तिची मैत्रिण होती ! ती मजकडे पाहतांच झोंपाळ्यावरून ताट्दिशीं उठून बाजूला झाली ! मीही विजेच्या झटक्यानें दूर व्हावा तसा दूर झालों ! मी ओशाळलों. तिनेंही अस्ता-व्यस्त केंस वगैरे सांवरीत मजकडे पाहिलें. ती पुरी जागी झाली. तिचा घाबरटपणा जरा कमी झाला. मला मात्र चर्र झालें ! 'मी नाटकवालाच शेवटीं ठरणार ! उद्यां या कांट्याचा नायटा होणार आणि उद्यांच्या उद्यां आम्हांला बिऱ्हाडसुद्धां बदलावें लागणार ! आई काय म्हणेल ! मालक काय समजेल ! नाटकी हलकट असतात हाच छाप कपाळीं बडवला जाणार !' हे आणि असेच असंख्य विचार क्षणांत नाचून गेले. त्यांतून मीं स्वतःला कसेंबसें सावरलें व त्या निष्पाप भगिनीला हलकेच म्हटलें कीं तुम्हीं खुशाल निजा–माझी जरा चूक झाली–मला वाटलं—

" ' आलं माझ्या ध्यानांत. त्या व मी इथें निजलोंच होतों. मला वाटतें, त्या इतक्यांतच उठून शौच्याला गेल्या असतील. मीही एवढ्यां-तच घुरमळलें. ' माझी प्रामाणिक चूक त्या भागिनीच्या ध्यानांत आली. तिनें तसा खुलासाही केला. माझी गोड फसवणूक झाली हें ध्यानांत येऊन ती बोलत असतां थोडीशी त्या दृष्टीनें हंसली सुद्धां ! मला कसेंसेंच झालें. जीव भांड्यांत पडला खरा पण मन बेचैन झालें, तसाच माडी-वर झटकलों आणि अंथरुणावर आंग टाकलें. विचाराविचारांनीं डोक्यांत काहूर करून सोडलें. आतां डोकें दुखत होतें कीं नाहीं, याचेंही स्मरण राहिलें नाहीं. या वेळीं वर ती न येईल तर बरें असें मनांत आलें. खरेंच ती आलीही नाहीं. पहाटेचीच वेळ व्हायला आली होती. बायकांनीं उठून सकाळच्या कामाला लागायचीच ती वेळ! मग माझें मन मात्र

मोकाट सुटलें. घरमालकाची बायको, माझ्या बायकोला काय सांगेल ! आपल्या घरीं भलतेंच्या सलतेंच सांगेल काय ! आणि त्या सांगण्याचा परिणाम काय होईल ! का आपणच होऊन घर मालकाजवळ खरें खरें सारें सांगून मोकळें व्हावें ! पण असें सांगितलें तर तें ते खरेंच मानतील कशावरून ! केलेलं जिरविण्याकरितां मी ही नाटकी थापच देत आहें असें त्यांना वाटणार नाहीं कशावरून ! माझी झोंपही पळाली आणि विचारांनींही भंडावलें—मला काहींच कळेना उद्यां माझें काय होणार ! ''

— ४ —

बाबुराव सांगतांना थांबले. मध्येच थोडेसे हंसले ! ही काय गोष्ट हंसण्यासारखी होती ! त्यानीं गोष्ट अशी कांहीं रंगविली होती कीं, जणूं काय आतांच ती नुकती घडून गेली आहे. आविर्भावासह परिस्थिति डोळ्यांपुढें नाचविण्याचें त्याचें कसब कांहीं औरच होतें. कारण ते एक नाणावलेले नट होते.

थोडा वेळ गेल्यानंतर मीच उत्सुकतेनें विचारलें, " अहो, पण पुढें काय झालें ! वृथारोपांतून तुम्हीं मुक्त कसे झालांत ! का तुम्हाला त्या पापाचें प्रायश्चित्त म्हणून दुसरेच दिवशीं घर सोडावें लागलें ! "

" नाहीं, " बाबुरावांनीं हंसत हंसत पुढें सांगितलें, "त्याचीही दुसरीच गंमत झाली. ती दुसरेंच दिवशीं आम्हांला कळली. तेव्हांच त्या भीतिप्रद काल्पनिक वादळांतून आम्ही सहीसलामत बचावलों. त्याचें असें झालें—मी उजाडेपर्यंत विचार केला आणि जिवाचा धडा करून

घरमालकाजवळ झालेला प्रकार सांगावयाचाच, मग काय होईल तें होईल, असें नक्की ठरवलें. फक्त सांगावयाचें तें वेळ–स्थळ–प्रसंग पाहून सांगावयाचें हेंही मात्र ठरवून टाकलें. सकाळीं आमच्या नव्या नाटकाच्या तालमी चालू होत्या म्हणून मी प्रातर्विधि उरकून लवकरच कंपनीच्या बिऱ्हाडीं गेलों. तिच्याशीं किंवा आईशींही फारसा बोललों नाहीं.

"दुपारीं जेवायच्या वेळेला जेव्हां मी परत आलों, तेव्हां आमच्या जागेंत घरमालक, त्यांच्या मातोश्री, त्यांची बायको आलीं आहेत, आई स्वयंपाकघरांत गुंतली आहे, माझी बायको कांहीं वरकामांत गढली आहे, ती व घरमालकांची बायको मधूनमधून एकमेकींकडे पहात आहेत आणि आपसांतच कांहीं सांकेतिक खुणा करून गालांतल्या गालांत हंसत आहेत असा मला भास झाला. मी जरा गडबडलों, रात्रीचा माझा मूर्खपणा शेवटीं चव्हाट्यावर आला वाटतं व त्यावरच सगळ्यांची एकत्र सभा भरून जाहीर चर्चा चालली आहे, असें मनांत आलें. माझ्या काळजानें ठाव सोडला, मला तेथें थांबण्याचें धैर्य राहिलें नाहीं. मी माझ्या बायकोकडे, आईकडे कीं इतर कोणाकडे न पहातां कपडे उतरण्याच्या निमित्तानें लगेच जिना गांठला पण तितक्यांत घरमालकांनीं मला 'अहो बाबुराव, जरा इकडे या अगोदर–मग वर जा. पहांटेस घडलेल्या एका विलक्षण प्रकाराबद्दल सर्वांच्या देखत मला जरा बोलायचें आहे—' असें म्हटलें.

"माझा अगदीं नाईलाज झाला. अगदीं नाईलाज होऊनच मागें वळलों. खात्रीच झाली कीं आपलें बेंड बाहेर फुटलें. झालें. भरलीं आपलीं शंभर पुरीं ! आतां काय बोलतील तें खरें. निमूटपणें ऐकायला

पाहिजे. वागवतील तसें वागावयाला पाहिजे. घर खालीं करा म्हणून सांगितले तर आजच्या आज मान्य करायला पाहिजे, असें मनांत आलें. एकाद्या महान अपराध्याप्रमाणें मुकाट्यानें परतलों व पुढें जाऊन उभा राहिलों. काय म्हणून विचारण्याची सुद्धां शक्ति जिभेंत उरली नाहीं.

" मला व माझ्या आईला उद्देशून मालक म्हणाले, ' बाबुराव, काकू, पहाटे अशी एक चमत्कारिक व लाजिरवाणी गोष्ट घडली—'

" माझें मस्तक भ्रमूं लागलें, जीव गुदमरूं लागला, काळीज खालीं-वर होऊं लागलें. घरमालक मला अत्यंत क्रूर वाटूं लागले. एकदां स्पष्ट एक घाव आणि दोन तुकडे कां करीत नाहींत, असे आस्ते आस्ते कां काळजाचे लचके घेतात असें वाटूं लागलें. मी कांहींच बोललों नाहीं. त्यांच्याकडे लक्ष दिलें. मान मात्र खालीं झाली होती. वर मान करून पाहायला तोंड कुठें होतें मला !

" मालक म्हणाले, ' काकू, तुमच्या सुनेचा–बाबुराव तुमच्या पत्नीचा–म्हणजे माझ्या वहिनीचा–माझ्याकडून पहांटे पांच वाजतां भयंकर उपमर्द–अपराध झाला आहे आणि त्याकरितां मला तुमची प्रामाणिक आणि प्रांजलपणें क्षमा मागायची आहे ! '

" म्हणजे ? ही काय आणखी नवी भानगड ? मी एकदम मना-शींच उद्गारलों. एकूण माझ्या मूर्खपणाबद्दलचें हें लचांड नव्हेच तर ! माझ्या बायकोचा यांनीं काय उपमर्द केला ? क्षणापूर्वींची माझी विष-ण्णता हलकेच दूर होऊं लागली. मी पुढें ऐकूं लागलों. आतां धिटा-ईनें मी त्यांना विचारणार तोंच माझी आईच म्हणाली, ' अहो, पण असं अगदीं क्षमा मागण्यासारखं इतकं काय तुमच्या हातून झालं ? '

" 'अहो, मी पहांटे पांच वाजतां माडविरून खालीं दिवाणखान्यांत आलों; तिथें झोंपाळ्यावर तुमच्या सूनबाई झोंपल्या होत्या. तोंडावर पांघरूण असल्यानें मी कांहीं ओळखलें नाहीं. मला निराळेंच वाटलें. आणि ती वेळ झोंपायची नसून सकाळच्या कामाची असतां झोंप कशी आली—आई काय म्हणेल—पाहिलं म्हणजे माझ्यावर आणि तिच्या-वरही रागावेल म्हणून मी जवळ गेलों आणि जोरानें हलवून एक चांगला सपाटून पाठींत धबका घालून झोपेंतून उठविलें. तों काय ! आमच्या मंडळीच्या ऐवजीं तो धबका तुमच्या सूनबाईच्या पाठींत बसला ! मी अगदीं शरमिंदा झालों. शेजारच्या बायकांवर हात टाकणें जनदृष्ट्या किती वाईट ! म्हटलं वहिनींनीं तुम्हांला सांगावयाच्या अगो-दर आपणच होऊन तुम्हां सगळ्यांना सांगावं व क्षमा मागून मोकळें व्हावें ! मग केली ना क्षमा मला ! '

" 'हात् तिच्या इतकंच काय ! मग त्यांत क्षमा करण्यासारखें तें काय आहे ! ' आई म्हणाली. मालकांनीं माझ्याकडे पाहिलें. माझा जीव भांड्यांत पडला होता. उलट मला हंसूं येत होतें. पहांटे थोड-क्यांत कशी गफलत झाली असावी हेंही माझ्या लक्षांत आलें. त्या मैत्रिणी मैत्रिणींनीं अगोदरच सकाळीं एकमेकींजवळ पहांटेच्या गंमती कानांत कोंबल्या होत्या. मजकडे पाहून मालक म्हणाले, ' काय बुवा बाबुराव, माझ्या प्रामाणिक हेतूकडे लक्ष देऊन क्षमा केली पाहिजे. '

" मीं विशेष बोललों नाहीं. त्यांचा हात हंसत हंसत धरला आणि म्हटलें, 'चला अगोदर माडीवर. तिथें तुम्हांला 'क्षमे'चे शब्द सांगतों.' वर गेल्यावर मी काय सांगितलें असेल हें सांगण्याचें कारण का आहे !

" माझी पहांटेची गफलत ऐकून घरमालक तर मोठमोठ्यानें हंसत सुटले; मलाही हंसूं आवरेना ! खालीं आमच्या बायकाही खुद् खुद् दिवसभर हंसतच होत्या. आम्हीं चौघेहीजण कां हंसत होतों हें माझ्या किंवा मालकांच्या मातुश्रींना मात्र समजले नव्हतें. कसें समजणार ? पहांटेच्या गमतीदार गफलती आमच्यापैकीं त्यांना निलाजरेपणानें कोण सांगणार ? व आमच्या हंसण्याचें कारण त्यांना कसें उमगणार ?

" आमचे घरमालक त्या गोष्टीची आठवण झाली म्हणजे हंसून म्हणतात, ' खूप, एखादे वेळीं घरांतल्या घरांतच नाटकें होतात बुवा !' त्यावर मीहि त्यांना म्हणतों, ' शेजारला **नाटकवाला** असला म्हणजे नाटकांनां काय हो तोटा ? ' त्यावर तेही म्हणतात, ' तुमच्या सारखा संभावीत नाटकवाला असला म्हणजे नाटकें झालीं तरी तीं संभावीत होतात ! ' ' ठीक आहे, तुम्हीं नाटकवाल्यांना संभावीत समजूं लागलां हें काय थोडें झालें ! नाहीं तर आम्हांला मोठी पंचाईतच होती जगांत वागण्याची ! ' असेंच कांहीं तरी मीही उत्तर देतो. "

— ५ —

बाबुरावांनीं वरील स्वानुभवाची गोष्ट सांगितली, त्यावर मी नेहमीं विचार करीत असतों; आणि नाटकवाले अंतःकरणानें संभावीत—आणि तेहीं झपाट्यानें—असे दृष्टोत्पत्तीस येऊं लागले आहेत हें समजून मनाला समाधान वाटतें.



# २

# अस्पृश्योद्धार



राजमान्य राजेश्री अण्णासाहेब हे खरोखरीचे सावकार! म्हणजे सरकारदरबारांत त्यांना ओळखत म्हणून ते 'राजमान्य' होते. आपल्या कुळांवर, राजा प्रजेवर अनियंत्रित हुकूम चालवतो तसे ते चालवीत म्हणून ते ' राजेश्री ' होते. ते सावकार होतेच; अगदीं पिढीजाद सावकार होते. ' सावकारी 'ला लागणारे सर्व सद्गुण (!) अण्णासाहेबांजवळ उपजत–आनुवंशिक संस्कारानें आलेले होते म्हणून ते आपल्या कुळांना छळीत, पिळीत, गांजीत व पाशांत अडकावून तडफडावयाला लावीत. त्यांवरूनच त्यांना खरोखरीचे सावकार—' सावकारासारखे सावकार ' असें म्हणण्यांत येत असे. एवंच ' राजमान्य ', ' राजेश्री ', ' खरोखरीचे सावकार ' हीं त्यांचीं उपपदभूषणें सार्थ व समर्पक होतीं.

उभा गांव त्यांना त्यांच्यासमोर ‘ अण्णासाहेब, अन्नासाब ! ’ असें अजीजीनें म्हणे, परंतु त्याच्या पाठीमागें त्यांचीं बोलणीं मानभावाचीं आणि करणी कसाबाची असल्यामुळें, ‘ चाण्डाळ, महार, मांग, रामोशी, दरोडेखोर, चोर, उलट्या काळजाचा, गळेकापू, बदमाष, सैतान ’ असल्या शेलक्या पण खऱ्या शब्दसुमनांची पखरण करी.

ध्वनि तसा प्रतिध्वनि असायचाच ! अण्णासाहेबांच्या कृतीचा प्रतिध्वनि त्यांच्या पाठीमागें उमटत असला तरी त्यांना ऐकायला येत असे. पण चमत्कार असा कीं अण्णासाहेबांना त्यांबद्दल वाईट वाटत नसे; उलट आसुरी आनंद होत असे. लोक आपल्याला बरोबर ओळखून आहेत याचीच जाणीव त्यांचा स्वाभिमान चेतवीत असे म्हणाना ! इतकेंच नव्हे, तर लोक आपल्याला जसें समजतात तसेंच आपण आहोंत, नांवाला साजेल असें आपल्याला काळीज आणि शोभेल अशीच आपली करणी आहे, हें बोलून न दाखवितां अण्णासाहेब गांवाला आपल्या कृतीनें दाखवीत.

म्हणजे असेः त्यांच्या देवडीवर धेड, दरवडेखोर, मळ्यांत महार, मांग, संगतींत सैतान, चाकरीला चाण्डाळ, सोबतीला बदमाष असा आपल्या भोंवतीचा परिवार अण्णासाहेब मुद्दाम बाळगीत. त्यांच्या सावकारी संसाराला असलेच साथीदार उपयुक्त पण त्यांना कोणा त्रयस्थानें सहज थट्टेनें हंसून त्याबद्दल केव्हां विचारलें, तर त्याला ते मोठ्या आवेशानें–अभिमानानें सडेतोड उत्तर देत, “ अहो, ते आपलेच बंधु आहेत, मी त्यांचा आहे. त्यांच्यांत आमच्यांत फरक काय ? हा अस्पृशोद्धार आहे. देशांत अस्पृश्योद्धाराची घोषणा चालूं आहे. जगाबरोबर

आपल्यालाही धावलेंच पाहिजे. मी नुसता बोलका पंडित नाहीं. तर मी कृतीचा सुधारक आहें. माझ्या बुद्धीला जें व जेवढें पटलें आहे तें व तेवढें मी आचरणांत आणलेंच आहें—अस्पृश्य बांधवांना याप्रमाणें कवटाळून बसलों आहें. आपण प्रत्यक्षच पहातां आहांत ! " हें ऐकून पृच्छकानें हात जोडावे. अण्णासाहेबांना वाटावें आपलें कार्य व बोल पृच्छकाला पुरेपूर पटले म्हणूनच त्यानें आपल्याला नमस्कार केला आहे.

मग ते अधिकच उत्तेजित होत आणि म्हणत, " अस्पृश्यांना जवळ घेण्याकरितां मी स्वतः त्यांच्यासारखा झालों आहें—तोच झालों आहे. मला माहित आहे कीं सर्व लोक मला महार, मांग, म्हणतात—पण त्यांच्या हें लक्षांत येत नाहीं कीं माझा हा खटाटोप अस्पृश्योद्धाराकरितांच आहे ! अस्पृश्योद्धार तो आणखी दुसरा कसा करणार ! "

उलट अन्नपूर्णाबाई—अण्णासाहेबांची अर्धांगी—गरीब बिचारी, दयाळू तशी मायाळू तशी कनवाळू तशीच. नांवाप्रमाणें तिची कृती. मग तिच्या कृतीवरून तिचें नांव पडलें होतें कीं नांव सार्थ करणारी तिची कृतीच असे, कळत नाहीं. त्या सर्वांना हव्याहव्याशा वाटत. दोघांच्या स्वभावांत जमीन अस्मानाइतकें अंतर ! अण्णासाहेबांनीं रागाच्या सपाट्यांत एकाद्याच्या पाठीची चाबकानें चामडी लोळविली तर अन्नपूर्णाबाई तेल तूप घेऊन ते चोळायला आणि शेकायला त्याच्याकडे कनवाळुपणानें धावायच्या. क्षुल्लक कारणाकरितां अण्णासाहेबांनीं क्रूरपणानें एखाद्याला उपाशी ठेवण्याची शिक्षा फर्माविली तर अन्नपूर्णाबाई अगोदर त्याला जेऊं घालीत; मग आपण घांस घेत ! अण्णासाहेबांचें वागणें अन्नपूर्णाबाईंना पसंत नसे. तर अन्नपुर्णाबाईंचा स्वभाव अण्णासाहेबांना नापसंत !

लोक म्हणत, अण्णासाहेब सावकार म्हणजे अन्नपुर्णाबाईचें जिवंत पाप आहे. पुष्कळांच्या तोंडून ऐकायलाही येई कीं अन्नपुर्णाबाई म्हणजे अण्णा-साहेबांची साक्षात् पूर्वजन्मींची पुण्याई आहे. त्यावरच तो जगतो आहे !

अन्नपूर्णाबाईवर वेळीं प्रसंगीं अण्णासाहेब तोंड टाकीत, हातसुद्धां टाकीत. ती नको म्हणेल तें हटकून करीत हे खरें असलें तरी त्यांच्या-वर अण्णासाहेबांचें निस्सीम प्रेम मात्र होतें. ते त्यांना मनांतून फार मानीत व म्हणत सुद्धां कीं " ही सुखांत आहे तोंपर्यंतच आमची चलती आहे. हिला दुखवून भागणार नाहीं. ही माझी पुण्याई आहे !"

पण हें ते आपण होऊन म्हणतील. त्यांच्यावर तें कुणी लादायला लागलें कीं मग अंहं ! उलटलेच ते. फार कशाला तशा जाणीवीनें अन्नपूर्णाबाईसुद्धां एकाद्या वेळीं कांहीं बोलल्या कीं त्यांच्याविरुद्ध लगेच त्यांनीं कृती केलीच म्हणून समजावें.

नुकतेंच असें झालें. महार, मांग, रामोशी, अशांच्या संगतींत अस-ल्याबद्दल, त्यांना आपल्या पदरीं ठेवल्याबद्दल अन्नपूर्णाबाई सहज कुठें बोलायला गेल्या तर त्याला उत्तरादाखल म्हणून अण्णासाहेबांनीं दुस-ऱ्याच दिवशीं एक पंचवीस वर्षांचा तरणा जवान तगडा पठ्या—शिवा महार—मुद्दाम चाकरीला ठेवला. आणि तो कुठें तर अगदीं घरांत ! त्यानें इकडेतिकडे खुशाल हिंडावें, कशालाही शिवावें, कसेंही वागावें; आणि मग अन्नपूर्णाबाईना विचारलें—" झालं आतां ठीक ! काय करशील आतां ! हाच घरांतील सारीं कामें करणार, मिळूनमिसळून वागणार आणि तूं त्याला वागवून घेतलंच पाहिजेस. हा तूं विचारलंस त्याबद्दल तुझा सूड म्हणून वाटेल तर समज ! आहे यावर तुझें कांहीं बोलणें !"

खरें म्हटलें तर हें बोलणें बोलण्यापुरतेंच होतें. शिवाला त्यांनीं दुसऱ्याच उद्योगाकरतां सहज ठेवला होता. कुळांना लुबाडण्याचें, नागविण्याचें, देशोधडीला लावण्याचे अण्णासाहेबांचे सर्व उद्योग व इलाज कायदेशीर तऱ्हेनें नेहमींच चाललेले असत. तरीही जे कोणी त्यांचा हेवा दावा करीत, जोर जुमानीत नसत, त्यांच्यावरही कुरघोडी करण्याचा प्रयत्न करीत, अशांचा नक्षा उतरण्याकरितां अण्णासाहेब आणखी कांहीं हस्तेंपरहस्तें बिनबोभाट अमानुष उद्योग करीत. कुणाचा गुपचूप खून पाड, कुणाच्या घराला आग लाव, कुणाला बेदम बडवून काढ, कुणावर कांहीं बालंट आणून तुरुंगांत डांबून टाक हे खेळ ते नित्य खेळत. त्याकरितां त्यांना तरण्याताठ्या, निधड्या छातीच्या व हुकमी इसमांची नेहमींच गरज असे. शिवासारखीं किती तरी पोरें त्यांच्या कक्षेंत होतीं.

— २ —

शिवा कामाला राहिला होता, पण अजून त्याच्याकडे कांहींच काम आलें नव्हतें. वेळ आल्याखेरीज काम येणार कुठून ! तूर्त खावें, प्यावें, तालीम करावी, दंगामस्ती करावी, अण्णासाहेबांच्या बरोबर हिंडावे, मन मानेल तें अन्नपूर्णाबाईकडून खायला घ्यावें आणि मजेंत असावें हा त्याचा कार्यक्रम होता. प्रथम प्रथम तर त्यानें अण्णासाहेबांकडे पहावें आणि अन्नपूर्णाबाईंना त्रास होईल असें वर्तन करावें असें चालविलें होते. इथं शिवूं नकोस, तिथं लागूं नकोस, घरांत शिरूं नकोस म्हटलें कीं, त्यानें मुद्दाम तेंच करावें व हंसावें. पण हें असें फार दिवस टिकलें

नाहीं. न कळत त्याच्यांत बदल होऊं लागला होता. शिवा जातीचा हीन खरा पण अन्नपूर्णाबाईबद्दल त्याला आदर वाटूं लागला. त्यांना त्रास देऊं नये असें त्याला उगीचच वाटूं लागले. घरांत दांडगाई आणि उर्मटपणा त्यानें बंद केला. तो कुठेंहि शिवेनासा झाला. त्याला भाकरी द्यावयाच्या वेळीं तो कुठें दिसला नाहीं म्हणजे अन्नपूर्णाबाई त्याला हांका मारीत—' काऱ्र्यां, जेवायच्या वेळेला कुठें नाहींसा झाला आहेस रे ' असें म्हणत त्याचा देखील शिवाला आनंदच वाटूं लागला. आपली आई आपल्याला हांक मारीत आहे, असेंच त्याला वाटे. ' काऱ्र्यां ' म्हटलेलें देखील त्याला फार आवडे. तो पोरका होता. अन्नपूर्णाबाई त्याला आईच वाटूं लागली व तो त्यांच्याशीं अत्यंत अदबीनें, प्रेमानें व मायेनें वागूं लागला.

हें एक नवलच नव्हतें कां ! पण नवल तरी कसलें ! शिवा झाला तरी माणूसच होता. त्याला काळीज होतें. आपल्यावर खरी माया करणारावर आपण माया करावी ही साधी सरळ अक्कल त्याला होती. पुष्पसंगें मातीस वास लागे हें खरें नाहीं का ! शिवा अस्पृश्य होता—त्याचा उद्धार व्हावयाचा होता पण त्याला त्याची जरूरी वाटत होती का ! त्याचा उद्धार याच घरांत व्हावयाचा होता तें तरी कुणाला माहीत !

संसारांत गुरफटल्यानें अन्नपूर्णाबाईंना किती तरी दिवसांत कुठेंच —माहेरीसुद्धां—जायला मिळालें नव्हतें. आतांशा त्यांना कुचंबल्यासारखें होऊन कुठें तरी दोन दिवस जाऊन यावेसें वाटूं लागलें होतें.

त्यांना वाटलें जरा दूरच्या डोंगरावर रम्य व प्रेक्षणीय शिवेश्वर मंदिराचे जागृत देवस्थान आहे, देवदर्शनाच्या निमित्तानें तिथें गेल्यास आराम

वाटेल व थारेपालट होईल. म्हणून त्यांनीं संध्याकाळीं घरीं आल्यावर तालामाला पाहून अण्णासाहेबांजवळ तशी गोष्ट काढली. प्रथम त्यांनीं धुडकावूनच लावलें पण अन्नपूर्णाबाईची विशेष चिकाटी दिसली, त्यांत तसें कसलें नुकसानहि नव्हतें म्हणून त्यांना खूष करावेसें अण्णासाहेबांना वाटलें व त्यांनीं रुकार दिला.

अन्नपूर्णाबाईना परवानगी मिळाल्याबद्दल फार आनंद झाला. मनासारखे पतिराज वागले म्हणजे कोणत्या धर्मपत्नीला आनंद वाटणार नाहीं ! आणि अण्णासाहेबांनीं नुसतीच परवानगी दिली असें नव्हे, तर त्यांच्या जाण्याची व्यवस्था आपल्या बडेपणाला शोभेल अशा रीतीची केली. आपल्या घरची गाडी सजवली. ऐटबाज बैलांची जोडी त्याला जुंपायला दिली. बरोबर पूजा सांगायला ब्राह्मण, गाडीवान्, बाजाररहाट करायला एक स्वतंत्र माणूस त्यांनीं मुद्दाम देण्याचें ठरविलें. आईसाहेब—अन्नपूर्णाबाईना त्यांचीं घरांतील, शेताकडचीं आणि कचेरीकडचीं सर्व माणसें आईसाहेब म्हणत—निघणार म्हणतांच आणखी चार नोकरचाकर ‘ आम्ही येणार ! आम्ही येणार ! ’ करीत, आपलीं कुडतीं चढवून, पटक्याचे शेमले सोडून—खळणी पंजी नेसून तयार झालें कीं ! त्यांना नाहीं कोण म्हणणार ! शिवासुद्धां आईसाहेबांच्याबरोबर जायला सजला ! ते येणार म्हटल्यावर वाटेंत त्यांच्या खायचीप्यायची व्यवस्था मात्र अन्नपूर्णाबाईना यथास्थित करावी लागली.

त्यांच्या मनांतून आणखी कांहीं गोष्टी व्हाव्यात असें होतें पण त्या बोलल्या नाहींत. बोललें तर हटकून उपयोग होईलच, असा त्यांना मुळीं भरंवसाच नव्हता. मग त्या कशा बोलणार !

त्या अण्णासाहेबांना म्हणणार होत्या. ‘ शिवेश्वराच्या दर्शनाला आपण कां माझ्याबरोबर चलूं नये ? ’ पण त्यावर ‘ देवाच्या दर्शनानें तुम्हांलाच काय स्वर्गात न्यायला विमान यायचं असेल तें येऊं द्या ! त्याच विमानाच्या खुराला लटकून आम्हीं येऊं. आम्हांला देवाच्या दर्शनाची आवश्यकताच नाहीं ’ असें उत्तर येणार हें ठरलेलेंच ! त्यांच्या मनांतून हट्टही धरायचा होता, ‘ इकडून बरोबर असल्याखेरीज देवाचं दर्शन घेतांना मनाला बरं तरी कसें वाटेल ? ’ पण याला उत्तर ‘ तूंच जाऊं नको कशी ! ’ असें येईल ही भीति होती.

म्हणून त्या मग कांहींच बोलल्या नाहींत. पडत्या फळाची आज्ञा मिळाली आहे तेव्हां पट्दिशीं त्याचा फायदा घेऊन झट्दिशीं देव–देव करून एकटीनें यायचें हें अन्नपूर्णाबाईनीं ठरविलें. त्या उद्योगाला लागल्या.

दुसऱ्या दिवशीं जाण्याचे ठरले. दुसरा दिवस संकष्टीचा ! रात्रीं चंद्रोदयाला संकष्टी सोडून मग गाडी जोडावयाची, मजेत चांदण्यांत प्रवास करावयाचा, उजाडायला शिवेश्वराच्या डोंगराच्या पायथ्याला पोंचावयाचें, सूर्योदयाला डोंगर चढूं लागावयाचें म्हणजे ऐन शिवेश्वराच्या माध्यान्ह पूजेच्या वेळेला हजर होतां येईल हें सारें अगदीं ठरल्यासारखेंच होऊन गेलें होतें. त्या भावनामय आणि भक्तिप्रधान माऊलीला परवांच्या दुपारची शिवेश्वराची बांधली जाणारी पूजा आतांच चालू असल्याचें दिसत होतें. चौघडा झडतो आहे, मंजूळ सनया मधुर आलाप काढीत आहेत असें त्यांच्या कानांत आतांच पडसाद उमटत होते. देवपूजेच्या अनेक सुगंधी पुष्पांचा परिमल आतांच त्यांच्या नाकांत घुसून त्यांना सुखवीत होता. अशी त्यांची तंद्री लागून त्या उद्योग करीत होत्या.

प्रहर रात्रीला संकष्टी सोडून त्या जायला निघाल्या. त्यांच्याबरोबरचा कबिला सज्ज झाला. अन्नपूर्णाबाई गाडींत चढल्या. अण्णासाहेब निरोप घ्यायला बाहेर आलेच होते. त्यांना थट्टा करायची हुक्की आली व ते म्हणाले " हं, निघालांत एकदां **शिवेश्वराला** ! ठीक ! देवाला नमस्कार करून त्याला काय सांगणार ! काय मागणार ! "

अन्नपूर्णाबाईनीं थट्टा ओळखली. त्या म्हणाल्या, " इश्श ! सगळ्यांना सुखी राख, सगळ्यांना चांगली बुद्धि दे, यापेक्षां काय म्हणायचें ! "

अण्णासाहेब हंसून म्हणाले. " पण आज आम्ही कुठें कमी सुखी आहोंत ! आणि आज काय आमची दुर्बुद्धि आहे ! "

" कांहीं तरीच ! " एवढाच उद्गार व त्यांच्या मानेला किंचित् एक हेलकावा बसला. अण्णासाहेबांना जरा बरें वाटलें.

" बरें. बरें. तुमच्याबरोबर आमचाहि पण शिवेश्वराला एक लांबलचक नमस्कार आठवण झाली तर सांगा म्हणजे झालें. पण आमच्या वतीनें देवाजवळ कसली रदबदली करूं नका बोवा ! आमचं आहे हें ठीक आहे. यांत कांहीं उणं करूं नकोस म्हणावं. बस्स ! "

त्यावर अन्नपूर्णाबाईची पुन्हां एकदां मान वळली जाऊन मुखचंद्रावर हास्य चमकलें. गाडी चालूं झाली व बैलांचे घुंगुर वाजूं लागले.

— ३ —

कबिल्यांतले लोक आपआपल्या लहरीप्रमाणें कोणी गाडीच्या पुढें तर कोणी गाडीच्या मागून चालूं लागले. भटजीमहाराजांनीं थोडेसें

चालल्यासारखें केलें पण लवकरच्च हलकेंच ते गाडींत घुसले व झोंपले. अन्नपूर्णाबाईकडे त्या वेळीं लक्षपूर्वक कुणीं पाहिलें असतें तर त्या अगदीं आनंदात आहेत, असें आढळून आलें असतें. तसेंच त्यांना उगीचच हुरहुर वाटत असावी, असेंहि भासले असतें. गाडीच्या समोर शिवा ऐटींत चाललेला त्यांनीं पाहिला. हुरहुरींतून आपलें लक्ष काढण्या-करितां उगीचच त्या शिवाला उद्देशून म्हणाल्या " शिवा, तूं रे कशाला बरोबर आलास? उगीच शिवाशिवीला मात्र कहार ! "

" पण आईसाब, आईशिपत मी शिवाशिव करणार नाहीं ! "

" देवाचं दर्शन तुला व्हायचं नाहीं. देवळांत तुला कोण येऊं देणार? मग पायाचं भाडं द्यायचं असा तुझा नवस आहे कीं काय? "

" पण आईसाब ! मी कशाला देवळांत येऊं? दुरून शिखराचं दर्शन घेईन. तुम्हीं देवाच्या पायां पडून आला म्हंजे तुमच्या पायांवर डोई ठेवीन. मग मला देव भेटलाच कीं ! "

दगडांत देवपण नसतें, मनुष्याच्या भावनेंत असतें; त्या भावनेस संभाळलें कीं, देवाच्या दर्शनाचा लाभच झाल्यासारखें हें तत्त्व त्या मूर्खाला कळून चुकलें होतें कीं काय कोण जाणे ! पण तो तसें म्हणाला खरा !

पण पुन्हां अन्नपूर्णाबाईना हुरहुरीनें गांठलेंच !—

गाडीवाल्यानें आपल्या 'आईसाबांना' अगदीं फुलासारखें घेऊन जायचं म्हणून ठरविलें होतें. आतां सडकच तितकी चांगली नव्हती, वळसे वेलांट्यांची, खालीवर, खडबडीत होती त्यामुळें गाडी फार खड-खडे त्याला त्यानें काय करावें ! वेळ कांहीं वाईट नव्हती.

शरद् ऋतूंतलें तें चांदणें स्निग्ध आणि मधुर होतें. थंडी पण फारशी नव्हती. आजूबाजूला ओढे गूढ खडखडाट करीत होतेच. मनाला आल्हाददायक होईल अशी प्रत्येक गोष्ट होती पण आईसाहेबांचें मन कावरेंबावरें होतच होतें. कदाचित् पुष्कळ दिवसानीं, त्यांतून रात्रींच्या वेळीं एकटीनें जायचं म्हणून तर तसं वाटत नसेल ? असेलहि, नाहीं कुणीं म्हणावें ! पण त्यांना हुरहुर वाटत होती हें बरीक खरें ! त्यांना हुरहुर वाटली नसती आणि मनाची प्रसन्नता वाढावी म्हणून त्यांनीं सहज इकडेतिकडे पाहिलें असतें, तर त्यांची प्रसन्नता कायम ठेवतील अशीं किती तरी साधनें होतीं. पण यावेळीं त्यांचा त्यांना कांहीं उपयोग नव्हता.

'रात्रीची वेळ आहे. क्रुर श्वापदांची हिंडावयाची ही वेळ—' मनांत यायला आणि समोरून डाव्या हातांकडून उजव्या बाजुला चारसहा रानडुकरांची मुसंडी जायला एकच गांठ पडली. पुढचे लोक ओरडले, गाडीवानानें बैल आवरले, भटजी महाराज किंचित जागे झाले व भय-चकित होऊन अन्नपूर्णाबाईनीं समोर पाहिले. डोळ्याचें पातें लवण्याच्या आंत डुकरांची मुसंडी आली आणि गेलीही ! समोरच्या मंडळींत मोठयांदा हांशा पिकला. त्यांतून कोणीसें हंसून विचारलें " पाहिलीत कां रानडुकरांच्या मुसंडीची मजा, आईसाहेब !—"

" मेल्यांनो ! मजा कसली त्यांत ! डुकर म्हणतां क्षणीं मला तर धड-कीच भरली !—" अन्नपूर्णाबाई स्वतःला सांवरीत आणि आवंढा गिळीत म्हणाल्या. " आपण उगीच अशा रात्रींच्या वेळींच निघालों ! मला वाटतं—" पण काय वाटतं त्याबद्दल अन्नपूर्णाबाई बोलल्या नाहींत.

आतां त्यांचें बरेंच मार्गक्रमण झालें होतें. मध्यरात्र उलटून गेली होती. चंद्र मध्यावरून पुढें कलला होता. गाडीवाला डुकली घेण्याच्या बेतांत आला होता. बरोबरची मण्डळी पण हलकें हलकें गाडीच्या मागून रेंगाळूंच लागली होती. त्या वेळचा रात्रीचा अम्मलच तसा असतो. अन्नपूर्णाबाईच्या डोळ्यावरही झोंपेची झांपड येऊं लागली होती.

डुकरांचा तांडा पाहिल्यापासून त्या जरा जास्त भ्याल्या होत्या. देव-दर्शन होईपर्यंत आणखी काय काय होईल कुणास माहित असें त्यांना वाटत होतें. पेंगतां पेंगतां गाडीचा हादरा जास्त बसला कीं त्या डोळे उघडीत. भयाची भीति त्यांच्यावर पगडा बसवी व त्यांचें मन विचारी "देवाच्या वाटेंत संकटें कां ? आतां आणखी एकादें संकट—" पण संकटाचें नांव निघण्याची खोटी; तें दत्त म्हणून पुढें उभें व्हावयाचेंच!

आतांही तसेंच झालें—

गाडी कुठें आली होती कुणास ठाऊक ! जागा अडचणीची असावी. वेळ अवेळ होतीच; सगळी मंडळी सुंद झाली होती. कसल्या तरी संकटाच्या कल्पनाच अन्नपूर्णाबाईंना येत असाव्यात. त्याच्या मनापुढें संकट—आणि प्रत्यक्षांत—खरेंच संकट—

— ४ —

कोणी तरी गाडी अडविली. त्या सर्वांनीं मिळून गाडीला गराडा घातला. कोणी बैल धरले. "हां खबरदार ! थांबा जागच्या जागीं ! गडबड कराल तर प्राणालाच मुकाल !—"

आकाशांत वीज कडकडावी तसें झालें. अन्नपूर्णाबाईची झोंप जाऊन घाबरटपणानें त्या पाहूं लागल्या. गाडीवानाची गाळणच उडाली होती. क्रूर श्वापदांनीं गराडा घातला नव्हता; क्रूर राक्षसांनीं वेढलें होतें.

देवाच्या वाटेंत हें दुसरें संकट होतें. देवाची वाट वाटते तितकी सोपी नसते. कळून न कळून हातून झालेल्या पापाचें क्षालन करण्याकरितां आपण देवाच्या भेटीला जात असतों. त्या वेळीं आपलीं पापें आपल्याबरोबरच असतात आणि तींच अशीं संकटांचीं सोंगें घेऊन वाटेंत जागजागीं अडवीत असतात; त्यांचा निकाल लावूनच पुढें झट-कावें लागतें तरच देवाचें दर्शन आणि आपल्या पापाचें क्षालन !

गाडीच्या मागून येणारी मंडळी बरीच दूर होती. कोणी दुष्टांनीं गाडी अडविली आहे याची त्यांना अजून कल्पनाही नव्हती.

" कोण तुम्हीं ? काय पाहिजे तुम्हांला ? आम्हीं वाटसरू " गाडीवान बोलण्याचा प्रयत्न करीत होता पण त्याचे शब्दच उमटत नव्हते नीट !

' काय पाहिजे ? ' या प्रश्नाला ' गाडींतली ती ' उत्तर मिळालें.

इतक्यांत मंडळी येऊन थडकली; त्यांना सर्व प्रकार कळला ! ते चांगले सावध झाले. पण उपयोग काय ? त्यांच्याजवळ तरवार ना ढाल ! त्यांचीही तारंबळच उडाली. बरोबरच्या मंडळींचें अवसान त्या टोळधाडीनें हेरलें व त्यांना अधिकच चेव आला.

पण तितक्यांत शिवा सरसावला; त्याला अवसान चढलें. त्याच्या खिशांत फरशी होती, ती त्यानें बाहेर काढली आणि हातांतल्या दांड्यांत ती अडकावून, छाती करून तो पुढें झाला आणि " कोण रे रांड लेकांनो तुम्हीं ! चला व्हा दूर " असें फरशी परजीत म्हटलें.



तितक्यांत शिवा पुढें सरसावला; व फरशी परजीत अवसानानें त्यानें चोरट्यांना मागें रेटलें.

शिवानें पुढें होऊन अवसानानें चोरट्यांना मागें रेटलें. शिवानें शौर्य दाखवितांच बाकीच्यांनींही अवसान धरून बाह्या सरसावल्या.

" कोण रे तुम्हीं? काय पाहिजे रे तुम्हांला ? कोण वाटलों रे आम्हीं तुम्हांला ? आम्ही काय हातांत बांगडया भरल्या आहेत ? या असे समोर ! एकेकांची या हातांतल्या फरशीनें खांडोळींच करतों ! " शिवानें गर्जना केली; फरशी उचलून खराच तो पुढें चार पावलें गेला.

चोरटे जागचे मुळींच हलले नाहींत. त्यांचा म्होरक्या दोन पावलें धिटाईनें पुढें येऊन म्हणाला, "शिवा, लेका गमज्या कशाला करतोस रे ?"

" काय, तुम्हीं मला ओळखतां? म्हणजे ओळखीचेच चोर दिसतां—तुम्हांला काय पाहिजे रे ? लूटमार करायची आहे ? "

" शिव्या, बडबड बंद कर. आम्हीं तुलाही ओळखतों आणि तुझ्या धन्याला—त्या उलट्या काळजाच्या राक्षसालाही—ओळखतों. शिव्या, तुझ्या मालकाचीच मालकीण आहे नाहीं रे गाडींत ? "

" बरं मग ? तुम्हांला काय करायचं आहे ? "

" तुझी कोण रे ती ? "

" माझी आई आहे—"

" पण तुझा मालक नीच आहे ! पाजी आहे. उलटया काळजाचा आहे. हरामखोर आहे. दगलबाज, क्रूर—"

" असेल—असेल—असेल—"

" त्याला दुसऱ्याच्या पुण्याईची कदर नाहीं; त्याला दया नाहीं, माणुसकी नाहीं. दुसऱ्याला म्हणतो तुमच्या बायका विका, गहाण टाका—"

" पण लेकांनो त्याचा इथं काय संबंध? चला चालते व्हा—"

" इथं काय संबंध? इथंच तर संबंध आहे! " चोरट्यांचा म्होरक्या गर्जना करूं लागला. " त्या राक्षसाच्या पुण्याईला आज आम्हीं पाळत ठेऊन गाठली आहे. तूं आड येऊं नकोस. तुला या कामाकरितां तुझ्या मालकानें ठेवला नाहीं. गरीबांच्या मुंडया मुरगळण्याचीं कामें तूं कर! त्या सावकाराची पुण्याई आम्हीं धुळीला मिळविणार आहोंत—"

" हां! खबरदार!—" शिवा त्यांच्या अंगावर चवताळून ओरडला. पुढले अभद्र शब्द त्याना त्यानें बोलूंच दिले नाहींत. " माणसं आहात कां हैवान? आपल्या बायकांच्या कपाळाचं कुंकू पुसून आला असाल तरच पुढें या! दुष्ट सावकाराचा सूड त्याच्या सालस सावित्रीवर घेतां!"

" शिव्या–शिव्या, आमच्या आड तूं येऊं नकोस!—दुसऱ्याच्या पुण्याईला चिडवलं म्हणजे कसा आगीचा डोंब उसळतो व तो जीवावरं उदार होऊन प्राणापेक्षांही अब्रुचा अपहार करायला कसा तयार होत असतो हें त्या नराधम सावकाराला आमच्या करणीनें एकदां कळूं दे. बाजूला हो. ही पुण्याई आमच्या हवाली कर–तुला इनाम मिळेल. "

शिवाच्या शौर्यापुढें त्या लोकांचा टिकाव लागला नाहीं. त्यांना हार घ्यावी लागली. त्यांना इतका विरोध होईल ही कल्पनाच नव्हती. अण्णासाहेबांच्या त्रासाला त्रासलेले त्यांचे नोकर निर्जीव झालेले असणार, आपण दरडावतांच पळ काढतील ही त्यांची कल्पना होती म्हणून ते तितक्याशा बंदोबस्तानें आलेच नव्हते. पण ऐन वेळीं शिवासारख्या महारानें त्यांचा सारा घात केला. ते लोक शिवाला ओळखीत होते पण महाराची जात इतकी धन्याशीं एकनिष्ठ राहील, पैशाला भाळणार नाहीं ही त्या लोकांची कल्पनाच नव्हती!

शिवाचें शौर्य व यश अन्नपूर्णाबाईनीं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलें. त्यांना त्याची धन्य वाटली. महार खरा तो ! पण त्यांना आपल्या पोटच्या पोरासारखा वाटूं लागला. घरीं जातांच अण्णासाहेबांच्या कानांवर त्याच्यासंबंधानें इत्थंभूत हकीगत घालावयाची असें त्यांनीं ठरवून टाकलें. अण्णासाहेबांनींही शिवाची हकीकत ऐकून त्याला वंशपरंपरेनें पांच हजारांची जमीन बक्षीस देऊन चांगला गबर करून सोडला !

इतकें मात्र खरें कीं शिवाला मनापासून वाटतें कीं आपला उद्धार झाला आहे, आपण अस्पृश्य नव्हें; अण्णासाहेबांनीं व आईसाहेबांनीं आपल्याला मूल लेखिल्यावर आपला अस्पृश्यपणा राहणार कसा !

शिवा अस्पृश्याचा देव देवळांत नव्हता. त्याचा उद्धारक देव अण्णा-साहेबांच्या—विशेषतः अन्नपूर्णामाऊलीच्या—अंतःकरणांत होता. तेथेंच त्याला देवाचें दर्शन झालें. अन्नपूर्णाबाईना तरी काय, खरें देवदर्शन शिवा अस्पृश्याच्या रूपांत लढतांनाच झालें.

लोक म्हणत असतात कीं शिवा महाराचा उद्धार झाला आहे; अण्णासाहेबांनीं त्याचा उद्धार केला आहे—

आणि लोक असेंहि म्हणाल्याचें ऐकायला येत असते कीं, अण्णा-साहेबांचाहि उद्धार झाला आहे ! शिवासारख्या अस्पृश्यानें त्यांचा उद्धार केला आहे !



# ३

# आत्या कीं मावशी?

लग्न झाल्या मुहुर्तापासून आतांपर्यंत एक दोन मुलें झालीं पण रामरावाचें कांतेवरील आणि कांतेचें रामरावावरील प्रेम रतिमात्र कमी झाले नाहीं. कांता आपल्या संसारांत पूर्ण सुखी होती. गृहराज्यांत पाय ठेवला कीं रामरावांवर कांतेचा पूर्णत्वानें ताबा चालत असे पण तो केवळ जुलुमाचा रामराम म्हणून नव्हे, तर कांतेच्या प्रेमाचा ताबा चालवून घेण्यांत रामरावाला अननुभूत सौख्य होत असे म्हणूनच होय! यापेक्षां कांतेला आणखी काय पाहिजे होतें! पतीनें आपल्या सर्वस्वी मुठींत असावें, आपण म्हणूं ती पूर्व असें पतीनें मान्य करावें, असेंच प्रत्येक स्त्रीला वाटतच असतें आणि त्यांतच ती आपल्या आयुष्याचें सारसर्वस्व मानीत असते.

## आत्या कीं मावशी ?

कांता आपल्या गृहकृत्यांत कितीही मग्न असो, रामरावाची बाहेरून यावयाची वेळ झाली म्हणजे हातांतलें काम तसेंच्या तसें खालीं ठेऊन दारीं जाऊन स्वागताकरितां म्हणून ती स्मितमुखानें उभी राहावयाचीच ! आणि रामराव बाहेरून कितीही दमून, भागून, त्रासून, वैतागून येवोत, दारीं कांतेच्या हंसऱ्या मुखकमलाकडे त्यांची दृष्टि गेली कीं त्यांचा सर्व शीणभार हरे ! आतांशा तर काय, लहानगी इंदू कडेवर आणि शरच्चंद्र आपल्या हातांनीं पायाला बिलगलेला, असे ते त्रिकूट आपल्या वाटे-कडे डोळे लावून उभें असलेलें रामरावांनीं पाहिलें म्हणजे त्यांना आपल्या गृहसौख्यापुढें स्वर्गसौख्य तुच्छ वाटूं लागलें होतें !

रामराव परगांवाहून आज घरीं यावयाचे होते. सकाळींच तसें पत्र आलें होतें, म्हणून कांतेची खूप तारांबळ उडून गेली होती. जरी आठ पंधरा दिवसांपेक्षां जास्त दिवस त्यांना बाहेरगांवीं जाऊन झाले नव्हते, तरी तितकीं युगें झालीं असावींत अशी कांतेची समजूत झाली होती. तिकडे रामरावाची तीच अवस्था झाली असेल, हेंही कांता जाणून होती आणि म्हणूनच रामराव आज येणार असें वाचल्यापासून तिच्या आनंदाला अस्मान ठेंगणें झालें होतें. गेल्या पंधरा दिवसांतल्या विरहावस्थेनें कांतेला इकडची काडी तिकडे करूं दिली नाहीं. मुलांची मात्र ती कोणत्याही प्रकारची हयगय करीत नव्हती इतकेंच काय तें ! रामरावांच्या बसावयाच्या जागेकडे ती फिरकली नव्हती. तिला तिकडे जावेंसेंच वाटत नव्हतें. गेलें कीं कसेंसेंच होऊन तिला उभें वारें सुटे.

पण आज रामराव येणार, असें कळतांच सारें घर झाडून, सारवून, प्रत्येक जिन्नस जिथल्या तिथें ठेवण्याकरितां तिची कोण घाई उडाली

होती. कामाला आज तिला नवें बळ प्राप्त झालें होतें. रामरावांच्या दृष्टीला कांहीं एक वाईट दिसतां कामा नये, त्यांच्या मनाला रंजिस वाटूं नये, घरीं येतांच प्रसन्नता वाटावी, हीच कांतेची उत्कट इच्छा आणि म्हणूनच ती वाऱ्यासारखी इकडून तिकडे भिरकत होती.

तिच्या पाठीमागें तिचीं मुलें धांवपळ करीत होतीं. ' आई, तूं हें काय करतेस ? पाहुणे येणार आहेत का ? बाबा केव्हां यायचे ? " यासारखे मुलांचे प्रश्नावर प्रश्न चालले होते. हातानें काम चालू असता आपल्या मुलांच्या वेड्यावांकड्या प्रश्नांना कांता उत्तरेंही देत होती.

" आई, बाबा मला कळीची मोटार आणतील नाहीं ग ? "

" हो ! " कांता उत्तर देई.

" दादाला मोटार नी मला ग काय ? " इंदू फुरंगटून विचारी.

" हो ! " कांतेचे मुलीला तेंच उत्तर असे.

" हें काय ग आई ? हो काय ? मला नको जा मोटार ! मला हात-सुटी बाहुली हवी ! तिला चिमुकला परकर हवा अन् मला इवलिशी बाजाची पेटी पण हवी ! " मुलगी जागच्या जागीं आंग घुसळत म्हणे.

" बरं तर ! " कांता असेंच कांहीं तरी उत्तर देई.

" मोटार आणल्यावर तूं काय करशील ? " बहिणीनें विचारलें.

" मी मोटार घेऊन फिरायला जाईन " शरद्नें उत्तर दिलें.

" अन् मला नाहीं नेणार ? "

" हो नेईन कीं ! "

" माझ्या नटलेल्या बाहुलीलासुद्धां ? "

" अं हं ! "

" मग मी नाहीं जा ! आम्हीं तुझ्या मोटारींतून येणारच नाहीं ! आम्हीं आपले घरींच खेळत बसूं ! तूं आईलाच मोटारींतून घेऊन जा!"

" अन् बाबांना ?—"

" बाबा माझ्याबरोबर खेळतील ! " मुलगी म्हणे. तिला मध्येंच शंका येई व ती निरसन करून घेण्यासाठीं ती कांतेला विचारी, "आई, बाबा माझ्याशीं खेळतील ना ? का दादाच्या मोटारीतून जातील ? "

" नाहीं ! "

" अन् तूं ? "

" नाहीं ! "

" मग तूंही खेळशील ? "

" हो ! आम्हीं दोघेही खेळूं हं ! " कांतेच्या या उत्तरानें इंदू आनंदानें बेहोष होऊन टाळ्या पिटीत नाचूं लागली.

बैठकीची जागा साफ करण्यांत कांता गुतली होती. तिनें बैठक झाडून घातली. खुर्च्या, कपाटें, टेबलें वगैरे पुसून साफ केली. मोठ्या टेबलाचे खण उघडून त्यांतील कागदपत्र खालीं वर करतांना कांतेची चौकस दृष्टी स्वाभाविकच कागदांवरील कित्येक प्रकारच्या मजकुरावर जाई. ती वाचल्यासारखें करी आणि झटदिशीं काम उरकलें पाहिजे म्हणून आठवण होऊन वाचनाचा मोह आवरून ती कामाच्या पाठीशीं लागे.

असें चाललें असतांच चाळतां चाळतां एक दोन कागदावरील मजकुरांवर स्वाभाविकच तिची दृष्टी वळली. हस्ताक्षर, लिहिलेला मजकुर, त्याचा मायना आणि खालची सही यांकडे कांता डोळे फाडफाडून पाहूं लागली. कागदावरील मजकूर तसा फारच थोडा होता; पण या

थोड्या मजकुरानेंच कांतेला, विंचवानें नांगी मारावे तसें केलें. तिची बुद्धी बधीर झाली; सर्वांग गाहिवरून गेलें. डोळ्यापुढें हिरवीं, पिवळीं, तांबडी, जांभळी चक्रें दिसूं लागलीं. सर्व जग तिच्या सभोंवार गरगर फिरत आहे कीं काय, असें तिला वाटूं लागलें. क्षणापूर्वीचा तिचा आनंद पार कोठच्या कोठें मावळला! सुखाच्या शैलावरून घसरून खोल दरीकडे कोणी तरी ढकलल्यामुळें आपण घसरत चाललों आहोंत, असा तिला भास होऊं लागला. तिचे कान बधीर झाले होते.

दारांत टांगा येऊन उभा राहिला होता. सामानसुमान हातांत घेऊन रामराव हंसतमुखानें दारांत शिरत होते; मुलांनीं त्यांना येतांना पाहिल्यामुळें त्यांची आनंदानें एकच तारांबळ झाली होती! "बाबा आले! बाबा आले!" अशा आरोळ्या ठोकीत मुलें आंतून बाहेर व बाहेरून आंत नुसतीं नाचत सुटलीं होतीं!

इतका गोंगाट चालला होता, तरी कांतेच्या तें गांवींही आलें नाहीं. ती जागच्या जागीं खिळल्यासारखी झाली होती. आपण घरांत आलों तरी कांता स्वागत करावयाला सामोरी आली नाहीं, याबद्दल प्रथम रामरावांना कांहीं वाटलें नव्हतें, तरी नंतर त्यांना त्याबद्दल कसेसेंच झाल्याखेरीज राहिलें नाहीं. मुलें येऊन त्यांना बिलगलीं होतीं. त्यांना तसेंच प्रेमानें कुरवाळीत बरोबर घेऊन ते कांता जिकडे होती तिकडे निघाले व ते कांतेपुढें येऊन उभे राहिले. तिच्याकडे त्यांची दृष्टी गेली. कांतेच्या डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या निघत आहेत, गाल लालभडक झाले आहेत, ओंठ थरथर कांपत आहेत, असें दृश्य रामरावांना दिसलें. रामराव दिङ्मूढ होऊन तिच्याकडे तटस्थपणें पहातच राहिले.

संशयाच्या जाळ्यांत कांता पुरी अडकली; ती इतकी कीं, तिला सारासार विचार मुळींच राहिला नाहीं. रामराव समोर येण्याबरोबर तिचा विवेक नष्ट झाला, शांतता सुटली व त्यांचें स्वागत करण्याऐवजीं ती त्यांना असें तोडून बोलूं लागली कीं न भूतो न भविष्यति ! तिनें त्यांचे एकसारखे वाभाडे काढले. "माझ्या सौख्याचा सत्यनाश केलात. प्रेमाची राखरांगोळी बनविलीत. माझ्याशीं कपटाचरण केलेंत ! असा कपटानें केसानें गळा कापायचा होता, तर त्यापेक्षां वीष घालून मला मारून कां टाकिली नाहींत ? पुरुषांची जातच कठोर, निर्दय, स्वार्थी, आतां चांगले डोळे उघडले. करा आतां कोणा सटवीबरोबर राज्य करायचें तें ! ही मी अश्शी माझ्या मुलांना घेऊन माहेरीं जातें. हें आपलें घर; ही आपल्या प्रियकरणीचीं पत्रें—मी उगाच कुणावर कुभांड घेत आहे असें नको वाटायला; चांगलं मुद्यापत्त्यानिशीं पकडलं आहे—आपलीं आपल्याला लखलाभ असूं दे ! मला कशाची गरज नाहीं ! "

याप्रमाणें कांता रामरावांना बोलबोल बोलली. ती तशीच उठली, मुलांना कसेबसे कपडे केले आणि माहेरीं चालती झाली. जातांना ज्यावरून ती इतकी पिसाळली होती तीं कागदाचीं चिठोरी तिनें रामरावांच्या अंगावर भिरकावून दिलीं होतीं. घराच्या बाहेर पडल्यावर मुलें मागें वळून पहात होतीं; रामरावांकडे परतण्यासाठीं वळवळत होतीं; अगदीं रडण्यापर्यंत मुलांची पाळी आली होती पण आईच्या अकांडतांडवापुढें तीं बिचारीं हरिण पाडसासारखीं जागच्या जागींच गुपचिप राहिलीं होतीं. कांतेनें आपल्या तोंडाचा एकसारखा पट्टा सोडला होता. रामरावांना तोंड उघडण्याचीही उसंत तिनें दिली

नव्हती. आणि तशी सवड तरी काय द्यावयाची ! पुरुष अशा वेळीं शपथेवरसुद्धां खोटें बोलतील ही कांतेची खात्रीच होती !

आपल्या अंगावर जीं चिठोरीं कांतेनें फेंकली व आपल्यावर ज्यामुळें इतकी आग पाखडली, त्या चिठोऱ्यांकडे रामरावांचें पुष्कळ वेळानें लक्ष गेलें व मग त्यांच्या डोक्यांत कांतेच्या विक्षिप्त वागण्याचा प्रकाश पडला. ' मला जर बोलायची फुरसद दिली असती तर एकदोन शब्दांनींच खुलासा केला असता व संशयनिरसन करून टाकलें असतें, इतकी ही साधीसुधी गोष्ट आहे ' असें त्यांच्या मनांत आलें.

पण गोष्ट होऊन चुकली होती. बराच वेळपर्यंत निरनिराळ्या प्रकारचे विचारांचे वारे वाहिल्यानंतर रामरावांनीं आपल्या मनाला मोठ्या प्रयासानें कह्यांत आणलें आणि लगेच अमुकच तऱ्हेनें वागावयाचें असा दृढ संकल्प करून टाकला. ' तापलेली कांच तशीच निववूं देण्यांत शहाणपणा आहे. पाण्याचा थेंब पडला तर तडकून जायची ! तिची तीच, चूक उमगली म्हणजे आपोआपच शुद्धीवर येईल ! ' असा कांहींसा विचार रामरावांच्या मनांत येऊन गेला.

— २ —

कांता रागाच्या झपाट्यांत माहेरी आली खरी. एक दिवस, दोन दिवस, आठ दिवस झाले; पण तिच्या मनाला स्वस्थता येईना कीं चैन पडेना. बरें, बाहेर बोलण्याची चोरी ! कोणाला काय बोलावयाचें ! पतीचें व आपलें भांडण झालें; पति नीचपणानें वागला; त्यानें प्रेमाला कोलीत

लावली हें सांगावयाचें कोणाजवळ व कां ! उभयतांच्या अकृत्रिम प्रेमाचा पूर्वीच डंका वाजलेला ! तेंही तिला अवघड झालें. माहेरीं येण्याचें कारण नव्हतें तेव्हां माहेरच्या माणसांना जरा चमत्कारिकच वाटलें. बोलावणें धाडूनही जी कांता यावयाची नाहीं ती आपण होऊन आली कशी ! आपल्या पतीशिवाय तिला चैन पडतें कसें ! आणि आली तर इतके दिवस राहिली आहे कां ! असें माहेरचीं माणसें बोलत नव्हतीं पण शेजारीपाजारी विचारल्याखेरीज कसे राहणार ! कोणी कांहीं आणि सहज जरी विचारलें तरी तें मुद्दाम विचारलें आहे असें वाटून तिला तें भाल्यासारखें बोंचे ! प्रत्येकाला ‘ उगीच आलें ’ हें लंगडें सांगणें सांगतांनाही तिला मेल्यापेक्षां मेलें करी !

पहिल्या प्रथम कांहीं दिवस तिला वाटलें, रामराव आपली चूक कबूल करून नाक घांशीत येतील, क्षमायाचना करतील पण अनुभवानें ती तिची कल्पना लटकी ठरली. मग तिचें मन तिला सांगूं लागलें, ‘पुरुषांना काळीजच नसतें. असलें तर तें उलटें तेव्हां ते कसचे येतात अन् क्षमायाचना करतात ! ’ हाही विचार तिच्या डोक्यांत अधिक वेळ टिकला नाहीं. कारण आजवरचें रामरावांचें वर्तन विरुद्ध साक्ष देत होतें. ‘ मग काय ! आपलीच चूक ! आपणच उतावीळपणा केला आहे ! आपणच हवें तसें टाकून बोलून थेट माहेरची वाट धरली आहे ! त्या घाणेरड्या चिठोऱ्याबद्दल तिकडून काय खुलासा होतो, हें ऐकावयाला आपण थांबलों नाहीं कीं तितकी तिकडे सवड सुद्धां दिली नाहीं. तेव्हां आपलीच चूक आहे. आणि तीच आपल्याला माहेरीं अशी मनस्तापाच्या रूपानें, मुलांच्या त्रासानें, शेजाऱ्यांच्या टोंचण्यानें भोगावी लागत आहे.

असला त्रास इथें सहन करून घेऊन रहाण्यापेक्षां आपलें घरीं गेलेलेंच काय वाईट ! ' कांतेच्या मनानें विचारांची याप्रमाणें उलट घेतली खरी, पण एकदम जावयालाही तिचें मन तयार होईना म्हणून तिनें प्रथम एक कृतापराधाचें व क्षमायाचनेचें पत्र पाठविण्याचें ठरवून तसें पत्र टाकलें व उत्तर आल्यावर जावयाचें निश्चित केले.

याच वेळीं कांतेच्या आणि रामरावांच्या पत्रांचा आट्यापाट्यांचा खेळ झाला. रामरावांनीं बरेंच दिवस वाट पाहून मग कांतेला पत्र टाकलें होतें. ' चूक तुझी आहे. ती तुझ्या ध्यानीं आल्यावर तूंच माझी क्षमा मागशील. आणि माझी चूक सिद्ध झाली तर मी तुझी प्रांजलपणें क्षमा मागण्यांत मुळींच कमीपणा मानणार नाहीं. पण जगाला दाखविण्याचा तमाशा पुरे झाला. माहेरीं असे महिनोमहिने राहणें लोकदृष्ट्याही वाईट असते, हें विसरूं नकोस. तात्बडतोब निघून ये. मला येथें जसें चैन पडत नाहीं, त्याप्रमाणें तुझेही दिवस तेथें कसे जात असतील, याची मला पूर्ण कल्पना आहे. तरी शहाणपणा करून इकडे निघून ये ' असें रामरावांचें सरळ व स्पष्ट पत्र होतें.

कांतेला हायसें झालें. अधिक कोणताही विचार न करतां जशी आली तशीच ती मुलाना घेऊन परत आपल्या घरीं जावयाला निघाली. या खेपेच्या तिच्या साऱ्याच वागण्याचें तिच्या माहेरच्या मंडळींना मोठें गूढ पडलें होतें. पण मंडळी कोणीच कांहीं तिला बोलली नाहींत कीं कोणी तिला अडथळाही केला नाहीं.

कांता घाईघाईनें आपल्या घरीं आली पण दारांत येते तों तिला दाराला कुलूप दिसलें ! दाराला कुलूप पाहून पुन्हां तिला धस्स झालें !

'आहे काय हें ! कुठें जायचें झालें ! दाराला कुलूप कां ?' या प्रश्नांनीं कांतेला नुसतें भंडावून सोडलें. ती तशीच पायरीवर बसली.

ज्यावेळीं कांतेचें पत्र रामरावांच्या हातांत पडलें त्याच वेळीं दुसरेंही एक महत्त्वाचें पत्र रामरावांना आलें होतें. ज्या व्यक्तीचें तें पत्र होतें ती व्यक्ति हॉस्पिटलमध्यें अत्यवस्थ होती. 'आपण सहकुटुंब मुलां-बाळांसह यावें. आपल्या सौभाग्यवतीला पहाण्याची व तिच्या सह-वासाची माझी इच्छा पुरवावी. माझ्या मृत्यूसमयीं आपलीं मुलें माझ्याजवळ असलीं म्हणजे मरता मरतां देखील मला फार बरें वाटेल' अशा अर्थाचें फार जिव्हाळ्याचें व कळकळीचें पत्र रामरावांना आलें होतें. पत्र हातीं पडताच कोणत्याही प्रकारचा विचार न करतां एकदम तिकडे जावयाचें त्यांनीं ठरविलें होते. कांता केव्हां येईल हें नक्की नव्हतें आणि तसा कालक्षेप करण्यात अर्थही नव्हता. घरीं लिहून ठेवावें, किल्ली शेजारीं ठेऊन द्यावी, चिठ्ठी पहातांच ती तिकडे आल्याखेरीज राह-णार नाहीं असा भरंदिर्शी विचार ठरवून ते तडक निघूनही गेले होते.

कांता घरीं आल्याचें कळतांच शेजारणीनें किल्ली आणून दिली आणि जेवढी माहिती होती तेवढी तोंडीं सांगितली. ती जशीच्या तशी कशी असणार ? त्यांत कांहीं पदरचें घातलें गेलें तर कांहीं मुळांतलें गाळलें गेलें. त्या निरोपानें कांतेचें मन फिरून बिथरलें. तिनें धडपडत कुलुप काढलें. मुलांना घेऊन ती आंत गेली. रामरावांच्या टेबलावर तिला चिठ्ठी दिसली ती तिनें वाचली.

"काय ! स्वारी तिकडे गेली ! अन् मलाही तिकडे ताबडतोब मुलांना घेऊन बोलावलं आहे ! पुरा माझा छळ करायचा संकल्प केला आहे

कीं काय ! ज्या सटवीचें तें पत्र, तिचेच पाय धरायला जाणं झालं, तिच्याकडेच मला बोलावलंय !" कांतेचें चित्त फिरून बावरलें. ती चिडली, वैतागली व आपल्याशींच प्रश्नोत्तरें करूं लागली.

" स्वारींच्या पत्राप्रमाणं जायला हवं ! "

" कशाला ! "

" कशाला म्हणजे ! माझ्या सवतीपुढें मला नेऊन, माझी मानहानी करून, माझ्या नाकाला मिरच्या लावयाच्या आहेत ना तिकडे !"

" काय व्हायचं असेल तें होऊं दे. मी तिकडे मुळींच जाणार नाहीं ! सवतीच्या दारीं मी कां जाईन !"

" गेलं तर काय होईल !"

" ती माझी मानखंडना करील ! "

" ती मृत्यूशय्येवर आजारी आहे तिची मला भेटायची इच्छा आहे"

" सगळं खोटं ! सारं लटकं ! माझा सूड घ्यायचा, नक्षा उतरायचा तो अशा रीतीनं—असा तिकडचा डाव आहे ! मी ओळखलंय ! मला तिच्यापुढें घेऊन जायचं. 'ही पहा तुझ्या उरावर सवत आणली आहे—ही तुझ्यापेक्षां रूपानें तशीच गुणानेंही श्रेष्ठ आहे ! तूं कशीही वाग. मला तुझी पर्वा नाहीं !' असं स्वारी मला सांगणार आहे ! "

" असं स्वारी आजवर कधीं म्हणाली आहे का ! मन चिंती तें वैरी न चिंती म्हणतात ! माझ्याच मनाचे हे सारे खेळ नसतील कशावरून !"

" काय करावं ! जावं ! नाहीं ! जाऊन तर येऊं दे—पण—"

" नाहीं पण, जाऊं याच ! माझी सवत एकदां मला पाहूं दे तर खरी ! दोघांचीही एकदां चांगली खरडपट्टी काढूं दे मला ! मी कांहीं

अशी लेचीपेची नाहीं ! गोगलगाय नी पोटांत पाय ! स्वारीच्या पापाचं माप पदरांत घालायचीच ही संधि आहे ! ती मी तरी कां वाया दवडूं ? "

कांतेचा विचारप्रवाह अशा रीतीनें वहात येऊन त्या स्थळीं थबकला. ती आज दमून आली होती. तेव्हां आजच्या आज तिकडे न जातां दुसरे दिवशीं जावयाचें असें तिनें मनाशीं ठरविलें. मनाचा निश्चय झाल्यावर तिचें तिलाही हलकें वाटूं लागलें. मग ती आपल्या व मुलांच्या जेवणाखाणाच्या उद्योगाला लागली !

— ३ —

हॉस्पिटलच्या फाटकांतून कांतेची गाडी आंत शिरून व्हरांड्यापुढें जाऊन उभी राहिली, तेव्हां रामराव व्हरांड्यांतल्या खांबाला टेकून उभे राहिलेले तिला दिसले. कांता मुलांना घेऊन खालीं उतरली. त्यांची मुद्रा गंभीर, उदास, निराश, अशी दिसतांच कांतेच्या काळजांत चर्रर्र झालें ! ती ज्या युद्धाच्या तयारीनें आली होती, ती तयारी प्रथमच अर्धीमुर्धी निरुपयोगी झाली ! आपण आलेले पहातांच 'अखेर नाक मुठींत धरून पायाजवळ आणविलें कीं नाहीं ' या विचाराचा सैतानी आनंद रामरावांच्या मुखावर झळकलेला आपल्याला पहावा लागेल, असा कांतेचा कयास होता. तो फोल ठरला, तेव्हांच ती थिजली. ' कुणीकडे जायचं ? ' या अर्थानें तिनें रामरावाकडे पाहिलें. न बोलतांच रामराव पुढें चालूं लागले. कांता मुकाट्यानें त्यांच्या पाठोपाठ निघाली. तीं सर्व एका खोलींत शिरलीं.

खाटेवर एक स्त्री—कांतेच्याच वयाची—मृत्यूची शांतपणें मार्गप्रतिक्षा करीत पडली होती. खोलींतील वातावरण शांत, गंभीर, उदास असें होतें. कोणत्याही प्रकारची गडबड न होईल अशा रीतीनें मंडळी तेथें आली. रामरावांनीं झटकन् बाजूच्या खुर्च्या खाटेजवळ आणून ठेवल्या. एका खुर्चीवर कांता बसली; दुसरी खुर्ची रामरावांनीं अडविली. इंदू रामरावांना बिलगली होती, तर शरच्चंद्र कांतेच्या मांडीवरच बसला होता. रुग्णाईतेनें अजून डोळे मिटलेलेच होते. चाहूल लागलीशी वाटली म्हणून त्या स्त्रीनें डोळे उघडले. तिच्या दृष्टीस आपल्या खाटेजवळ रामराव सपत्निक बसलेले दिसले. कांतेला आणि तिच्या मुलांना पाहून त्या स्त्रीला विशेष समाधान झाल्याचें रामरावांना दिसलें.

'हें कोण आलं आहे पहा!' असें रामराव म्हणणार तोंच पांघरुणांतून आपला अशक्त हात हलकेच बाहेर काढून कांतेच्या मांडीवर ठेवीत तीच क्षीण आवाजांत उद्गारली " आलीस ताई ! तुला पाहून मला फार बरं वाटलं बघ ! "

तो आवाज, त्यांतील कातरता, स्नेह इत्यादिकांमुळें व आपल्या अंगावर हलक्याच फिरवल्या जाणाऱ्या क्षीण हाताच्या त्या स्पर्शामुळें कांतेच्या अंतःकरणांत विलक्षण गडबड उडून गेली. आपण समजत होतों त्यापेक्षां अगदींच निराळें दृश्य येथें आहे, हें पहातांच कांतेच्या चित्तवृत्ति थरारल्या. पूर्वीच्या सर्व प्रकारच्या गैरसमजावर पडदा पडून स्त्रीस्वभावसहज प्रेमळपणानें उसळी मारली व भागिनीभाव प्रगट झाला. ती तशीच पुढें सरली. तिनें तिच्या अंगावरून, कपाळावरून, केसावरून हात फिरवीत म्हटलें, " तुम्हांला किनई लवकर आराम पडेल हो ! "

कांता तिच्या केसावरून व ती कांतेच्या केसावरून हळुवार हात फिरवीत असतां तें दृश्य निश्चलपणानें रामराव पहात होते. त्यांना त्या वेळीं काय वाटत होते कोण जाणें !

" तुम्हीं लवकर बऱ्या व्हाल ! काळजी करूं नका ! तुम्हांला बरं वाटेपर्यंत आम्हीं मुळींच दूर होणार नाहीं अं ! " कांता पुन्हां म्हणाली.

ती रुग्ण स्त्री तें ऐकून नुसतीच शुष्क हंसली. त्या हास्याचा अर्थ किती भीषण होता ! ती मंदपणें म्हणाली, " ताई, तुझ्या बाळांना, तुझ्या पतीला, असं डोळे भरून पहायची इच्छा होती ती पूर्ण झाली. माझ्या मनींची हौस पुरली; माझी तृप्ति झाली. तुमचा पुष्कळ सहवास मिळावा, अशी अपेक्षा होती; भगवंताची इच्छा तशी नव्हती ! पूर्वी मिळाला नाहीं, पुढेंही शक्य नाहीं. मिळाला हा एवढाच ! तेवढंच माझं भाग्य होतं म्हणायचं ! यांतच संतुष्ट राहिलं पाहिजे !"

एवढें म्हणून ती थांबली. एवढ्यानेंच ती श्रमली होती. बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. त्या स्थितींत तिनें मुलांना जवळ घेण्याची इच्छा दर्शविली. रामरावांनीं दोनही मुलांना जवळ दिलें. तिनें त्यांना कुरवाळलें व अत्यंत प्रेमानें त्यांचें चुंबन घेतलें. उशाशीं मोसंबीं होतीं, तोच खाऊ तिनें मुलांच्या हातीं ठेवला.

हृदयांत कालवाकालव चालू असतां कांता मुकाट्यानें पहात होती. रामरावांकडे वर डोळे करून पहाण्याचा तिला मुळींच धीर होत नव्हता. रामरावच जवळ येऊन म्हणाले " शांते, कशाला अधिक बोलून श्रम घेत आहेस ? स्वस्थ पडून विश्रांति घे ना ! कांता आली, तुला भेटली. आम्हीं तुझ्याजवळ आहोंतच. तुझ्या मनासारखं थोडं तरी झालं ! "

मुलें बराच वेळ स्तब्ध होतीं, तीं आतां चुळबुळ करूं लागली. करड्या पण प्रेमळ आवाजांत रामरावांनीं मुलांना " हं ! कुणी दंगा करायचा नाहीं इथं ! मुकाट्यानं देवासारखं बसायचं ! " म्हणून बजाविलें.

मुलेंच तीं ! तितक्यांतच थबकलीं. इतकेंच नव्हे, तर वडील रागावले आहेत अशी कल्पना होतांच त्यांचा राग घालविण्यासाठीं इंदू झटकन् त्यांना बिलगली. तिनें चिमुकल्या हातांचा विळखा त्यांच्या गळ्याला घातला. जवळ घेतलेल्या मुलाला हातानें थोपटीत कांता स्थिर नजरेनें शांतेच्या पवित्र मुखाकडे पहात बसली होती. मुलीला तशीच बिलगलेली ठेवून रामरावही पुस्तकांत लक्ष घालण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होते.

मध्येंच मुलीनें आपलें तोंड रामरावांच्या कानाजवळ नेलें आणि हळूच विचारलें, " माझा मुका घेतला त्या या कोण आहेत आपल्या ? "

" तुझी आत्या ! " रामरावांनीं तितक्याच हलक्या आवाजांत सांगितलें.

त्याच वेळीं मुलानें कांतेला तसाच मूक प्रश्न अंगुलीनिर्देश करून विचारला, त्याला " ही तुझी मावशी " असें कांतेकडून उत्तर मिळालें.

कांहीं वेळानें मुलें एकत्र झालीं त्यावेळीं सहज प्रश्नोत्तरें उत्पन्न होऊन शांतेच्या नात्याबद्दल भांडणापर्यंत पाळी आली. दोघांचीही तक्रार मातापित्यापर्यंत गेली. ' आत्या कीं मावशी ? ' हें खरें करून घेण्या-करितां तो वाद कांतेपुढें आला त्या वेळीं तिला भारीच चमत्कारिक झालें.

" शांता ही मुलांची मावशी कीं आत्या ? आणि आपली कोण ? बहीण, नणंद कीं—? " या प्रश्नांनीं तिची नुसती त्रेधा उडवून दिली !

रामराव एक अक्षरही अजून कांतेशीं बोलले नव्हते. शान्ता कोण ? तिचीं पत्रें कां आलीं होतीं ? रामराव तिच्या शुश्रुषेला कां येऊन

राहिले होते ! आपल्याला कां बोलावण्यांत आलें ! स्वतः मृत्युशय्येवर असतां आनंदातिशयानें तिनें आपला परामर्ष कां घेतला ! 'ताई' म्हणून कां गौरविलें ! हा प्रश्न तर कांतेला सुटतां सुटत नव्हता. रामरावांना विचारण्याचें सामर्थ्य तिच्यांत उरलें नव्हते. स्वस्थ बसावें व जें जें होईल तें पहावें अशीच कांतेच्या मनाची अवस्था झाली होती.

— ४ —

कांता मुलांसह भेटाययाला आल्यामुळें शांतेला अत्यानंद झाला खरा पण त्याचा परिणाम चांगला झाला नाहीं. त्या आनंदाचा बेसुमार ताण अशक्तपणांत पडून ती अधिकच अशक्त झाली. जेमतेम दोन दिवस ती जिवंत होती. तेवढ्या अवधींतसुद्धां ती कांतेजवळ किती तरी बोलली. तरीही कांतेची आपल्याकडे पहाणारी नजर अजून निवळली नाहीं, हें तिच्या दृष्टींतून टळलें नव्हतें. मरतांना तिनें मुलांना जवळ घेऊन आशीर्वाद दिले, कांतेला मनापासून सौख्य चिंतिलें व रामरावांकडे सकरुण नजरेनें पहात पहात परलोकीं प्रयाण केलें.

स्त्रीस्वभावानुसार कांतेनें आकांत केला. ती तिच्या शवावर पडून मनमुक्त किती वेळ तरी अश्रु ढाळीत होती. रामरावांना हुंदका आला, डोळ्यांतून पाण्याच्या धारा गळल्या त्या त्यांनीं प्रयासानें आवरल्याही. पण यापैकीं कांतेला किंवा कोणाला कांहींच दिसलें नाहीं.

शांतेच्या मृत्यूनंतर एक पाकीट कांतेच्या हातीं सांपडलें. तें पत्र शांतेनें कांतेलाच लिहिलें होतें; तें पत्र असें :—

*कांताताई—*

हें पत्र मी तुला मुद्दाम लिहित आहे. तूं मला ओळखत नाहींस पण मी तुला ओळखतें. तूं माझ्यावर रागावलीस—मला आपली सवत समजलीस—तें शक्य व सरळही आहे. तुला जर माहीतच नाहीं तर तूं काय करणार? पण मी हें फार दिवसांपासून ओळखलें. मी तुला भाग्याची समजतें. तुझ्या भाग्याचा हेवा मी कधींही केला नाहीं; करीत नाहीं. मी भाग्यहीन झालें म्हणून तुझ्या भाग्याचा हेवा कां करावा?

तुझे पति माझ्या पत्राला मान देऊन येथें ज्या वेळीं धांवत आले ते एकटेच आले; आणि त्यांच्याजवळ तुझी चौकशी करतां तूं त्यांच्यावर रागावून माहेरीं निघून गेली आहेस हें जेव्हां मला कळलें, तेव्हां मला फार वाईट वाटलें. त्यांतल्या त्यांत तुझ्या रागाला कारण माझीं तुझ्या पतीला गेलेलीं पत्रेंच होतीं, हें समजलें तेव्हां माझी दुःखभारानें छातीच फुटून गेली. इच्छा किंवा कल्पनाही नसतांना मी तुझ्या आणि तुझ्यापेक्षांही तुझ्या पतीच्या दुःखाला कारण झालें, यामुळें मी दुःखानें वेडी होण्याची पाळी आली. ताई! तुझ्या पतीला दुःख व्हावें, ज्यांचें तुझ्यावर अनिवार प्रेम त्या तूंच त्यांना गैरसमजानें दुःख भोगावयाला भाग पाडावें ही कल्पनाच सहन होण्यासारखी नव्हती.

ताई! तुला माहीत नाहीं. आम्ही दोघे हायस्कुलांत आणि कॉलेजांत एका वर्गांत होतों. मला त्यांचा स्वभाव, रूप, हुषारी, कीर्ति अतिशय आवडे. मी हें कधीं बोलून दाखवीत नसे व तुझ्या पतीसही त्याची दाद कधींच नव्हती. मी मुखदुर्बळ; तुझे पती निष्कपटी! ज्या क्षणीं माझें हृदयपुष्प त्यांच्या चरणीं कायमचें वाहिलें आहे हें सांगण्याचा हिय्या मी करणार होतें, त्याच क्षणीं अत्यंत आनंदाच्या भरांत रामराव धांवत आले आणि त्यांनीं मला सांगितलें, ' शांते, मी आज सौख्याचें शिखर गांठलें. ज्या मुलीवर मी अतोनात प्रेम करीत होतों आणि जी माझी सहधर्म-

*चारिणी व्हावी अशी माझी महत्त्वाकांक्षा होती त्याच मुलीशीं*—आणि कांताताई, ती मुलगी तूंच—माझा विवाह निश्चित झाला आहे ! तूं माझ्या विवाहाला अवश्य आलें पाहिजेस. '

ताई, रामरावांचा त्या वेळचा आनंद गगनांत मावत नव्हता. माझे ओठीं आलेले शब्द मात्र जसेच्या तसेंच पोटीं परतले. मला दुःख झालें नाहीं असें नाहीं. पण मी त्याचा पत्ता रामरावांना मुळींच लागूं दिला नाहीं, कीं त्यांच्या अत्यानंदाचा चुकूनही विरस केला नाहीं. मी भाग्यहीन झालें; तूं भाग्यशाली ठरलीस. क्षणभर त्यावेळीं तुझा मला हेवा देखील वाटला. पण रामरावांना तुझ्या सहवासानें खरें सौख्य लाभणार आहे; त्यांचें प्रेम तुझ्यावर आहे तेव्हां तेंच होणें योग्य; माझें त्यांच्यावर प्रेम असून उपयोग काय ? माझ्याशीं विवाह झाला असता तर मी सुखी झालें असतें, पण रामरावांच्या सुखाची वाट काय होती ? म्हणून देवानें केलें तें चांगलेंच केलें असा विचार करून भावी आयुष्याचा मार्ग मी आंखला.

रामराव सुखी झाले; तुझ्या सहवासांत दंग झाले. दोन मुलेंबाळेंही झाली. तूं त्यांचें किंचितही कमी पडूं देत नाहींस. हें ऐकून मनाला सौख्याच्या शिखरीं गेल्यासारखें होई ! अशा वेळीं मन अनावर होई. वाटे कीं, उठावें आणि तुमच्यांत यावें. तुमचा आनंद डोळ्यांनीं पहावा. पण दुसरे विचार येत. तुला कदाचित् वाईट वाटेल, तूं गैरसमज करून घेशील; तुझ्या सुखाच्या संसारांत अकारण असंतोषाचे वारे वाहूं लागतील आणि म्हणून मी माझ्या मनाला आवर घाली.

पण इतकें करून माझ्या साध्यासुध्या पत्रांनीं तुझा गैरसमज झालाच ! तूं पत्राचा खुलासा विचारला नाहींस किंवा त्यांना करूं दिला नाहींस ! ताई, तुमच्या विवाहापासून आमचीं नातीं बदललीं होतीं ना ? मग नव्या नात्यांनीं वागूं सुद्धां नये ! पत्रें पाठवूं नयेत ! मी पत्रें पाठविलीं त्यांत काय बिघडलें ? यांत माझी किंवा तुझ्या पतीची कसली चूक होती ?

ताई, मी अविवाहित आहें. जन्मभर तशीच राहणार ! माझें आयुष्य किती आहे कुणास ठाऊक ! प्रेमाला एकच वाट माहिती असते. प्रेमाला प्रेमविषयावर कधींही रागावतां येत नाहीं. एकदां तूं येथें ये, मन शांत कर, त्यांच्याकडे पहा म्हणजे तुला तुझी चूक समजेल.

मी आतां आजारी आहे. तूं ये आणि मला भेट. मी तुझा सर्व गैर-समज दूर करीन. मी तुझी सवत नसून सखी आहे–मैत्रिण आहे–बहिण आहे हें पटवून देऊन रामरावांकडे पाहण्याची तुला नवी दृष्टि देईन अशी मला आशा आहे. तूं आल्यावर रामरावांना, तुला, तुझ्या मुलांना एकत्र पाहून मला अत्यंत आनंद होईल व माझ्या डोळ्यांचें पारणें फिटेल. तर एकदां इकडे ये व गरीब बहिणीचा आशिर्वाद घे अशी इच्छा करणारी,

तुझी दुर्दैवी अज्ञात बहिण

**शांता**

कांता पत्र वाचीत होती. तिच्या डोळ्यांतून अश्रु सारखे वहात होते. पत्र भिजून चिंब झालें होतें. अक्षरें मात्र पुसटलीं जात नव्हतीं. कशी जाणार ! तीं अक्षरें शांतेनें आपल्या रक्ताची शाई करून लिहिलीं होतीं. आपल्यावर निरुपम प्रेम ठेवणाऱ्या शांतेसारख्या देवीचा व आपल्या पतीचा आपण अक्षम्य अपराध केला या जाणीवेनें कांतेच्या हृदयाचे लचके तोडल्यासारखे होऊं लागले. रामराव शून्यमनस्क होते तरी त्यांच्या दृष्टींत 'शांता कोण होती हें आतां तरी ओळखलं का ?' असा प्रश्न तिला दिसला. ती बिचारी काय उत्तर देणार ? 'मी चुकलें; क्षमा करा' असें म्हणावयालाही तिची जीभ वळत नव्हती !



# ४

# वाजिऱ्या !

आगोट लागली; मनासारखी मेघराजानें कृपा करावयाला सुरुवात केली. पहिल्यांदा सर्वांना वाटलें होतें कीं या सालीं मेघराजा डोळे वटारणार आणि शेतकऱ्यांच्या तोंडचें पाणी पळविणार ! गांवगन्ना शेतकऱ्यांनीं एक जुटीनें पांढरीच्या देवाला कौल लावायला व नवससायास करावयाला आरंभ केला. लहान मुलांनीं करगोटें तोडून, लंगोट्या भिरकावून देऊन पाटावर ' पावसाच्या ' देवाची मृण्मयी मूर्ति करून, तीवर गुलाल वगैरे टाकून दारोदार जाऊन 'पाऊसपाणी आभाळदाणी ! ' असा पाऊस मागावयाला आरंभ केला. घरोघरच्या गृहलक्ष्म्यांनीं मेघराजांनीं कृपा करावी म्हणून आपल्या दारीं आलेल्या 'पाऊस'माग्याच्या डोकीवरील देवावर हंसत हंसत घरांतील सांचवणीचें पाणी तांब्यातांब्या आणून

ओतलें ! मुलांची, मोठ्या माणसांची, बायाबापड्यांची आतां खात्री झाली कीं मेघराजा आपल्यावर खास कृपा करणार ! भोळा भाव सिद्धीस जातोच म्हणतात तसेंच झालें ! पावसाळा लागला ! नद्यानाले भरून वाहूं लागले ! शेतवाड्या गारीगार झाल्या ! शेतकऱ्यांना अत्यंत आवडती अशी शेताला घात आली ! जिकडे तिकडे धांवपळ दिसूं लागली. शेतकरी डोकीवर शेतीचीं आयुधें घेऊन हातांत कासरा धरून घरचे बैल मागेंपुढें चालवीत शेताचा मार्ग धरलेले, तर त्यांचीं लहान मुलें गाईगुरें संभाळण्यांत दंग झालेलीं ! किती सुंदर, उदात्त आणि जिवंत दृश्य तें ! खरा शेतकरी पहावयाचा तर याच वेळीं पहावा ! त्याची घाई, चपळाई, उल्हास व कार्यनिष्ठा पाहावयाची असेल तर आगोटीला, शेताला घात आली असतांना, पेरणीची धांदल चालू आहे अशा वेळींच पहावी.

ह्या वेळीं आमच्या म्हादबाच्या घरीं तरी काय हुबेहुब हाच प्रकार चालूं होता. म्हादबा सकाळपासून संध्याकाळपर्यंत आपल्या बजिऱ्याला घेऊन पैरेकरी होऊन दुसऱ्याच्या शेतांतून मशागतीकरितां राबत होता. तसाच पैरेकऱ्यांनाही आपल्या जमिनींत राबवीत होता ! त्याची घरधनीन गुणाबाई, कणग्यांतून, टोपल्यांतून राखेंत मिसळून जपून ठेवलेलें हरतऱ्हेचा बीं–बिवळा चाळून झाडून तयार ठेवण्यांत एकसारखी धडपडत होती ! मनासारखा पाऊस झालेला असल्यामुळें आणि जमीन वेळींच नांगरून तापवून तयार केलेली असल्यामुळें शेत पेरतांना म्हादबाचा हुरूप शतगुणीत झाला असल्यास नवल काय !

म्हादबाची तशी पाहिली तर स्वतःची अशी फारच थोडी शेतवाडी होती. पण तो जातिवंत शेतकरी असल्यामुळें रात्रंदिवस मेहनत करून

आपल्या शेताचा कोपरान्कोपरा असा बहारदार पिकवीत असे कीं वाः ! उभा गांव त्याच्या शेताकडे नुसता टकमक पाहात असे ! जातिवंत शेतकऱ्याला आपलें शेत कसें रंगारूपाला आणावयाला पाहिजे हें सांगावयाला का पाहिजे !

आणि असे म्हादबाच्या पदरीं जीव तरी किती होते ! एक तो स्वतः, त्याची गृहलक्ष्मी गुणाबाई, त्याचा छोटा व लाडका पोर मुरारी ! एक गाय, एक म्हैस, एक शेळी, एक विश्वासु कुत्रा आणि घरच्या गायीचा लहानपणापासून तयार केलेला बैल—वजिऱ्या ! म्हादबाच्या घरीं माणसांत आणि जनावरात भेदभाव नव्हता. त्याची जपणूक माणसापेक्षांही जनावरांना ज्यास्त असे ! आणि कोणाही जातिवंत शेतकऱ्याचें असेंच असतें ! गायीचें सर्व दूध तिच्या लहान गोऱ्ह्याकरितां जावयाचें, म्हशीचें दूधदुभतें घरांतील माणसांना ठेवावयाचें; शेळीवर, घराची आणि शेताची जागरूक राहून विश्वासानें राखण करणाऱ्या मोत्या कुत्र्याला पोसावयाचा ! आणि **वजिऱ्या** बैल तर काय त्याचा प्राणाहून प्यार ! तो जितका खाईल तेवढा थोडा ! त्याच्याकरितां मारवेल राखून ठेवलेला असावयाचा ! त्याचा पेंढीचा रतीब कधींच चुकावयाचा नाहीं ! वजिऱ्याच्या जिवावर तर म्हादबाच्या साऱ्या उड्या आणि हौसा–मौजा !

वजिऱ्याची जशी निगा राखली जात असे, तसेंच त्याच्याकडून म्हादबाला अव्वल दर्जाचें कामही मिळत असे. कोठेंही नेला तरी त्याला तो धुरीला जोडीत असे. वजिऱ्याला धुरा जशी शोभत असे, तसेच आपल्यावरील तो जबाबदारीचें काम पारही पाडीत असे. म्हादबा संध्याकाळीं वजिऱ्याला कामावरून घरीं घेऊन येत असतां वजिऱ्या वशिंड

हालवीत, शिंगांना ऐटदार डौल देत, उमेदीनें चालत गांवांत शिरतांना अशी गंभीर डरकाळी फोडी कीं तिच्या योगानें म्हादबाच्या अंगावर अभिमानाचे रोमांच तरारून उठत ! त्या डरकाळीचा प्रतिध्वनि गांव-भर प्रतिध्वनित होई तेव्हां गांवांतल्या मुलांबाळांतही एकप्रकारचें नवें कुतूहल निर्माण होई ! डरकाळीचा ध्वनि कानीं येतांच 'ही म्हादबाच्या वजिऱ्याची डरकाळी !' असे कित्येक जणांच्या तोंडांतून एकदमच उद्गार निघत ! डरकाळी ऐकतांच गुणाबाईचे हात जागच्याजागींच थांबत आणि तिचें लक्ष वजिऱ्याच्या आल्हादकारक डरकाळीकडे वेधून राही !

**वजिऱ्या** दारीं येतांच गुणाबाईनें लगबगीनें पुढें येऊन त्याच्या अंगावरून प्रेमानें हात फिरवावा; म्हादबानें वजिऱ्याचें त्या दिवसाचें गुणवर्णन करूं लागावें आणि मग गुणाबाईला न राहवून लगोलग तिनें खरखलेला निखारा घेऊन त्यावर मिरच्या वगैरे घालाव्यात, वजिऱ्याची दृष्ट काढावी आणि ती दृष्ट गांवाच्या तिवाठ्यावर नेऊन ठेवावी !

असा त्या कुटुंबाचा आपल्या वजिऱ्यावर सर्व जीव होता. शेतकऱ्याच्या जिण्याला तें सर्वथा उचितच होतें. म्हादबानें आपलें लहान-पणापासूनचें निम्में वय मुंबईत हमाली करण्यांत घालविलें होतें. वास्त-विक त्याची शेतकीची हौस, परंपरा, संस्कार हीं सर्व सुटलीं असतांहि केवळ गुणबाईच्या प्रेरणेनें व प्रेमळ हट्टानें म्हादबा शेतकीवर येऊन स्थिर झाला होता त्यांत त्याला आतां अतोनात आनंदही अनुभवा-यला मिळूं लागला होता. त्याच्या कृतीचें दृश्य मुरारीच्या बाल मना-वर सतत उमटत असल्यामुळें मुरारी पुढें खराखुरा शेतकरी होणार होता, हें भविष्य वर्तविण्यास कोणत्याही ज्योतिष्याची जरूरी नव्हती !

— २ —

परंपरा तुटल्यामुळें, संस्कृती सुटल्यामुळें शेतीकामाच्या कित्येक अवघड प्रसंगीं कसें वागावें हें म्हादबाला समजत नसे. तो अगदीं घाबरून गोंधळून जाई. शेजाऱ्यापाजाऱ्याला विचारण्याचें त्याला सुचत नसे आणि विचारण्यांत कमीपणाही वाटे. त्यामुळें कित्येकदां त्याचें बेसुमार नुकसानही होई. ह्या अशा नेहमींच्या नुकसानीला कारण त्यानें परंपरा सोडली होती, शेतीचा त्याग केला होता, ह्याशिवाय दुसरें कोणतेंच नव्हतें. अशा वेळीं म्हादबा अगदीं वैतागून जाई व शेतीचा संन्यास करून मुंबईची वाट धरावी असें त्याला वाटूं लागे. त्याप्रमाणें तो बोलेही. अशावेळीं गुणाबाईची मात्र भारी त्रेधा उडे. नवऱ्याला कसें समजवावें हें तिला सुचत नसे. तरीही ती नवऱ्याच्या मनाला आंवरून धरी आणि त्याच्या उच्छृंखल झालेल्या मनाला कार्यप्रवण करी ! असें आजकाल सर्व महाराष्ट्रभर प्रत्यहीं किती तरी शेतकऱ्याचें होत आहे !

गांवच्या सर्व रानामाळांतून पेरण्यांची मारे घनचक्कर उडून राहिली होती. झाडून साऱ्या शेतकऱ्यांना श्वास सोडावयाला फ़ुरसद नव्हती कीं इकडे तिकडे पहावयाला उसंत नव्हती. एकाद्याच्या घरीं मुडदा पडला असता तरी त्याला मूठमाती द्यावयाला वेळ नव्हता. तो तसाच झांकून ठेवून अगोदर पेरणी साधण्याच्या निकराच्या धांदलीचा तो वक्त होता.

म्हादबाच्या पैरेकऱ्याकडचें काम संपलें होतें आणि उद्यांपासून त्याच्या शेतांतल्या पेरणीला आरंभ व्हावयाचा होता. गुणाबाईनीं सारीं बींबीयाणीं जय्यत ठेवलीं होतीं. म्हादबानें पेरणीचीं आयुधें—कुळव, औत,

चाडीं, मोगणी, दोरदोरखंड, शिवाळीं—सर्व कांहीं जमवून ठेविलीं होतीं. हेतु हा कीं ऐन वेळीं कशाबद्दल नडूं नये व कामाची खोटी होऊं नये. रात्रीपासून त्या सर्वांची कोण घाई उडून गेली होती. म्हादबाला लवकरच झोंप लागली. भाकरीतुकड्याची व्यवस्था कशी कशी करावयाची, आपण शेताकडे केव्हां जावयाचें याचा विचार गुणाबाईनें करून आपलीं कामें उरकून तीही निद्रेच्या स्वाधीन झाली !

रात्र किती झाली होती कोणास ठाऊक ! आभाळांतल्या चांदण्यावरून तें कळावयाचें पण काळ्याकुट्ट ढगाआड त्या लपल्यामुळें रात्र किती आहे हें कळण्यास मार्ग नव्हता ! म्हादबा मध्येंच जागा झाला. त्याचा नेम असे कीं मध्यें जागे झाल्यावर एकदां गोठ्यांत जावयाचें, वजिऱ्यावरून हात फिरवावयाचा, त्याच्या गवाणींत वैरणकाडी पहावयाची, आणि मग झोंपावयाचें ! या त्याच्या नित्याच्या नियमाप्रमाणें तो उठला आणि गोठ्यांत गेला. वजिऱ्याजवळ गेला—तों काय ! तेथलें दृश्य पाहून त्याच्या पोटांत धस्स झालें ! त्याची बोबडी वळली ! तो जागच्याजागींच दगडी पुतळ्याप्रमाणें उभा राहिला ! झोंपी गेलेल्या गुणाबाईला हांका मारण्याचें त्याच्या मनांत आलें पण त्याची जीभच लुली पडली !

वजिऱ्या एकसारखा फुस्–फुस्–फुस् करीत होता. त्याचे डोळे फिरत होते. दाव्यापासून सुटण्याची त्याची एकसारखी धडपड चालू होती. त्याचें पोट तट्ट फुगलें होतें व त्याची हागमूत बंद झाली होती ! धनी जवळ येतांच वजिऱ्यानें अशा कांहीं करुण नजरेनें त्याच्याकडे पाहिलें कीं म्हादबाच्या काळजाचें पाणी पाणी झालें ! एखाद्या अजाण अर्भकाप्रमाणें त्याला रडूं कोसळलें ! तो धांवत त्याच्याजवळ गेला, दाव्यापासून

त्याला मुक्त केलें आणि त्याच्या अंगावरून हात फिरवूं लागला ! वजि-ऱ्याच्या कायेची बेकाया किती थोड्या वेळांत होऊन गेली होती !

गुणाबाई जागी होऊन धांवत तेथें आली. बोलून चालून बाईमाणूस ती ! म्हादबासारखा पुरुष जर लहान मुलाप्रमाणें रडत होता, तर गुणाबाईचा धीर सुटला असल्यास नवल काय !

पण बायकांना ऐन वेळीं देव धैर्य देतो. गुणाबाईलाही त्यानेंच धैर्य दिलें. तिनें म्हादबाला धीर दिला. तशा रात्रीं ती शेजारींपाजारीं गेली. शेजाऱ्यांना उठविलें व आपल्या वजिऱ्याची स्थिति तिनें सांगितली. सर्वच लोक टणकलेले. कोण उठून धांवत येणार ! शिवाय दुसऱ्या दिवशीं कामाची धांदल ! गुणाबाईची तिकडूनही निराशेची पाळी आली ! एका म्हातारीनें खोकत खोकतच, अंथरुणावरून न उठतांच गुणाबाईला म्हटलें " कुणी मेल्यानें वजिऱ्याला कांहीं चारलेंबिरलें का काय तें तरी बघ ! आणखी त्याला ताक पाज ! चिंचेचा कोळ पाज, ढाळ होतील अन् होईल रिकामा झट्दिशी ! "

म्हातारीनें सांगितलेल्या उपयांची योजना गुणाबाईनें लागलीच अमलांत आणिली. तिच्या घरीं ताक असें कितीसें असणार ! म्हणून तिनें त्या म्हातारीकडील, आणखी दुसऱ्या शेजाऱ्यांच्या घरांत तशा रात्रीं शिरून मिळेल तितकें ताक मिळविलें; चिंचेचा कोळही काढला आणि आजारी वजिऱ्याला शिंगाटांतून पाजला. औषधोपायाप्रमाणेंच गुणाबाईनें म्हसोबाला, जोतिबाला, खंडोबाला जोखाईला हजारों नवससायास मनां-तल्या मनांत केले ! नित्याप्रमाणें आज वजिऱ्याची दृष्ट काढावयाची ती विसरली होती, ती देखील तिनें तशा वेळीं काढली !

सर्व उपाय करून पाहिले तरी सुचिन्ह दिसेना. 'तालुक्याच्या गांवाला जाऊन जनावराच्या डॉक्टराला घेऊन यावें,' असा विचार म्हादबाच्या मनांत आला. गुणाबाईला तो तसें म्हणालाही पण त्याचा उपयोग काय ! गांवाच्या चावडीवर कोणी तरी सरकारी अम्मलदार आल्याचें कळलें होतें; त्याला जाऊन विचारलें तर तो कांहीं सांगेल ही आशा उत्पन्न झाली. त्याप्रमाणें म्हादबा जावयाला निघालाही पण तितक्यांत त्याला वाटलें, हे मोठे शिकलेले अम्मलदार लोक सांगावयाचे तर कांहीं नाहींतच, पण उलट खसकन् आंगावर मात्र येतील ! या लोकांना आमच्याबद्दल मुळीं जिव्हाळाच वाटत नाहीं. माणसाबद्दल ज्यांना जिव्हाळा वाटत नाहीं त्यांना जनावराबद्दल कसा वाटणार !

— ३ —

'आशा सुटत नाहीं, देव भेटत नाहीं' अशी म्हादबाची व गुणाबाईची अवस्था झाली होती. तीं दोघें हताश मुद्रेनें वजिऱ्याजवळ बसून त्याच्याकडे पहात होतीं. वजिऱ्याच्या आजाराला उतार मुळींच नव्हता; त्याच्या वाढत्या आजाराबरोबर म्हादबाच्या आणि गुणाबाईच्या सर्व आशा मावळत चालल्या होत्या !

अखेरीस—अखेरीस काय ! म्हादबाचा आवडता **वजिऱ्या** जमिनीवर पसरला. त्याची तडफड वाढली, धडपड चालू झाली; पाषाणालाही पाझर फोडणारी करुण दृष्टि त्यानें आपल्या मालकाकडे लावली आणि त्या धडपडीचा अंत शेवटीं वजिऱ्याचें प्राणोत्क्रमण होण्यांत

झाला ! तो यमयातनांतून सुटला ! म्हादबानें आणि गुणाबाईनें एकच हंबरडा फोडला ! त्यांच्या जिवाचा जिवलग, त्यांचा प्राण, त्यांच्या संसाराचा एकमात्र आधार त्यांना असा एकाएकीं टाकून गेला !

त्यांच्या हंबरड्यानें लहान मुरारी झोपेंतून रडतच जागा झाला आणि धांवत आपल्या आईबापांजवळ आला ! वजिऱ्या शातपणें समोर पडला होता आणि त्याच्या गळ्यांत गळा घालून म्हादबा ओक्साबोक्शीं रडत होता. गुणाबाईच्या दुःखाला तर पारावार उरला नव्हता ! उजाडल्यावर हां हां म्हणता बातमी गांवभर पसरली ! घाईघाईनें प्रत्येकजण वजिऱ्याला पाहून हळहळून पुढें जात होता.

वजिऱ्याला घेऊन जाणारे चाण्डाळ आले ! गुणाबाईनें डोळ्यांतून पाण्याच्या धारा चालू असतांच वजिऱ्याच्या चारही खुरांवर, मस्तकावर पाणी घातलें व हळदकुंकू वाहिलें. तोंडांत अर्धी भाकर घातली. मग चांडाळांनीं त्याचे पाय बांधून मध्यें वासा घालून त्याला उचललें. त्या वेळच्या त्या हतभागी शेतकरी कुटुंबाचा आकांत वर्णन करणें अशक्य आहे !

त्या दिवशीं म्हादबा, गुणाबाई, मुरारीच काय, पण त्यांचा कुत्रा, म्हशी, गाई यापैकीं कोणींच तोंडांत पाणीदेखील घेतलें नाहीं ! घरचें माणूस प्राण गेल्यावर कोणाला खायचें प्यायचें सुचणार कसें ?

कारणप्रसंगीं अजूनही एकाद्या खेड्यावरून जातांना एकादा बैल चाण्डाळ वाहून नेतांना दिसला म्हणजे म्हादबाच्या वजिऱ्याची आठवण होते आणि काळजांत चर्रर्र होऊन ‘ बिचाऱ्या शेतकऱ्या, तुझें आतां कसें होणार ? ’ हा दुःखदायी प्रश्न विलक्षण वेदना देत असतो !

---

# ५

# 'मोत्या'ला गोळी घातली

मोत्या नुसता तडफडत होता. त्याची जीभ फारोळया दातांच्या बाहेर लळलळत होती. तो गुरगुरण्याचा, भुंकण्याचा प्रयत्न करी, पण त्याला मर्मीच गोळी लागली असल्यामुळें, गुरगुरण्याच्या किंवा भुंकण्याच्या वेळीं गोळीच्या वेदना त्याला असह्य होऊन त्याच्या आवाजाचें रूपांतर करुण स्वरांत-रडव्या स्वरांत—होत होतें. क्षणभर तो चारी पाय पोटाशीं घेई, तर दुसऱ्या क्षणाला त्याला तणवा लावी. एकदां आराम वाटावा म्हणून लोळण घेऊन पाही, तर लगेच सर्व शक्ति नष्ट झाल्यासारखे व प्राण गोळा होत आहेत, अशा भावनेनें तो निपचीत पडून राही !

मी, माझी बायको, शाम, बाळ, आण्णा, कमी, शशी हीं माझीं लहानसहान मुलें आम्हीं सर्वजणच मोत्याच्या जवळ जमलों होतों. मोत्या आम्हां सर्वांचा आवडता कुत्रा ! लहानपणापासून त्याला संभा-

ळलेला, पाळलेला, पोसलेला! घरांतल्या लहानापासून थोरापर्यंत तो सर्वांचा जीव कीं प्राणच! कुत्र्याची जात. मुकें जनावर खरें; पण आम्हां सर्वांला मोत्या म्हणजे आमच्या कुटुंबांतला एक जबाबदार घटकच वाटत असे! आम्हां सर्वांनाच कुत्र्याची आवड, नाद आणि हौस. त्याला दूध पाजण्यांत, वेळच्या वेळीं भाकरी घालण्यांत, त्याची निगा राखण्यांत कोण कमी करणार! मुलांनीं आपल्या ताटांतलें मोत्याला मुद्दाम यू यू यू करून बोलावून घालावें. माझी बायको तर मोत्याला अगोदर भाकरी घातल्याशिवाय आणि पाणी दिल्याशिवाय कधींहि जेवायला बसायची नाहीं, कीं त्याच्याकडे दुर्लक्ष करावयाची नाहीं. मोत्या म्हणजे आमच्या घराचा, शेताचा, गायीगुरांचा, गंजी–परड्याचा इतकेंच काय, पण आम्हां सर्वांचा संरक्षक इमानी करडा शिपाईच म्हणा ना! मोत्या अस्सल देशी–जातीवंत महाराष्ट्रीय, खरा उमदा प्राणी! देखणा तसा, चपळ तसा, समजूतदार तसा आणि प्रेमळहि पण तसा! एरव्ही मुलें त्याच्याशीं खेळावयाचीं, तो मुलाशीं मोठ्या आनंदानें खेळावयाचा! आम्हां नवराबायकोंचा राग–लोभ तो पुरा जाणे, ओळखे. केव्हां केव्हां माझ्या रागाला मिस्कीलपणानें तो तितकासा जुमानीत नसे; पण बायकोच्या रागाला मात्र भारी भीत असे. भाकरी घालावयाच्या वेळेला तो चुकून हजर नसला आणि तिनें "मोत्या मोत्या" म्हणून रागानें हांका मारल्या म्हणजे, शेंपूट हालवीत, मान खालीं घालून " आपण चुकलों, क्षमा करा " अशा आशयाचा कूरकूर आवाज काढीत तो यावयाचा! बायको प्रसंगविशेषीं मोत्यावर रागावे हें खरें, पण इतर कुणी त्याच्याकडे वांकड्या नजरेनें पाहिलेलें, तिरस्कारानें त्याला 'हाड्' म्हटलेलें तिला कांहीं खपावयाचें नाहीं. इतका त्याच्यावर तिचा जीव होता!

त्या मोत्याला आज वर्मी गोळी बसली होती व त्यामुळें तो अगदीं आसन्नमरण स्थितीला आला होता!

बायको मोत्याकडे पाहून अश्रू ढाळीत होती, तर माझ्याकडे लालबुंद डोळ्यांनीं पाहात होती! माझीं मुलें भयचकित होऊन मोत्याच्या

त्या केंविलवाण्या स्थितीकडे पाहात होतीं. मधूनच त्याला कोणी गोंजारी; " मोत्या, काय झालं रे तुला ? असं रे काय करतोस ! " असें म्हणत ! गोळी लागली होती, त्या ठिकाणाहून रक्त भळभळ वहात होतें. बायको-कडून अगोदर हळद मागविली व ती भुकटी मीं त्याच्यावर दाबली ! मोत्या त्या गोळीला जुमानणार नाहीं, तो मरणार नाहीं,तो तसा शहरांतल्या नाजूक, मरतुकड्या आणि नुसत्या अळणी आणि भित्र्या कुत्र्यांच्या अवलादीचा नाहीं; तेव्हां तो त्यांतून वांचेल, पुन्हां पहिल्यासारखा होईल, मी त्यास हरप्रयत्नानें वांचवीन असें मला वाटत होतें. पण मधून मधून माझा त्याबद्दल धीरहि सुटत होता. वैऱ्याला न सुचणारे विचार मला सुचत होते व ते मला भेडसावीत होते. मी त्याला कुरवाळीत होतों, थापटीत होतों. तो मुलांकडे पाही, बायकोकडे पाही आणि माझ्याकडे पाही; मुलांना आनंदित करण्याकरितां तशाहि स्थितींत आपलें शेंपूट लाडीकपणानें हलवी. बायकोनें त्याच्यापुढें घाईघाईनें दूध-भाकरीचा काला करून आणून ठेवला. त्यानें त्या वेळीं तिच्या-कडे किती कृतज्ञतेनें पाहिलें ! तिच्याकरितां त्यानें त्या काल्याजवळ तोंड नेलें. पण त्याला त्या वेळीं खाववेना ! त्याचा अगदीं नाईलाज झाला ! त्यानें अर्धवट उचललेली मान दुःखावेगानें, पुन्हां काला तसाच टाकून खालीं टाकली !

माझें मन विलक्षण प्रक्षुब्ध झालें होतें. काळजांत भयंकर कालवा-कालव होत होती. डोळ्यांतून पाणी येत नव्हतें, पण ते लाल झाले होते. नुसती आग आग होत होती.

ज्या गायीचें आणि मोत्याकरितांच मुद्दाम पाळलेल्या शेळीचें दूध आम्ही त्यास देत असूं, ती गाय व ती शेळी रानांत चरावयास नेण्याकरितां गर्डा जात असे. त्यानें दाव्यापासून त्यांना सोडलें, अंगणां-तून दाराबाहेर गाय व शेळी चालली असतां, मोत्याचा करुण स्वर त्यांच्या कानीं पडला. त्या दोघीहि जागच्या जागींच थबकल्या. त्यांनीं

माना मुरडून मोत्याकडे पाहिलें. मोत्याची आणि त्यांची दृष्टादृष्ट झाली. मोत्यानें किंचित् शेंपटी हलविली. गायीला व शेळीला जणूं मोत्याची ती अवस्था कळलीच ! गायीनें ' हंबे ' आवाज केला. शेळीनेंहि मान हलवीत, बॅए बॅए अशा आपल्या शब्दांत, त्याची सहानुभूतिपूर्ण पूस-तपास केली. त्या कदाचित् तेथून हालल्याहि नसत्या, आणि मोत्या चांगला असता, तर त्वरेनें त्यांच्याजवळ जाऊन त्यानें त्यांच्या खोड्याहि केल्या असत्या. पण त्या स्थितींत मोत्या नव्हता. गड्यानेंहि हातांतली काठी वर उगारून त्यांना चरायला जाण्याचा इषारा ' हाईक हाईक ' करीत व ' तिर तिर ' शब्द उच्चारीत केला. तो गायीला आणि शेळीला घेऊन गेला !

जनावराची माया जनावराला कळली. त्यांची त्यांनाच ती कळली; त्यांनीं मोत्याला सहानुभूति दाखविली. मोत्यानेंहि शेंपटी हलवून आपला मनोभाव व्यक्त केला. करुण आवाजांत किंचाळत त्यानें आपलेंहि दुःख त्यांना सांगितलें.

तें दृश्य मी पाहात होतों. माझ्या बायकोनेंहि पाहिलें. बायकोनें संता-पून मोत्यावर निर्दयपणानें गोळी झाडणाऱ्याला लाखोली वाहण्यास कमी केलें नाहीं व देखतां डोळां गोळी झाडूं कशी दिली ? स्वस्थ कसे बसलां ? मोत्या काय बेवारसी होता ? तिथल्या तिथें गोळी झाडणाराचा हात कसा पकडला नाहीं, म्हणून माझीहि तिनें यथास्थित पूजा बांधली!

मी मोत्याला कुरवाळीत होतों. थोपटीत होतों. त्याच्या सर्वांगा-वरून एकसारखा हात फिरवून त्याच्याकडे दुःखी, अपराधी डोळ्यांनीं मी पाहात होतों. मोत्याहि माझ्या नजरेला नजर भिडवीत होता. दर वेळीं त्याच्या पाहण्याचा भाव मला निराळाच वाटत होता.

" आज तुम्हीं निर्धास्त कसे झोंप घेणार ? माझ्याशिवाय रात्रीं अपरात्रीं, चोरांचिलटांपासून, भुरट्यांपासून, आल्या गेल्या हाताळ्यापासून घराचें, शेताचें, गंजीचें, गोठ्याचें रक्षण अशा स्थितींत मी कसें करूं

शकणार ? मी या गोळीच्या तडाख्यांतून वांचेन तरी कां हो ? माझ्या या अवस्थेला आपण माझे धनी असून आपणच कारणीभूत झालांत ना ? मला प्रदर्शनांत नेलेंतच कशाला आधीं ? अशा तऱ्हेचे प्रश्न डोळयांतल्या पाहाण्याच्या भावांनीं आणि किंचाळयानें मोत्या मला करीत आहे, असेंच मला वाटत होते !

मोत्याच्या जिव्हारीं गोळी जाऊन भिडावयाला मीच खरोखर कारणभूत झालों होतों; आणि त्याचेंच मला सर्वांत जास्त वाईट वाटत होतें. ' मोत्याला गोळी घालण्यापर्यंत पाळी यायला असें झालें तरी काय ? कुणीं घातली गोळी ? कां घातली ? '

मी त्यासंबंधानें आतांपर्यंत एक चकार शब्दहि बोललों नव्हतों. माझ्या बायकोला तें असह्य झालें होतें. मोत्याकडे कळवळून व माझ्याकडे संतापून आळीपाळीनें पहात माझ्या बायकोनें चिडून मला प्रश्न केला. तेव्हां झालेली हकीकत मला आतां सांगणें भागच झालें. आमच्याच गांवांतल्या एका माणसाला, गुरांना टाणाटोण्याचीं औषधें देऊन बरें करणारे एकाला माझ्या बोलावण्यावरून तेवढ्यांत तेथें आणलें. मोत्याला त्याच्या हवालीं करून व त्याला नीट औषधोपचार कर, असें गद्गदून सांगून मी बायको–मुलांसह उठलों. त्या गांवठी वैदूनें ' मोत्याला लगोलग औषधानें बरा करतों. त्याची काळजी तुम्हांला नको ' असें म्हणून आम्हांला धीर दिला. आम्ही आंत गेलों !

\+ \+ \+

रोज नवी नवी टूम काढून ती बाजारांत आणावयाची व तिच्याचबद्दल शक्य तों मोठमोठ्यानें अभिनिवेश धरून आपली टूम सर्वांनीं स्वीकारलीच पाहिजे, असा अत्याग्रह धरावयाचा, यांत पटाईत असलेल्या पुण्यांतलीच गेल्या वर्षांची गोष्ट आहे.

पुण्यास असणाऱ्या माझ्या एका मित्राकडे सहज दोन दिवस राहावयास म्हणून मी गेलों होतों. मी गेलों त्यावेळीं मित्रांकडे बरीच

तरुण मंडळी जमली होती. त्यांच्यांत मोठ्या उत्साहानें एका विषयावर चर्चा चालली होती. विषयाची निवड चित्त वेधण्यासारखी–निदान माझें चित्त तरी वेधण्यासारखी खास होती. पुण्यांत **कुत्र्यांचें प्रदर्शन भरवावें** हाच तो विषय. माझ्याप्रमाणेंच माझ्या मित्रालाहि कुत्रे पाळण्याचा नाद. त्यानें हौसेनें पाळलेला आयरिश टायगर; जवळच मोठ्या दिमाखानें बसला होता. त्याचा रंग पांढरा व डोळे लहान पण पाणीदार होते. माझ्या मित्रानें आपल्या कुत्र्याचें नांव ' टायगर ' असें सार्थ ठेवलें होतें. मित्राकडे आलेली बरीच मंडळी, निरनिराळ्या जातींचीं व निरनिराळ्या प्रकारचीं कुत्रीं बाळगणारीं हौशी होतीं. कुणी **पमेरिअन्स** पाळले होते, तर कुणाजवळ **आलसेशन्स** होते, कांहीं जण **स्पॅनिअल्सचे** भोक्ते होते, तर बऱ्याच जणांना **लॅप डॉग्ज्ची** जास्त हौस असल्यामुळें त्यांनीं त्यांची पाळणूक मोठ्या प्रेमानें आणि हौसेनें केलेली होती. बसलेल्या मंडळींत बुल्डॉगवालेहि कांहीं कमी नव्हते. प्रत्येकजण आपण पाळलेल्या कुत्र्याचें रसाळ वर्णन करीच; पण त्याबरोबर दुसऱ्याच्या–आपल्या स्नेहाच्या कुत्र्याचेंहि मनमुराद गुणगान करी. एकानें दुसऱ्याच्या ' बॉब ' कुत्र्याचें गोडवे गावे, तर दुसऱ्यानें पहिल्याच्या 'रेमंड' ची भरपूर स्तुति करून मित्रऋण फेडावें, असा ' अहोरूपमहोध्वनी 'चा इतरांना वाटणारा पण माझ्या लक्षांत न आलेला प्रकार मात्र मोठा कौतुकाचा विषय वाटला.

कुत्र्यांचें प्रदर्शन भरवावें. वऱ्हाड, खानदेश, दक्षिण महाराष्ट्र, माळवा, गुजराथ, इत्यादि भागातील कुत्रीं पाळणाऱ्या, कुत्र्यांना मानणाऱ्या व सन्मानाला चढविणाऱ्या हौशी मंडळींना प्रदर्शनाकरितां आपापलीं कुत्रीं आणण्यास आग्रहाचें निमंत्रण करावें, चांगल्या ठरणाऱ्या कुत्र्यांना प्रशस्तिपत्रें, बक्षिसें देऊन कुत्र्यांच्या वाढीकडे व समृद्धीकडे महाराष्ट्राचें अधिक लक्ष वेधावें व प्रवृत्त करतां येईल तर करावें, याबद्दल जमलेल्या मंडळींत नानातऱ्हेचीं बोलणीं चालू होतीं. आपलीं कुत्रीं प्रदर्शनांत ठेवावींत, तीं कशीं आहेत त्याची संपूर्ण माहिती

द्यावी, कुत्र्यांचे सौंदर्य, कुत्र्यांची बुद्धि, त्यांचें अन्न, त्यांचा उपयोग यासंबंधीं सांगावें. 'आदर्श' कुत्रीं कोणतीं हें जगाला दाखवावें, त्या करितां तज्ज्ञांचें परीक्षक मंडळ नेमावें; कोणा चांगल्या कुत्र्याच्या जातीचा सखोल अभ्यास करणाऱ्या व दीर्घ व्यासंग असणाऱ्या थोर विद्वानांच्या करवीं कुत्र्यांचें प्रदर्शन उघडवावें, याविषयीं भवती न भवति चालली होती.

चाललेली चर्चा, मधून मधून कुत्र्यांच्या जातींचीं, त्यांच्या रूपांचीं, गुणांचीं आणि सौंदर्याचीं वर्णनें मी लक्ष देऊन ऐकत होतों मला मोठी मौज वाटत होती. या प्रदर्शनाची कल्पना त्या मंडळींना नुकत्याच पुणें-कँपच्या कनॉट हॉटेलच्या मागील पटांगणांत, युरोपिअन, खिश्चन व पारशी जातीच्या मोठमोठ्या अधिकाऱ्यांनीं व त्यांच्यांतील कित्येक कुत्र्याच्या हौशी मालकांनीं तशा तऱ्हेचें प्रदर्शन उघडलें होतें, त्यावरून सुचली होती. तें प्रदर्शन फक्त दोन तासच चालू होतें. पण फारच यशस्वी झालें म्हणतात. बऱ्याच मंडळींनीं तें पाहिलें होतें. त्या प्रदर्शनांत आपलीं कुत्रीं मांडण्यास व आपल्या श्रमाचें व कुत्र्याच्या सौंदर्यादि गुणांचें चीज होण्यास वाव नाहीं, तें परस्वाधीन; म्हणूनच खास महाराष्ट्रियांनीं आपलें स्वतंत्र जंगी प्रदर्शन भरविलें पाहिजे. आपापल्या कुत्र्याचा गौरव झाला पाहिजे. कुत्रीं पाळण्यांत, त्यांची पैदास वाढविण्यांत व कुत्र्यांचें जीवित तेजस्वी करण्यांत आम्ही महाराष्ट्रीय इतरांच्या मानानें मुळींच मागें नाहीं, असें दाखवितां आलें पाहिजे, असेंहि कित्येक जण बोलून दाखवित होते.

माझ्या मित्रानें जमलेल्या मंडळींना माझी ओळख करून देतांना माझ्याविषयीं सांगितलें, कीं 'हेहि एक आपल्यासारखेच कुत्र्याचे नादी छंदी आहेत. हे कुत्रीं पाळतात. पण अस्सल देशी कुत्रीं यांच्या-कडे असतात. महाराष्ट्रीय कुत्र्याचा अस्सल नमुना म्हणून त्यांच्या-कडचींहि कुत्रीं प्रदर्शनांत ठेवण्यासारखीं असतात.' मित्रानें मोठ्या

उमेदीनें हें सांगितलें. कोणी ऐकलें. कोणी नाहीं. पण त्यावेळीं माझें कोणाकडेच लक्ष गेलें नाहीं. जो तो आपला आणि आपण पाळलेल्या कुत्र्याचा उदोउदो प्रदर्शनांत प्रामुख्यानें कसा होईल, या नादांत देहभान विसरलेला; तो माझ्याकडे जास्त कसा लक्ष देईल? बाकी विषयाकडे माझें दुर्लक्ष्य झालें. पण माझ्या मित्रानें माझ्या डोक्यांत एक नवीनच कल्पना घातली. मलाहि वाटलें, कुत्र्यांचेंच प्रदर्शन आहे. आपण शिकारी जातीचा अस्सल महाराष्ट्रीय 'मोत्या' कुत्रा पाळला आहे. तो देखणा आहे, हुशार आहे, पाणीदार, गुटगुटीत आहे, ऐटबाज आहे. आपण त्याला चांगला राखला आहे. वाईट संवयी त्याला जडूं दिल्या नाहींत. त्याला लूद वगैरे कांहीं भरलेली नाहीं. कोणत्याहि मापानें मोजलें, तरी आपला 'मोत्या' प्रदर्शनांत आणण्यासारखा खचित आहे. कदाचित् त्याला देशी म्हणून बक्षिस मिळणार नाहीं; पण त्याची प्रशंसा खात्रीनें होईल. तरीदेखील पुष्कळ होईल कीं!

हेच विचार माझ्या मनांत घोळूं लागले. प्रदर्शनाचीं चित्रें माझ्या डोळ्यापुढें अगोदरच नाचूं लागलीं. माझ्या मित्रानें मला आग्रहानें सांगितलें: 'गड्या, तुझा मोत्या प्रदर्शनाला आणच. मीहि आपला 'टायगर' तेथें ठेवणार आहे. मोत्या चांगला आहे. जातीवंत आहे. तो लोकांच्या डोळयांत भरल्याशिवाय राहणार नाहीं. त्याची वाखाणणी झाल्याखेरीज राहणार नाहीं.

मला खूप आनंद झाला. मला तेंच पाहिजे होतें. प्रदर्शनाची तारीख ठरली; स्थळ निश्चित झालें म्हणजे प्रदर्शन—समितीच्या व्यवस्थापकाकडून 'प्रदर्शनाला' हजर राहण्यासबंधीं आपण छापील पत्रिकाच धाडूं, असेंहि आश्वासन मला माझ्या मित्रानें दिलें. प्रदर्शनांत आपला कुत्रा ठेवण्याबद्दल कर काय भरावा लागेल, तो आपण अवश्य भरूं, असेंहि मीं सांगून टाकलें.

घरीं गेलों आणि प्रदर्शनाच्या तारखेकडे आणि समितीच्या सहीच्या निमंत्रणपत्रिकेकडे डोळे लावून बसलों. प्रदर्शनांत आपल्या

मोत्यानें जय मिळविला पाहिजे, तो गौरविला गेला पाहिजे, त्याला मानाचें स्थान लाभलें पाहिजे अशाकरितां, त्याचें खाणेंपिणें, त्याला वेळच्या वेळीं धुणें यांकडे मीं जातीनें लक्ष ठेवलें. त्याच्या गळयांत घालण्याकरितां माझ्या कल्पनेप्रमाणें घुंघुर जडलेला एक सुंदर पट्टा आणला. तो मोकळा सुटूं नये, सहजासहजीं तोडील व कोणाचाहि 'लचका' तोडील असें होऊं नये, म्हणून त्याच्याकरितां एक नवी झकास सांखळी आणली. माझ्या बायकोला व मुलांना 'मोत्या' स प्रदर्शनांत न्यावयाचें आहे, असें मोठ्या आनदानें सागून टाकलें. त्या सर्वांनाच माझ्याप्रमाणेंच किती किती तरी आनन्द झाला. मोत्याची जपणूक सर्वजण जीवापाड करूं लागले !

कुत्र्यांच्या प्रदर्शनाची तारीख निश्चित झाली. समितीच्या व्यवस्थापकाची मला आपला कुत्रा प्रदर्शनासाठीं घेऊन येण्यासाठीं निमंत्रणपत्रिका येऊन थडकली ! माझा आनंद गगनांत मावेना. मला अस्मान् ठेंगणें झाल्यासारखें वाटलें !

'मोत्या ! मोत्या ! लेका, तुझें भाग्य उदयाला आलें रे. तूं प्रदर्शनांत बसणार ! तुला लोक पाहणार ! तुझी स्तुति करणार ! गौरव करणार ! लेका, आहेस कुठें तूं ?' असें बडबडत मोत्याला घेऊन मी वेड्यासारखा नांचूं लागलों. माझी बायको, माझीं मुलेंसुद्धां माझा तो आनंद, माझी ती उन्मनीअवस्था पाहून हंसल्याशिवाय राहिलीं नाहींत. मला वेडच लागले, असेंहि त्याना क्षणभर वाटलें असल्यास नवल नाहीं !

\+ \+ \+

प्रदर्शनाची जाहीर तारीख दुसऱ्या दिवशीं होती. पण माझ्या मित्राबरोबर मी ती जागा व तिथली व्यवस्था पाहावयास अगोदरच गेलों होतों. जागा छान होती. प्रवेशद्वार लतापल्लवांनीं सुशोभित करण्याची व 'सुस्वागतम्' हीं बेगडी अक्षरें ज्या अलवाणावर

चिकटविलीं होती, तें लावण्याची धांदल चालू होती. कुत्र्यांकरितां कार्डबोर्डच्या छोट्याछोट्या खोल्या हारीनें उभ्या केल्या होत्या. कोठें टेबलें, तर कोठें कुत्र्यांना बसावयाला खुर्च्या ठेवल्या होत्या. एकंदर थाट मोठा शोभिवंत दिसत होता. आमच्याप्रमाणेंच ती जागा व आपापल्या कुत्र्यांना ठेवावयाला मिळालेले स्टॉल्स कुठें आहेत, कसे आहेत, त्यांचे नंबर काय आहेत, वगैरे अगोदर पाहाण्यास किती तरी स्त्रीपुरुष, मोटारींतून गाड्यांतून व सायकलीवरून येत होते. कुणी आपल्या अमेरिकन 'बॉब' ला, तर कोणी आल्सेशन किंगला आपल्या बरोबर मोटारींतून उतरवीत होते. पातळ, अस्मानी, गुलाबी, बदामी रंगांचीं पातळें बिनकांसोट्यानें नेसलेल्या व त्याच रंगाचा ब्लाऊज घातलेल्या आणि पाठीवर रुळणारी वेणी सोडून, पायांतल्या फॅशनेबल चपला मृदुपणानें जमीनीला लावीत आपल्या बाहूंत चिमुकल्या लूसी, बाऊबाउ-(लॅप डॉग)ला अगदीं हळुवारपणानें अलगद घेऊन, अनेक तरुणी प्रवेशद्वारानें आंत शिरत होत्या. बुलडॉग टॉम एक जण ऐटीनें बरोबर आणीत होता; आणि एकेकानें रेमंड, टॉम, किंग या निरनिराळ्या जातींच्या कुत्र्यांची जूटच्या जूटच प्रदर्शनाकरितां आणली होती. जमलेली मंडळी बहुतेक स्थानिकच होती व त्यांचीं कुत्रींहि एकमेकांच्या चांगलींच परिचयाचीं होतीं. वऱ्हाड, मध्यप्रांत, माळवा, कोल्हापूर, सोलापूर, क्वचित् बेळगांव आणि मालवण वेंगुर्ल्यापर्यंतची मंडळी आपापल्या कुत्र्यांसह प्रदर्शनाकरितां मुद्दाम आली आहेत, असेंहि समजलें. ती मंडळी उद्यां सकाळपासून येऊं लागणार होती.

मंडळी घोळक्या घोळक्यानें प्रदर्शनाच्या आवारांत हिंडत होती. आपापसांत निरनिराळ्या जातींच्या कुत्र्यासंबंधानें बोलत होती. मंडळी चालत चालत बोलत, तर बोलण्याच्या भरांत एकाच जागीं तासचे तास उभी राहात. मी माझ्या मित्राबरोबर निरनिराळ्या घोळक्यांतून शिरत होतों. थोडथोडीं त्यांचीं बोलणीं ऐकत होतों. तो देखावा, तो सुधारलेला स्त्रीपुरुषांचा मिश्र–उत्साही समाज, त्यांचीं तीं कुत्रीं, त्यांची माहिती,

त्यांचें कौतुक पाहून आणि ऐकून माझें मन थक्क होत होतें. अचंबा वाटत होता.

एका घोळक्यांत, बॉब, टायगर, किंग, लूसी, रेमंड, टॉम, या झाडून साऱ्या परदेशी कुत्र्यांचीं रसाळ वर्णनें चालू होतीं. सगळ्यांत जास्त भरणा लॅपडॉगचा होता. जात आणि जीव लहान, नाजूक, अत्यंत भित्री. पण त्याचें कोण कौतुक चाललें होतें. श्रीमंतांच्या अशक्त आणि रोगट बायकांचें इतकें कौतुक कोणी करणार नाहीं, किंवा ललितवाङ्मयांतल्या लघुकथांचें आणि कवितांचें जसें लेखकांत आणि कविलोकांत कौतुक चालतें, त्याचबरोबर पमेरिअन्स, आयरिश टेरिअर, स्पॅनिअल आणि बुलडॉग यांच्या नांवांचाहि गाजावाजा करावयाला कांहीं वीर सरसावले होते. कादंबऱ्या, नाटकें आणि काव्यें यांचे वाभाडे काढणारे चमचमीत टीकालेख, यांचेच वर्णन चालू आहे; असें आम्हांला तर थोडा वेळ वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.

दुसऱ्या एका घोळक्याकडे आमचें लक्ष वेधलें. कारण त्यांत एक साहेबी पोषाख केलेले तरुण मोठ्या आवेशानें सभोंवारच्या मंडळीकडे पहात व्याख्यानाच्या तऱ्हेनें बोलत होते. ते म्हणत होते; " अरे आहे काय हें ? तुम्हांला कांहीं स्वाभिमान आहे कीं नाहीं ? परक्या कुत्र्यांचा कसला भरणा आपल्यांत चालविला आहे ! त्यांची आयात करतां ? त्यांना आपले म्हणतां ? गांवठी कुत्रीं आपलीं खरीं; तीं मरतुकडीं होऊन अन्नान्न होऊन पटापट मरत आहेत, त्यांना लूद भरत आहे; त्यांना सांभाळा, जगवा, त्यांची पैदास वाढवा. त्यांचें प्रदर्शन भरवा ! झाडून साऱ्या परदेशी कुत्र्यांवर बहिष्कार घाला. तुम्हांला टायगर आवडतो. पण आपल्या वाघ्याला कसे विसरलांत ! तुम्हांला इस्तंबुलीं कुत्रें प्यार झालें; पण तुम्हीं आपल्या खास देशांतल्या श्वानाला विसरला. म्हणावें काय तुम्हांला ? परक्या कुत्र्यावर बहिष्कार घाला ! त्याशिवाय तुमचा तरुणोपाय नाहीं !' ' अहो पण महाराज ' त्या गृहस्थांना थांबवून घोळक्यांतील एकानें

विचारलें, 'तुम्हींच परकीय कुत्र्यांची अवलाद आपल्यांत मोठ्या दिमाखानें आणून लोकप्रिय केलीत. हीच तेवढी अवलाद चांगली. बाकीच्या गचाळ असें भासविलेंत? आणि आतांच ही उपरति तुम्हांला कां झाली! आणि गांवठी कुत्र्यांबद्दल प्रेम कां आलें आहे! परकीय कुत्र्यांवर बहिष्कार घालण्याची टूम काढण्याची लहर कां आली आहे हो!' दुसरे उपरणें सावरीत विचारते झाले 'बहिष्कार घालणें सोपें आहे. पण यशस्वी करणें फार कठीण आहे. बहिष्कार घालतों म्हणतां, त्यापेक्षां सुधारणा करतों म्हणा, तें आम्हांस कबूल आहे.'

तिसरे सज्जन चष्मा वर खालीं करीत धिम्मेपणानें बोलले; 'गांवठी कुत्रीं काय आणि परकीं कुत्रीं काय–सारीं कुत्रींच! परकी खरी. पण तीं आपल्यांत आलीं–तीं आपलींच झालीं. त्यांना पचवून टाकलें म्हणजे झालें! त्यांना आपले रीतिरिवाज लावा; आपलें शिक्षण द्या. आपल्याला सर्वच कुत्रीं हवींत!'

ते साहेबी पोषाखाचे गृहस्थ मंडळीचा गिल्ला ऐकून जरा गांगरले, पण तशांतहि अवसान आणून त्यांनीं आपलें भाषण पुढें चालविलेंच, 'या परकी कुत्र्यांना मोटारी पाहिजेत. खुर्च्यांवर बसायला पाहिजे. यांना डॉक्टर लागतो. प्यायला ब्रँडीच्या बाटल्या लागतात. मस्कास्लाईस-शिवाय आणि चहाखेरीज त्यांचे चालत नाहीं आणि उपयोग म्हणावा तर काडीचा नाहीं. मांजर पाहिलें तर हीं कुत्रीं मालकिणीच्या मांडीचा नाहींतर मालकाच्या मच्छरदाणीचा आश्रय करतात. मिजास राजाची आणि नांदणूक भित्र्या भागूबाईची! तेंच आमच्या गांवठी देशी कुत्र्यां-कडे पहा. तीं गाई–शेळीच्या दुधावर आणि शिळया भाकरीवर संतुष्ट असतात. बसायला त्यांना पटकुर, दरवाजांतला दगड, गंजींतल्या गव-ताची गादी त्यांना चालते. रक्षणाला दक्ष आणि धन्याशीं इमानी राहतात–परकीय कुत्र्यांना घरांत घेतलें, पाहुणेच शिरजोर झालें आणि घरचे मालक अन्नाला मोताद झाले. त्याकडे पहा, म्हणजे परकी कुत्र्यांवरील

बहिष्काराची माझी मोहीम किती महत्वाची आहे, हें आपल्या लक्षांत येईल.' तें भाषण मला बरें वाटलें. आवडलें. देशी कुत्र्यांचा अभिमानी कोणी तरी आहे, आपल्या 'मोत्या'ला कुत्र्यांच्या प्रदर्शनांत मान मिळणार हा मला भरंवसा वाटूं लागला. तेथून फिरत दुसऱ्या एका घोळक्या जवळ जरा थांबलों; त्यांत एक धिप्पाड गृहस्थ अगदीं आत्मविश्वासानें आपल्या, आणि आपल्या मित्राच्या, पमेरियन्स, आयरिश टेरीअर, आल्सेशन्स, स्पॅनिअल आणि बुलडॉग यांच्याविषयीं बोलत होता. झिपऱ्या कुत्र्याच्या केंसावरून हात फिरवीत, तो खेळकर आणि खोडकर विनोदी कसा आहे, बुलडॉग विश्वासघातकी असला तरी पहाणाराला त्याची दहशत कशी असते, टेरिअरचा रुबाब, एकाद्या जहागिरदारा-सारखा कसा असतो आणि शाहाणा पमेरिअन् आपल्या पोकळ गुर-गुरण्यानेंच कशी भीति उत्पन्न करतो म्हणून तो आपणास आवडतो हें तो आपल्या मिस्कील भाषेंत सांगत होता. कुत्र्यांची उपयुक्तता खरी कां त्याच्यापासून नुसती करमणूक खरी हा वाद घालण्यांत व तसेंच देशी म्हणून वाईट असलें तरी तें प्रिय आणि विदेशी चांगलें असलें तरी अप्रिय समजणारे आपण नाहीं. दोन्हींचा मिलाफ असला तर उत्तमच पण नसेल तर विदेशी असलें आणि तें खेळकर व जरा जास्त विनोदी म्हणून खोडकर असलें, तर तेंच मी जास्त पसंत करीन. लोकांना आज त्याचीच जास्त आवश्यकता आहे! असें ठासून सांगत होते. तेंही ऐकलें. मग जास्त कांहीं आम्हीं हिंडलों नाहीं. उशीर झाला म्हणून परत फिरलों. जातां जातां आमच्या मोत्याला कुठली जागा देण्यांत आली आहे, तेवढें पाहिलें, आणि निघालों!

+ + +

कुत्र्यांच्या जातीचा सखोल अभ्यास करणाऱ्या विद्वान व सन्मान्य अशा एका थोर विभूतीच्या हस्तें नेमल्या वेळीं कुत्र्यांचें प्रदर्शन उघडलें गेलें. समारंभ मोठा अपूर्व होता. सन्माननीय पाहुणे प्रदर्शनाच्या

ठिकाणीं आपल्या परिवारासह उपस्थित झाले. त्यावेळीं प्रदर्शनाच्या व्यवस्थापकांनीं बँड वाजवून, खडी ताजीम देऊन सुंदर स्वागत केलें.

सहकुटुंब सहपरिवार, संस्थानिक, जहागिरदार, इनामदार हे तेथें उपस्थित होतेच. त्यांनीं पाळलेलीं कुत्रीं प्रदर्शनांत आणलेलीं होतीं. त्यांची व्यवस्था ठेवायला, त्यांच्याबद्दलची माहिती सांगावयाला त्यांचा नोकरवर्ग तयार होता.

माझा ' मोत्या ' कोणावर गुरगुरून त्यास त्यानें भिववूं नये, म्हणून त्याला मी साखळीनें चांगला बांधला होता. अपरिचित, नटल्या थटलेल्या स्त्रीपुरुषांचा प्रचंड समाज पाहून नंतर त्याला बरें वाटलें. तोही कान टवकारून व ऐटीनें मान वळवून त्याला पहावयाला येणाऱ्याचें स्वागत करून पाहणारास आनंदवूं लागला. तें पाहून मला बरें वाटलें.

प्रदर्शन उघडतांना सन्मान्य पाहुण्यांनीं व्यासपीठावरून जें भाषण केलें, ते विद्वत्ताप्रचुर, त्यांचा व्यासंग दाखविणारें व कुत्र्यांच्या जातीवरील नितान्त प्रेमाचें दर्शक असेंच झालें. त्यांनीं वेदकालापासून तों तहत आज घटकेपर्यंतच्या कुत्र्यांची खूप माहिती सांगितली, वेद-कालांत प्रथम वैवस्वत मुनींनीं शाम–शबल या कुत्र्यांच्या दुकलीला जन्म दिला ती हकीकत, पुराण कालीं विश्वामित्रानें मेनकेकरितां कां होईना, पण कुत्र्याचें स्वरूप धारण करून कुत्र्याच्या जातीला श्रेष्ठपदाला चढविलें याचेंहि वर्णन केलें. (त्या वेळेपासून स्त्रियांना कुत्रीं आवडूं लागलीं. त्याही कुत्रीं पाळूं लागल्या. ती चाल आज तागायत आहे, हें आपल्याला दिसून येतच आहे ! असें विनोदी भाषणहि केलें.) प्रेक्षकांत त्या विनोदानें एकच हास्याचा कल्लोल उठला. खंडोबानें कुत्रीं पाळून आणि श्रीदत्तात्रयांनींही कुत्र्यांना जवळ करून त्या जातीला मानाचें स्थान दिलें व जगाला दाखवून दिलें कीं कुत्रा हा अत्यंत आनंद व सौख्य देणारा एक अत्यंत श्रेष्ठ प्राणी आहे.

इतिहासकालांतील श्रीशिवाजी महाराजांच्या " वाघ्या " या आदर्श कुत्र्याचा, मोठ्या अभिमानानें उल्लेख करून, वक्त्यांनीं इतिहास–विषयाला रजा घेऊन वक्ते अर्वाचीन–वर्तमानाकडे वळले. देशी आणि विदेशी कुत्र्यांसंबंधीं त्यांनीं खूपच खूप माहिती रसाळ वाणीनें निवेदन केली. देशी कुत्र्यांबद्दल योग्य अभिमान व्यक्त केला. विदेशी कुत्र्याबद्दलही चांगलाच आदर प्रकट केला. कुत्रीं बाळगण्याची, त्याच्याकरितां लागेल तो खर्च करून झीज सोसण्याची हौस आपल्याकडे वाढत आहे. श्रीमंतांपासून गरीबांपर्यंत व स्त्रियांपासून कोंवळ्या पोरांपर्यंत कुत्रें पाळण्याची प्रथा जारीनें पडत आहे हें पाहून आपल्याला अत्यंत आनंद होत आहे, असें म्हटलें. कुत्र्यांवरील प्रेम किती वाढलें आहे, याचेंच दृश्य फल म्हणजे आजच्यासारखीं कुत्र्यांची प्रदर्शनें आपण भरवूं लागलों आहोंत; आणि अशींच तीं पुढें वाढत्या प्रमाणांत ठिकठिकाणीं भरूं लागतील व तीं अवश्य भरावींत असें सांगून टाळयांच्या प्रचंड कडकडाटांत वक्त्यांनीं आपलें भाषण संपविलें. भाषण संपतांचीं वक्त्यांचीं वाक्यें " मी हें माझ्या हस्तें प्रदर्शन मोठ्या आनंदानें उघडीत आहें; हा थोर मान मला आपण देऊन माझ्याकडून आपली व कुत्र्यांची सेवा करविलीत, याबद्दल मी आपणा सर्वांचा अत्यंत आभारी आहें " हीं होतीं.

नंतर सन्मान्य पाहुण्यांना प्रदर्शन फिरून दाखविण्यांत आलें. त्यांच्या पाठीमागून जाणारांची खूप गर्दी होती. पाहुण्यांनीं किती तरी स्टॉल्स पाहिले. कुत्रीं, कुत्र्यांची व्यवस्थाहि पाहिली. किती तरी स्टॉल्सवर स्त्रिया उभ्या होत्या. त्या आपल्या कुत्र्यांची व्यवस्था चोख ठेवण्यांत दक्ष होत्या. कांहीं कुत्र्यांना गाद्यागिरद्या देण्यांत आल्या होत्या. उन्हानें तीं नाजूक कुत्रीं धांपा टाकीत होतीं. त्यांना त्यांच्याजवळच्या श्रीमंत आणि नाजूक तरुणी वारा घालीत. मधून बाटलींतील दूध त्यांना पाजीत; आणि तसेंच वाटलें, तर डॉक्टरांनाहि आपल्या कुत्र्यांची तब्बेत दाखवीत.

ज्या कांहीं स्टॉल्सवरून पाहुणे हिंडले, ते पाहून त्यांना फार आनंद झाला. रिन्–टिन्–टिन्च्या कुळांतलीं कुत्रीं स्टॉल्सवर पाहून त्यांनीं आपलें विशेष समाधान व्यक्त केलें. कांहीं काहीं कुत्रीं पाहुण्याकडे पाहून अगदीं ओळखल्याचा भाव दाखवून आपली शेंपटी हलवून गोंडा घोळित होतीं; तो चमत्कार पाहून मला मोठा आनंद झाला! पाहुणे फिरून थकले. त्यांच्याजवळच्या मंडळींनीं जास्त तसदी पडूं नये म्हणून त्यांना विश्रांतिस्थानीं परत नेलें.

माझा ' मोत्या ' बांधला होता, तेथपर्यंत पाहुणे आले नाहींत. त्यांनीं त्याला पहावें अशी माझी फार इच्छा होती. पाहातील अशी खात्री होती. पण तें झालें नाहीं. मला किंचित् वाईट वाटलें. श्रीशिवाजी महाराजांच्या ' वाघ्या 'चा ज्यावेळीं पाहुण्यांनीं आपल्या भाषणांत उल्लेख केला होता, त्यावेळीं जणूं काय माझ्याच ' मोत्या 'चा त्यांनीं गौरव केला आहे, असें वाटून माझ्या अंगावर मूटभर मास चढलें असें मला वाटून जितका आनंद झाला, तितकीच निराशा शिवाजी महाराजांच्या ' मोत्या 'चाच वंशज मी बाळगला असून तो त्यांनीं पाहिला नाहीं, म्हणून माझी झाली आणि मला वाईट वाटलें !

\+ + +

प्रदर्शनाची धामधूम दोन दिवस चालली होती. तें उघडल्यावर पाहण्यासाठीं शहरवासीयांची अलोट गर्दी एकसारखी तिकीटें काढून लोटत होती. हजारों प्रेक्षकांनीं ' मोत्या ' ला पाहून आपला आनंद प्रकट केला होता. मोठें उमदें जनावर आहे. अशीच पैदास पाहिजे, असे धन्योद्गार काढल्याचें मी अनेकदां ऐकलें होतें. मात्र तेवढ्यानेंहि बरें वाटलें !

प्रदर्शन समितीनें सन्मान्य पाहुण्यांच्या पसंतीचा छाप मारून प्रदर्शनांतील कांहीं कुत्र्यांच्या गळ्यांत ' Higly recommended '

Higly praised ' ' Rewarded ' अशा चिठ्या लावल्या. त्या त्या कुत्र्याचा असा गौरव झाला. अशा कुत्र्यांकडे जनता जास्तच कुतुहलनें व प्रेमानें पाहूं लागली. सूक्ष्म रीतीनें पहाणारांस असेंहि दिसून आलें, कीं कांहीं ठराविक–ज्यांनीं पाहुण्यांना पाहून शेपटी हलवून त्यांचें स्वागत केलें होतें, कुत्र्यांच्याच गळयांत वरील चिठ्या लटकाविल्या गेल्या आहेत !

प्रदर्शनसमाप्तीच्या वेळीं सन्मान्य पाहुणे येत होते. गौरव नाहीं तर नाहीं; पण आपला मोत्या त्यांनीं नुसता पहावा तरी म्हणून मी जरा धाडस करून पाहुण्यांना सामोरा झालों; त्यांचें लक्ष माझ्या मोत्याकडे वेधविण्याचें धाडस केलें. त्यांनीं तेवढ्यांत मोत्याकडे आपली दृष्टी वळविली. ' मोत्या ' गुरगुरत होता. पाहुण्यांचें स्वागतच होतें तें. पण पाहुणे घाबरले. त्यांना वाटलें, हा राकट कुत्रा आपला लचकाच तोडीत आहे ! त्यांची मुद्रा फिरली आणि संतापून तेथेंच त्यांनीं मोत्यावर गोळी झाडली ! सन्मानाच्या ऐवजीं मोत्याला सन्माननीय पाहुण्यांनीं हें बक्षीस दिलें ! पाहुणे विजयी मुद्रेनें पुढें चालते झाले ! मी मात्र धांवत धांवत माझ्या ' मोत्या 'जवळ गेलों !

\+ \+ \+

मी ' मोत्याला ' प्रदर्शनाला आणीपर्यंतची हकीकत माझ्या बायकोला माहित होतीच. प्रदर्शनाला गेलों कसा आणि परत 'मोत्या'ला घेऊन आलों कोणत्या परिस्थितींत ? प्रदर्शनांतली सर्व हकीकत बायकोला जशी घडली तशीच सांगितली.

माझ्या बायकोला आपल्या ' कुत्र्या 'चें कौतुक झालें नाहीं म्हणून कांहीं वाईट वाटत नव्हतें. पण त्याच्या जिवावरच बेतली म्हणून ती डोळयांतून पाणी गाळीत होती.

मला मनांतून दुःख झालें, तें ज्यांनीं कुत्र्याच्या जातीवर अत्यंत प्रेम ठेवलें म्हणून, कुत्र्यांच्या धन्यांनीं मोठ्या सन्मानानें त्याला प्रदर्शन

उघडण्याचा थोर मान दिला, त्यांनींच 'मोत्या'च्या गुरगुरण्याचा खरा अर्थ समजावून न घेतां निर्दयपणानें त्याला गोळी घातली म्हणून !

प्रदर्शनांत मोत्यासारख्या अस्सल देशी कुत्र्याला पुन्हां केव्हांही न्यावयाचें नाहीं; जळो तो मान; पण त्याच्या जीवाला धोका नको; असें मी व माझ्या बायकोनें त्याच वेळीं ठरवून टाकलें.

आम्हीं बाहेर आलों. वैदूच्या उपचाराचा बराच परिणाम झाला होता. 'मोत्या' जगणार हें पाहून आम्हांला त्रिभुवनांत मावेना इतका आनंद होऊन गेला.

---

# ६

# अद्भुत वल्ली !



' अरे पुरुषोत्तम, अशानं तुझं व्हायच कसं ? रात्रंदिवस तुझ्या कानींकपाळीं ओरडतें आहे तरी तुझं आपलं तें आहेच ! तुझ्या या बावळटपणानं तुझा संसार तरी कसा व्हायचा, याची मला काळजीच आहे ! कसा बाबा मोळाच्या पोटीं असा जन्माला आलास ?– '

पुरुषोत्तमाला समोर पहातांच त्याच्या आजीबाईचा हा महामंत्र सुरूं झाला ! हा महामंत्र गेल्या वर्ष दीड वर्षापासून पुरुषोत्तमाला आपल्या आजीकडून, बहुधा दिवसांतून कमींत दोनतीन वेळां तरी ऐकावा लागे. आजीबाई आपल्याकडून जीव तोडून बोलत असत; पण पुरुषोत्तमावर त्याचा कांहींएक परिणाम होत असल्याचें त्यांना आढळून येत नसे. त्या बोलबोल बोलत ! तोंड दुखेपर्यंत बोलत. पुरुषोत्तम तें सर्व ऐकेच असें नाहीं. कांहीं ऐके; कांहीं सोडून देई ! किंबहुना आजी बोलावयाला लागल्यापासून चारसहा महिने त्यानें आजीचें म्हणणें साग्र, सलक्ष्य ऐकलें असल्यामुळें त्याला तें सर्व पाठहि झालें असावें ! पण

आजीचा महामंत्र नुसता पाठ होऊन उपयोग काय? तो कृतींत उतर-ल्याखेरीज आजीला कसें बरें वाटणार? परंतु पुरुषोत्तमानें तो महामंत्र कृतींत उतरविण्याचें अजून मनावर घेतलें नव्हतें; अर्थात् आजीचाहि तो महामंत्र उच्चारण्याचा क्रम थांबला नव्हता !

आज चहाच्या वेळीं पुरुषोत्तम समोर आला, तेव्हां आजीनें आपली ठराविक टकळी सुरू केली. कपांतील चहा संपेपर्यंत पुरुषोत्तमाला आजीचे शब्द ऐकून घेणें भागच होतें. चहा संपला. पुरुषोत्तमानें कप खालीं ठेवला, आणि हातांतल्या वर्तमानपत्रावरून डोळे फिरवीत तो आजीपुढून चालता झाला. आजीला अत्यंत वाईट वाटलें. तिच्या डोळयांत अश्रु उभे राहिले.

'माझ्या पुरुषोत्तमाचं व्हायचं कसं? हा असा बावळट पडला ! त्याच्या तोंडावरची माशी उठत नाहीं ! हा संसार कसा करणार? वडिलार्जित स्थावरजंगम इष्टेटीची याच्या हातून जपणूक कशी होणार? याच्या या भित्र्या, बावळटपणानं याला लोक हां हां म्हणतां लुबाडतील, नागव-तील; मग हा अन्नाला दिखील महाग होईल ! कर्तबगारीशिवाय—आत्म-विश्वासाच्या कर्तबगारीशिवाय सगळं व्यर्थ आहे ! मिळवणं जितकं कठीण, त्यापेक्षांहि मिळविलेलं राखणं, आणि त्याचा स्वतः उपभोग घेणं, आणि दुसऱ्याला उपभोग घेऊं देणं कठीण आहे ! पुरुषोत्तमाजवळ मिळ-विण्याचा गुण नाहीं; तसा राखण्याचाही नाहीं; त्याला आत्म-विश्वास नाही. धैर्य नाहीं. त्याचे वाडवडिल कसे—नी हा कसा !' हीच एक काळजी पुरुषोत्तमाच्या आजीला अष्टौप्रहर पुरुषोत्तमाविषयीं लागलेली असे ! कां नाहीं लागणार? एकुलता एक नातू ! त्याचे आई, बाप, आजा, सगळीं त्याला अल्पवयांतच सोडून, कोणी कॉलऱ्यानें, कोणी इन्फ्युएंझानें, त्याची आई बाळंतरोगानें, अशा प्रकारें परलोकीं गेलीं असून दुर्दैवी म्हातारीवर, पुरुषोत्तमाच्या संरक्षणाची, संगोपनाची जबाबदारी येऊन पडली होती ! ती त्याच्या-

करितां जगत होती, किंवा त्याच्याकरितांच केवळ ईश्वरानें तिला आयुष्य भरपूर ठेविलें होतें, असें म्हटलें तरी हरकत नाहीं ! म्हातारीचा सगळा जीव आपल्या नातवावर ! त्याला जपावयाचें; उन्हातान्हांत, एकटें-दुकटें जाऊं द्यावयाचें नाहीं; मुलांच्या स्वभावाला अनुसरून तो दांडगाई व खोड्या करावयाला लागला, तर बागुलबुवाची कसली तरी काल्पनिक भीति घालून त्याला गप्प बसवायचा; अशा प्रकारें आजीच्या—एका अडाणी स्त्रीच्या—देखरेखीखालीं ऐतखाऊपणानें पुरुषोत्तम वाढला असल्यानें स्वाभाविकच त्याचा परिणाम त्याच्यावर जसा व्हावयाचा तसाच झाला होता ! ऐतखाऊ सुखवस्तूंचीं मुलें—त्यांत स्त्रियांच्याच देखरेखीखालीं लहानाचीं मोठीं होण्याचा प्रसंग आलेलीं मुलें—प्रायः पुरुषोत्तमाच्या स्वभावाच्या मासल्याचींच निघावयाचीं ! मग पुरुषोत्तम तसा निघाल्यास नवल काय ? पण ही चूक पुरुषोत्तम जसजसा मोठा होऊं लागला, तसतशी म्हातारीच्या ध्यानात येऊं लागली; आणि त्याप्रमाणें तिनें आपल्या शिक्षेची दिशा बदलण्याला सुरवातहि केली होती. पण तिला आता तें शक्य वाटेना; आणि म्हणून ती आतांशा पुरुषोत्तमाविषयीं नेहमीं चिंतामग्न असे. पुरुषोत्तमाला आपण लहानाचा मोठा केला, त्याच्या वडिलांची इस्टेट कशीबशी संभाळली; तसेच त्याच्या दोन हातांचे चार हात करून दिले, त्याचा संसार थाटलेला पाहिला,—त्याला मान कीर्ती मिळवावयाला लागून चारचौघांत त्याला भलायकी मिळावयाला लागलेली पाहिली, म्हणजे सुखासमाधानानें डोळे मिटून देवाघरीं चालतें व्हावयाची म्हातारीची तयारी व इच्छा होती ! परंतु हा काळपर्यंत तिच्या मनासारखें होण्याचा रंग तिला दिसत नव्हता ! म्हातारीला हाच काय तो एक जबरदस्त घोर लागून राहिला होता !

तसें पाहिलें तर म्हातारीनें पुरुषोत्तमाला अगदीं अक्षरशत्रुहि ठेविलें नव्हतें ! मराठी, इंग्रजी चांगलें शिकविलें होतें. एक दोन वर्षें पुरुषोत्तमानें कॉलेजची हवाहि आपल्या शरीराला आणि मनाला लागूं दिली होती. पण आजीच्या देखरेखीखालीं, ऐतखाऊ बावळटबहादूर जसा

पोसावयाचा, तसाच तो पोसला गेला असल्यामुळें, अलीकडच्या आजीच्या बदलल्या शिक्षेचा परिणाम स्वतःवर करून घ्यावयाला पुरुषोत्तम राजीखुषी नव्हता.

आपली चूक म्हातारीच्या ध्यानांत जरा उशीरां कां होईना, पण आली होती. पुरुषोत्तमाची चूक पुरुषोत्तमाला अजून उमगली नव्हती, व उमगून घ्यावी अशी त्याची इच्छाहि नव्हती! घरबशा, ऐतखाऊ, ऐदी, बावळट, भित्र्या अशा त्याच्या स्वभावाचा डंका, त्याच्या शेजारींपाजारीं, आळींत, गांवांत पंचक्रोशींत आज कित्येक दिवस दुमदुमून राहिला होता; परंतु तें पुरुषोत्तमाच्या गांवींहि नव्हतें! म्हातारीच्या कानांत मात्र त्या डंक्याचा आवाज घुसला होता आणि आधींच म्हातारीचें वयामुळें हलणारें काळीज, डंक्याच्या त्या आवाजाच्या धडकीनें अधिकच हलूं लागलें होतें. पुरुषोत्तमाचें खाणें, पिणें, निजणें, बसणें, चैनचमन बिनधोक चालू होती! त्याच्यावर कसलीहि जबाबदारी नव्हती; आणि तशी जबाबदारी तो आपल्या शिरावर घ्यावयाला तयारहि नव्हता! जणू काय त्याला वाटे, कीं आपल्या जन्माला पुरून उरण्याकरितांच आपल्यासाठीं जबाबदारी घेणाऱ्या आजीचा अवतार आहे! जबाबदारी आणि कर्तबगारी म्हटली, कीं पुरुषोत्तमाच्या डोळ्यांना अंधेरीच यावयाची! आणि जेव्हां तेव्हां त्याला असा चेतनाशून्य पाहिला कीं, म्हातारीची चिंता दुणावे. तिची चिंता तिला 'तुझ्या पुरुषोत्तमाचें पुढें कसें होणार?' या जळजळीत कोलतीनें जाळीत असे!

सुरुवातीला सांगितल्याप्रमाणें सकाळच्या चहाच्या वेळीं म्हातारीनें पुरुषोत्तमापुढें 'अरे, कांहीं कर, हातपाय हालव, तुझं अजून लगीन व्हायचं आहे, तुझा प्रपंच व्हायचा आहे; तुला जगांत जगायचं—नांव काढायचं आहे. हलके हलके तू जबाबदारी घेतल्याशिवाय कसं होणार तुझं? मी का अशी तुझ्या जन्माला पुरणार आहे? माझा मला आतां भरंवसा वाटत नाहीं. केव्हां मला देवाघरचं बोलावणं येईल याचा नेम नाहीं. तू आतां जबाबदारीनं आपल्या या घरादाराकडे—इष्टेटी-

कडे पहायला पाहिजेस ' वगैरे वगैरे बोलावें; पण त्या शाब्दिक मंत्राचा उपड्या घड्यावर पाणी या न्यायानें पुरुषोत्तमानें आपल्यावर काय परिणाम झाला, हें कृतीनें दाखविल्याचें सर्वांनां माहित आहेच! पुरुषोत्तमानें म्हातारीला एकदांहि एकाहि शब्दानें ' नाहीं ' ' करतों ' ' वागतों ' वगैरे म्हटलें नाहीं. पुढें आलेला चहा घेतला आणि टपालानें आलेला वर्तमानपत्राचा–मासिकांचा भारा चाळीत तो आपल्या आवडत्या माडीवरच्या गॅलरींत जाऊन हेलपाटे घालूं लागला!

म्हातारीनें नशीबाला हात लावला! ' पुरुषोत्तमाचें जर नीटनेटकें झालें नाहीं, तर इतक्या त्याच्या खस्ता खाऊन व्यर्थच म्हणावयाचें! मला जगवलें तरी कशाला देवानें? पुरुषोत्तमाची फजिती, हालअपेष्टा, दैना पहावयाला का? देवा, असा आमच्याविषयीं निष्ठुर होऊं नकोस! पुरुषोत्तमाला त्याच्या लहानपणींच पोरका केलास, त्याच्या कर्तबगार आजाला, बापाला, आईला घेऊन गेलास आणि माझ्या म्हातारीच्या स्वाधीन त्याला केलेंस! मी दुःखाचे डोंगर पोटांत घालून या बाळाच्या कल्याणाकरितां समाधानानें दिवस कंठीत आलें, त्या मला डोळे मिटण्यापूर्वी पुरुषोत्तमाला कार्यक्षम, उद्योगी, कर्ता, देशोपयोगी झालेला दाखविशील का? दाखीव, एवढीच तुझ्या चरणांजवळ या दुबळ्या म्हातारीची नित्य सांजसकाळ प्रार्थना आहे!'

पुरुषोत्तमाची आजी याप्रमाणें मनांतल्या मनांत म्हणून, डोळे पुसून, देवाला नमस्कार करून नित्यकृत्यें आटोपण्यासाठीं घरांत निघून गेली.

आजकाल खरोखरच पुरुषोत्तमासारख्या कित्येक कर्तबगारशून्य व बावळट तरुणांबद्दल ' त्यांचें पुढें काय होईल?' म्हणून पुरुषोत्तमाच्या आजीप्रमाणें कोणी ना कोणी हाडामांसाचे नातलग चिंतेनें जळत असतील, नाहीं बरें?

सकाळीं सव्वादहा साडेदहा वाजण्याची वेळ असेल. श्रीमती कमलाबाईच्या ' कन्याशाळे'ला सुट्टी झाली होती. शाळेच्या इमार-

तींतून घोळकेच्या घोळके घरीं जाण्याकरतां बाहेर पडत होते. कित्येक लहान मुलींना जपून घरीं न्यावयाला त्यांच्या घरांतून दाया आलेल्या होत्या. कित्येकांच्या धमन्या, कित्येकांचे घरांतील टांगेहि आले होते. सगळ्याच मुलींच्या नशिबीं अर्थात् हे भाग्य कोठून असणार ? गरिबांच्या मुलींचा वर्ग मोठा ! त्या मुली मैत्रिणींबरोबर हंसत खिदळत, गप्पागोष्टी करीत, शाळेंतल्या विषयांवर, 'बाई' च्या बोलण्यावर, वर्गातल्या 'मठ्ठ' बुद्धीच्या मुलींवर थट्टामस्करी करीत मजेमजेनें चालल्या होत्या ! अगोदर लहान, त्यांच्या मागून किंचित् मोठ्या, त्यांच्यामागून, सर्वांत शेवटीं, वयानें व ज्ञानानेंहि सर्वांत मोठ्या मुली, अशा रीतीनें शाळेंतून बाहेर पडत होत्या. वागण्यानें व्यवस्थित, कपड्यालत्यानीं टापटीपींत, मुखावर निर्मळ, आणि शुद्ध आनंद खेळत असलेल्या, अशा त्या मुलींकडे रस्त्यांतून जाणाऱ्या येणाराचें साहजिकच लक्ष वेधलें जात होतें; आणि सत्त्व–रज–तम यांचें ज्याच्याजवळ अधिक-कमी प्राधान्य, त्यांच्यावर अनुक्रमें चांगले बरे वाईट, याप्रमाणें त्या मुलींच्या जगासंबंधीं ग्रह होत होते. असो. पण त्यांच्याशीं आपणाला प्रस्तुत काहीं कर्तव्य नाहीं.

त्या मुलींच्या घोळक्यांतून वरच्या वर्गातल्या तीनचार मुली बोलतबोलत, वळणापाठीमागें वळणें ओलांडीत, थट्टामस्करी करीत, हंसत खिदळत, कसल्या तरी विषयावरून चर्चा करीत चालल्या होत्या. त्या मुली आता आमच्या पुरुषोत्तम मॅन्शनवरून चालल्या होत्या. (बंगला बांधून तयार झाला, आणि मंडळी त्यात रहावयाला गेली, त्याच वेळीं पुरुषोत्तम जन्माला आला, म्हणून त्याच्या वडिलांनीं मोठ्या प्रेमानें आपल्या बंगल्याला 'पुरुषोत्तम मॅन्शन' असें नांव मुद्दाम ठेविलें, असें सांगण्यांत येत असतें.) चाललेल्या मुलींपैकीं बंगल्याकडे एकीचें साहजिक लक्ष्य गेलें आणि तिनें आपला बोलण्याचा विषय बदलून दुसरीकडेच वळविला. तिला काय वाटलें कोण जाणं ! आपल्याजवळच्या मुलीच्या

खांद्यावर चापटी मारीत, डोळे मिचकावीत तिनें म्हटलें, ‘ काय ग मालन, हा बंगला किती छान आहे नाहीं ? ’

‘ तसंच–’ बयो या नांवाची दुसरी एक मुलगी मालनचा दुसरा खांदा धरून हलवीत, आणि आपल्याकडे तिला पहावयाला लावीत म्हणाली, ‘ बंगल्याचा मालक बावळटबहादूर–भित्रा नंबर एकचा आहे, नाहीं ? ’

‘ बयो, पण तो गोरागोमटा आहे हो !–’ दुर्गा पंडित–पहिली मुलगी–उद्गारली.

‘ तसाच कपाळकरंटाहि आहे हो ! ’ बयोनें तिचें वाक्य पुरें केलें.

‘ भारीच बाई भित्रा आहे म्हणे ! ’

‘ भारीच बाई बावळट आहे म्हणे ! ’

‘ अग, रात्रीं या दलनांतून त्या दालनांत जायला, हातात दिवा आणि दोन बाजूंना दोन माणसं सोबत लागतात म्हणे ! ’

‘ अन् त्याच्या निजायच्या जागेंत रात्रीं साप विंचू येईल, म्हणून मोरीच्या तोंडांत चिंध्यांचा बोळा घालण्यात येतो म्हणे ! ’

‘ मोठा शूरवीरच आहे ! जसा कांहीं धैर्यधर ! ’

‘ धैर्यधर नव्हे–लक्ष्मीधर म्हण ! चोर, दरवडेखोर आला, तर हातांतले, अंगावरचे, पेटींतले घ्या म्हणायला कमी करायचा नाहीं तो !’

‘ अहा रे पुरुष ! याचं नांव पुरुष ! नाहीं तर बाकीचे सगळे !– पण काय ग, मालन, तूं कांहींच बोलत नाहींस ती ? बयो, मालन कांहींच बोलत नाहीं ! उलट, आपण या बंगल्याच्या मालकावर चर्चा करायला लागल्यापासून ही फारच गंभीर झालेली दिसते ! याचं कारण काय ? ’

‘ हात्तिच्या ! तुला माहितच नाहीं का ? अग, मालनची आजी अन् या बंगल्याच्या मालकाची आजी दोघी मैत्रिणीमैत्रिणी आहेत हो !’ दुर्गा पंडितनें माहिती दिली.

' मग ? असतील ! त्याचा हिच्याशीं काय संबंध ? ' बयोने वेड घेऊन पेडगांवला जावयाचें ठरविलें. तरी मालन स्वस्थच होती.

' हेंहि तुला सांगायला पाहिजे का ? ' मालनकडे तिरव्या दृष्टीनें पहात दुर्गा पंडित बोलूं लागली, ' अग, आतां लवकरच, आपली मालन ' श्रीमंत पतीची राणी ' होणार; नी खरोखरच हिचा ' मग थाट काय तो पुसतां ? ' होय ना ग मालन ? होय ना ? बयो, मग तूच सांग, आपल्या भावी वराची अशी हवी तशी थट्टा केलेली कोणत्या कुलवधूला सहन होईल ? '

' अस्सं ? खरंच ? मला नव्हतं माहीत हें ! खरंच का ग मालन ? अन् दुर्गा, तुला ग हें कुणीं सांगितलं ? '

' कुणीं म्हणजे ? हिनंच ! ' दुर्गानें मालनकडे बोट केलें. मालतीचें गांभीर्य ढळलें नाहीं !

' होय मालन ? ' तिच्या खांद्याला धरून हलवून बयोनें तिला विचारलें, ' ही म्हणते तें सारं खरं आहे ? '

' होय, अगदीं खरं आहे. ' मालतीनें पहिल्या धीमेपणांतच उत्तर दिलें.

तें ऐकून दुर्गा व बयो दोघीहि आश्चर्यानें थक्क झाल्या ! दोन तीन मिनिटें दोघीहि तिच्याकडे एकसारख्या टक लावून पहात होत्या.

' इश्श ! म्हणजे ? ' बयोनें आश्चर्याचा ओघ ओसरल्यावर विचारलें, ' हें कस काय झालं ? तुझ्या आजीनं का हें सर्व घडवून आणलं ?– म्हाताऱ्या माणसांना कळत नाहीं म्हणावं, तरी पंचाईत ! म्हाताऱ्या माणसांना दुसऱ्याचा पैसा तेवढा दिसतो पण वराचे गुणावगुण–आपल्या मुलीची आवडनिवड कांहींच कशी दिसत नाहीं ? पण गडे मालन, तूं कशी स्वस्थ बसलीस ? आजीला आपलं स्पष्ट मत तूं कां कळवलं नाहींस ? –दुर्गा, आपण अशाच मालनच्या घरीं जाऊन, हिच्या वतीनं हिच्या आजीला आतांच सांगूं या कीं, –'

‘ कांहीं नको तसं सांगायला ! ’ मालननें तिला मध्येंच थांबवून म्हटलें. ‘ आजीनं यांत कांहींच केलं नाहीं ! बयो, मींच माझ्या आवडीनं हें सर्व घडवून आणलं आहे, समजलीस ? मग आजीला जाऊन तूं काय सांगणार ? ’

‘ म्हणजे ? तूं म्हणतेस तरी काय हें ? त्या बावळट, भित्र्या, ऐदी–’

‘ हं, पुरे कर । मला तें माहित आहे. मला हें सांग, हे दुर्गुण कांहीं उपजत असत नाहींत. प्रयत्नानं हे काढून टाकतां येतात. ’ मालन निश्चयी आवाजांत म्हणाली.

‘ आणि हें कार्य तूं करणार वाटतं ? ’ दुर्गा पंडितनें विचारलें.

‘ अलबत् ! ’ मालननें निश्चयात्मक सांगितलें.

‘ वा: ! शाळेंतलं शहाणपण असं वायां घालविणार वाटत ?– जॉमेट्री, आल्जिब्रा, ॲरिथमेटिक यांत अगदीं आमच्यावर पहिला नंबर पटकाविणारी तूं त्या ज्ञानाचा कसा काय उपयोग करणार मग तिथं ? ’ बयोनें अगदीं मालनची स्पष्ट चूक दाखविण्याच्या निश्चयानें म्हटलें, ‘ पुरुषोत्तमाची संपत्ति, रूप, वय हीं कांहीं वाईट नाहींत. तसा कांहीं फारसा तो अज्ञानहि नाहीं, हें आम्हांला कबूल आहे. पण तुझ्यासारख्या बुद्धिमान् मुलीनं भाळण्यासारखं यांत कांहींच नाहीं; इतकंच नव्हे, तर बुद्धिमत्तेच्या मानानं तुझ्या उभ्या आयुष्याचं मातेरंच करतेस असं मी तरी म्हणेन ! ’

‘ नाहीं तर काय ? ’ दुर्गा पंडितनें बयोच्या बोलण्याला दुजोरा दिला. ‘ असल्या अर्धवटाची–भित्र्याची संपत्ति रेसीस, गाणींबजावणीं बाहेरख्याली असल्या व्यसनांत उडाणटप्पू उपटसुंभ उडवून टाकायचे अन् त्यांची यांना दादहि असायची नाहीं ! अशांच्या सहवासांत मालनसारखीला काय सुख लागणार ? ’

‘ पण माझं तर म्हणणं असं आहे, कीं यांसारख्या व्यसनांत असल्या संपत्तीची धूळधाण उडूं नये, म्हणून सुशिक्षित झालेल्या मुलींनीं

अशा ठिकाणीं शिरून, प्रेमान, शहाणपणानं, धोरणानं वागून, त्या संप-त्तीचा विनियोग, त्या संपत्तीच्या मालकाकडून, त्याच्या सुंदर संसारासाठीं, त्याच्या देशासाठीं, त्याच्या लोकासाठीं करायला लावायला नको का ? आयतं सुख प्रत्येकाला थोडंच लाभत असतं ? प्रत्येक ठिकाणीं कांहीं ना कांहीं वैगुण्य असायचंच ! जॉमेट्री, ऑलजिब्रा, ॲरिथमेटिक यांच्या शिक्षणाचा उपयोग संसारांतहि करतां येईल, अशी माझी समजूत आहे. जॉमेट्रीचा थिअरम सोडविण्याची रीत, ऑलजि-ब्राच्या स्टेप्स मांडण्याची पद्धति, किंवा ॲरिथमेटिकचं उदाहरण मांडून उत्तर काढण्याची तऱ्हा–पुरुषांचे स्वभाव पारखून, ते ॲनलाईज करून, कोणत्या पद्धतीनं त्यांना ट्रीट केलं म्हणजे आपलीं ऐच्छिक उत्तरं त्यांपासून बिनचूक काढतां येतील हें पहाणं, हें प्रत्येक सुशिक्षित मुलीला आपला संसार सुखाचा करण्याच्या मार्गांत शक्य आहे !' मालतीनें दोघींचें बोलणें झाल्यावर आपलें बोलणें मोजक्या शब्दांत, ठसक्यानें आणि व्यवस्थितपणानें आपल्या मैत्रिणींच्या पुढें मांडलें.

'अगबाई !' दुर्गा पंडित त्यावर म्हणाली, 'मालन, तूं या गोष्टीचा बराच खोल विचार केलेला आहेस कीं ! आम्हीं नाहीं बाई, अशा गोष्टीचा इतका कधीं विचार केला नी करति ? तूं बरीच धाडसी आहेस म्हणायची !'

'माझ्यासारखंच माझ्या मैत्रिणींनींहि धाडसी असायला–व्हायला-पाहिजे, असं मला वाटतं. नुसतं आश्चर्य मानण्यांत, नाहीं तर दुसऱ्याची थट्टा करण्यांत काय अर्थ ? मी तर असं म्हणतें कीं, आजकालच्या सुशिक्षित मुलींनीं आपल्या आयुष्यांत अशी संधि आली तर ती मुद्दाम पकडली पाहिजे. आपखुषीनं अशा ठिकाणीं घुसून आपल्या ज्ञानाच्या जोरावर–संपत्ति, नीति यांसह वाहवण्याची भीति असणाऱ्या मंडळींनां आवरून त्यांना सन्मार्गी, सुखी केलं पाहिजे, अन् त्यांच्या संपत्तीचा भावी दुरुपयोग टाळून, सद्व्यय करविण्याची आणि करण्याची संधि साधतां आली पाहिजे आणि मीं तरी यापेक्षां अधिक काय योजिलं आहे?'

‘ करशील बाई म्हणशील तसं तूं ! ’ बयो उद्गारली. ‘ पण बाई एवढं तरी कर, लग्नाआधीं तसा पुरुषोत्तमरावांच्या ( आतां आम्हांला त्यांना असं म्हटलंच पाहिजे. कारण ते तुझे भावी पति आहेत ) हांतून कांहीं चमत्कार तरी घडीव ! नी मग तरी त्यांची पट्टाभिषिक्त राणी हो ! ’

‘ बरं तर, ’ हंसून मालननें उत्तर दिलें. ‘ तसं कांहीं झालं तर मग तुम्ही पण माझाच मार्ग अनुसराल असं मला वचन द्या पाहूं. ’

बयो व दुर्गा यांनीं थोड्या कष्टानेंच त्या प्रश्नावर ‘ ठीक आहे ’ म्हणून कबूल केलें.

अशाचप्रमाणें कांहीं कांहीं बोलत, त्या मुली घरोघर चालत्या झाल्या.

[ ३ ]

मालती आपल्या आजोळीं आजीजवळ रहात होती. तिची आई वारली असून बाप आफ्रिकेंत नोकरीच्या नादीं लागून गेला होता. मालतीच्या आजीचें घर पुरुषोत्तम मॅन्शनपासून जवळ होतें आणि पुरुषोत्तमाच्या आजीची व मालतीच्या आजीची फार वर्षांपासून मैत्री असल्यामुळें त्या दोघी एकमेकींकडे कांहीं ना कांहीं निमित्तानें येत जात असत. मालती येथें आल्यापासून नेहमीं आजीबरोबर पुरुषोत्तमाच्या बंगल्यावर जात असे व या दोन म्हाताऱ्यांच्या गप्पागोष्टी लक्षपूर्वक ऐकत असे. त्यामुळें पुरुषोत्तमाचें शिक्षण, वय, संपत्ति, स्वभाव यांची बारिकसारीकसुद्धां तिला माहिती झालेली होती. पुरुषोत्तमाची आजी त्याच्याबद्दलचा पाढा वाचून जेव्हां शेवटीं अगदीं कळवळ्यानें व काळजीयुक्त अंतःकरणानें म्हणे कीं, ‘ असें असें आहे. म्हणून माझ्या पुरुषोत्तमाची मला काळजी वाटते कीं, त्याचें कसें होईल ? ’ त्यावर समाधान करण्याच्या हेतूनें, पण अगदीं मनापासून मालनची आजीहि म्हणे कीं, ‘ असं काळजी करून तरी काय होणार ? तुमच्या नातवाचं चांगलंच होईल. उद्यां त्याला एकादी चांगली बुद्धिमान् आणि

रूपवान् बायको मिळाली, तर ती त्याला माणुसकीच्या पदावर नेऊन बसवील. त्याचा संसार सुखाचा करील!'

आणि वरचेवर हेंच ऐकून मालतीला आपोआपच स्फूर्ति झाली होती की, 'खरंच पुरुषोत्तमाचा संसार सुखाचा, आजी म्हणते त्याप्रमाणं, स्वतःच्या शहाणपणानं करायला मीं पुढं कां होऊं नये? उद्यां बी. ए., एम्. ए. होऊन नोकरीचाकरी स्वतंत्र रीतीनं करीत आयुष्य काढण्यापेक्षां आम्ही स्त्रियानीं अशा रीतीनं आपलं आयुष्य कां वेचूं नये? चुकणाऱ्या स्त्रीला सांवरणारा पुरुष मिळाला पाहिजे. घसरणाऱ्या पुरुषाला स्त्रीनं आपल्या शहाणपणानं सांवरलं पाहिजे. याकरितां आपण होऊन अशा ठिकाणीं धैर्यानें उडी कां टाकूं नये?'

असा विचार मालती नेहमीं करूं लागली होती. तिचा तो विचार जवळजवळ निश्चित स्वरूपाचा होत आला होता. अशाच सुमाराला मालतीनें एक दिवस आपल्या जिवलग मैत्रिणीजवळ—दुर्गा पंडितजवळ—आपले विचार प्रगट केले होते, व त्यावरच मैत्रिणींमैत्रिणींमध्यें मागें सांगितल्याप्रमाणें अगदीं उघडउघड चर्चा झाली. मालतीच्या मनांतला विचाराचा अजून तिच्या किंवा पुरुषोत्तमाच्या आजीच्या मेंदूपर्यंत प्रवास व्हावयाचा होता !

मालतीच्या मनांतून तिच्या मैत्रिणीनें सुचविल्याप्रमाणें आपला विचार जाहीर होण्यापूर्वी—निदान लग्नापूर्वी तरी पुरुषोत्तमाच्या हातून कांहींतरी लोकांच्या डोळ्यांत भरेल असें 'कार्य', यक्षिणीची कांडी फिरून घडावें किंवा घडवावें, असें होतें. ती त्या गोष्टीचा विचार करीत होती. मनुष्य एखाद्या संधीची मार्गप्रतीक्षा करूं लागला, आणि डोळ्यांत तेल घालून त्या संधीच्या जपणीला बसला, म्हणजे ती त्याला सांपडते किंवा उत्पन्नहि करतां येते, हें खरें आहे. तसाच कांहींसा प्रकार मालती आणि पुरुषोत्तम यांच्या बाबतींत झाला आणि मालतीला हवी होती ती संधि आली.

शाळेला सुट्टी होती. मालतीची आजी पुरुषोत्तमाच्या आजीकडे निघाली. तिनें मालतीलाहि बरोबर घेतलें. वेळ दुपारची होती. पुरुषोत्तमाची आजी दुपारच्या वेळीं माजघरांत कसला तरी विचार करीत डाव्या कुशीवर पडली होती. या दोघी जातांच ती उठून बसली. दोघींच्या गप्पागोष्टींना सुरवात झाली. विषय नेहमींचाच होता. मालतीला त्या विषयाचा थोडा कंटाळाहि आला; शिवाय कांहींतरी निमित्त काढून पुरुषोत्तमाची गांठ घेऊन त्याच्याशीं बोलण्याची संधि तिला साधावयाची होती. तिनें हलकेच आजीजवळ म्हटलें, ‘ मला एक पुस्तक हवं होतं; तें इथल्या ‘ होम लायब्ररी ’त असण्याचा संभव आहे–’

इतकें जों ती म्हणते आहे, तोंच पुरुषोत्तमाची आजी आपण होऊनच तिला म्हणाली ‘ असेल– असेल–आमच्या इथं तें पुस्तक अवश्य असेल. जा वर, आमच्या पुरुषोत्तमाला विचार, तो तुला शोधून तें पुस्तक देईल. ’

पडत्या फळाची आज्ञा ! मालती त्या दोघी म्हाताऱ्यांना बोलत सोडून तडक माडीवर गेली. माडीवर पुरुषोत्तम वर्तमानपत्र वाचीत झोंपाळ्यावर बसला होता. मालतीला आपल्या घरीं अनेकदां आलेली पुरुषोत्तमानें पाहिली होती; त्यामुळें तिच्याबद्दल परकेपणा वाटण्याचें त्याला कांहींच कारण नव्हतें. उलटपक्षीं मालतीच्या बाबतींतहि तसेंच म्हणतां आलें असतें. परंतु तिच्या मनांत पुरुषोत्तमाची जुळल्यास पत्नी होण्याचे विचार चालू होते. त्यामुळे त्याच्यापुढें जातांच ती स्वाभाविक किंचित् लज्जित झाली–गोंधळली–मलूल झाली, तर त्यांत नवल नव्हतें ! पण त्या वेळीं तिला तसें कांहीं दाखवावयाचें नसल्यामुळें तिनें विलक्षण आत्मसंयमन करून अगदीं मोकळेपणा दाखविण्याचा आटोकाट प्रयत्न चालविला व तो तिला बव्हंशानें साधलाहि. निदान तिचा हा कृत्रिम मोकळेपणा आहे, असें पुरुषोत्तमाच्या ध्यानांत तरी आलें नाहीं.

मालतीला पहातांच पुरुषोत्तमानें वाचन बंद ठेवून विचारलें ‘ काय पाहिजे आहे मालन ? ’

मालन विनयानें पुढें झाली, आणि पदराच्या आंतून तिने ६. वही काढली आणि पुढें केली. " आमच्या शाळेंत कधीं कधीं मराठी लिहिण्याची चांगली संवय लागावी म्हणून लहानलहान गोष्टी लिहून आणायला सांगतात. अशी एक मीं गोष्ट आणली आहे लिहून. म्हटलं ती आपल्याला दाखवावी. कांहीं दुरुस्त करण्यासारखं असलं तर करून घ्यावं. तसंच, यांत ज्या ज्या पुस्तकांचे रेफरन्सीस दिले आहेत, त्यापैकीं एक रेफरन्स नुसत्या आठवणीनंच दिला आहे तो बरोबर आहे कीं नाहीं, याचा पडताळा पहाण्याकरितां पुस्तकहि पहायचं होतं. तें पुस्तक आपल्या 'होम लायब्ररीं'त असावं अशी कल्पना झाली म्हणून खालीं आजींची परवानगी घेऊन विचारायला आलें.'

मालतीच्या हातून पुरुषोत्तमानें ती वही घेतली. त्या वहीकडे आणि त्यात वळणदार मोत्यांच्या ओळींप्रमाणें लिहिलेल्या अक्षरांकडे तो चकित दृष्टीनें पहातच राहिला. गोष्ट लहानच होती. विषय " उंदीर मांजराला भितो, मांजर कुत्र्याला भितें, कुत्रा वाघाला भितो, वाघ मनुष्याला, मनुष्य सैतानाला, सैतान परमेश्वराला भितो. मिळून भीति कोणालाच सुटली नाहीं ! याकरितां भीति उराशीं बाळगून कर्तव्यशून्य बनण्यात पुरुषार्थ नाहीं. भीतीला बाजूला सारून प्रत्येकानें कार्याला हात घातलाच पाहिजे.' अशा रीतीचा होता. मजकूर, मांडणी, भाषा, तात्पर्य हीं पाहून पुरुषोत्तम संतुष्ट झाला, तसाच थोडा खजीलहि झाला ! ही गोष्ट न जाणो आपणालाच उद्देशून आहे, असें तर त्याला वाटलें नसेल ? पुरुषोत्तमानें त्या गोष्टीचें कौतुक केलें आणि गोष्ट लिहिल्याबद्दल मालनचें अभिनंदनहि केलें.

ती गोष्ट तो वाचीत असतां, टेबलावरचें ताजें वर्तमानपत्र वाचण्यांत मालन गढली होती. वाचतां वाचतां ' ' ××× ठिकाणीं एका धनाढ्य गुजराती व्यापाऱ्याच्या घरीं दरोडा पडून दीडदोन लाखापर्यंत रोकड, दागदागिने, कपडालत्ता, लांबविला; प्राणहानि झाली नाहीं.

दरोडेखोर पकडून देणारास दहा हजार रुपये बक्षिस देण्यास सदर व्यापारी तयार आहेत!' 'ही दरोड्याची हकीगत वाचलीत का आपण?' मालननें सहज म्हणून विचारलें. तो मजकूर वाचल्यापासून तिच्या मनात कांहीं निराळेच विचार घोळूं लागले होते!

'हो वाचली आहे ती हकीगत–' पुरुषोत्तम उत्तरला.

'हा दरोडा–दरोडेखोर सांपडायचे नाहींत?' मालतीनें विचारलें.

'कुणाला?' पुरुषोत्तमानें हंसत विचारलें. मालनच्या प्रश्नाचीच त्याला गम्मत वाटली.

'तुम्हांला!' मालननें एकदम उत्तर दिलें.

'काय मला? अरे बापरे! मुलुखाचा भित्रा मी! मी दरोडेखोरांचा तपास कसा करणार? मला ते मिळणार तरी कसे? मी एकटा-दुकटा रात्रीं दरोडेखोराच्या–खुनी लोकांच्या हकीकतीच्या कादंबऱ्या भीतीनें वाचीत देखील नाहीं!–असे तूं कसें विचारलेंस, याचेंच मला आश्चर्य वाटतें–'

'कां बरं?' मालन चटकन् म्हणाली, 'त्यांत कसलं आलं आहे आश्चर्य? दहा हजार रुपयांच्या बक्षिसाच्या लालचीनं कुणी तयार होऊं नये म्हणजे काय? मी पुरुष असतें, तर मीदिखील हें बक्षीस मिळवायला उद्युक्त झालें असतें; मग आपल्याविषयीं मीं तशी आकांक्षा बाळगिली, तर त्यांत आश्चर्य कसलं? आपले वडील, आजोबा सारेच निधड्या छातीचे पराक्रमी होते, म्हणून आमच्या आणि आपल्या आजीच्या तोंडून मी कितीदा तरी ऐकलं आहे!'

पुरुषोत्तम अगदीं ओशाळला. काय बोलावें हेंच त्याला सुचेना. पण कांहीं बोलायचें म्हणून तो बोलला, 'आमचे पूर्वज पराक्रमी होते खरे. पण मी भित्रा आहें, त्याला काय करणार? माझें भित्रें मन मला कित्येकदां सांगतें, कीं आमच्या पूर्वजांनीं जो पराक्रम केला, तो त्यांच्याजवळ काहींतरी जडीबुट्टी–मंत्रतंत्रयुक्त अशी कांहीं वल्ली–असल्या-

मुळेंच झाला ! त्याशिवाय कांहीं होणें नाही ! आणि माझ्याजवळ कुणीं ऋषिमुनीनें तशी एकादी अद्भुत वल्ली दिली, तर न जाणों मीहि एखादा पराक्रम गाजवीन ! एरव्हीं 'पराक्रम' हा नुसता शब्दसुद्धां मला दटावतो ! सगळा गांव माझ्या या भित्रेपणाबद्दल आणि बावळटपणा-बद्दल बोलत असल्याचें माझ्या कानावर येतें. माझी आजीसुद्धां माझ्याबद्दल काळजींत असते. पण मी काय करूं ? तेवढाच माझा weak point आहे !'

'पण मला नाहीं तसं वाटत !' मालन दृढनिश्चयानें म्हणाली, "**नर करनी करे तो नरका नारायन हो जाय**' असं म्हणतात तें कशासाठीं मग ?'

'तूं बरीच हुशार, तशीच धीटहि आहेस !' पुरुषोत्तमचा हेतु अशा रीतीनें मालतीची स्तुति करण्यांत काय होता नकळे !

'आमचं काय आपलं बायकांचं ? पुरुषी धीटपणा माझ्या ठिकाणीं असेल, तर माझा तो एक दुर्गुणच मी समजेन ! बायकांनीं पुरुषी असणं किंवा पुरुषांनीं बायकी होणं दोन्ही वाईटच ! जबाबदारी शिरावर घेणारा साहसप्रिय, निर्भय असाच पुरुष सर्वांना प्रिय असतो—' मालती बोलण्याच्या भरांत आली होती. ती आणखी किती बोलली असती कोण जाणे—खालून तिच्या आजीची हांक कानांवर आली—तिचें बोलणें तितकेंच राहिलें.

'येतें मी, उशीर झाला आहे. माझी ती एक्झरसाइजवही आणि पुस्तक मी उद्यां नेईन—Excuse me for the troubles !' असें म्हणत मालती मागें न पहातां सरळ जिना उतरून खालीं आली. तिच्या वाटे-कडे पुरुषोत्तम नुसता पहातच राहिला.

पुरुषोत्तम कसला तरी विचार करीत होता. मालतीचे—हुषार पण अल्पवयी मालतीचे—त्या दिवशींच्या भेटींतले कांहीं शब्द—विशेषतः 'पुरुषांनीं बायकी होणें......निर्भय, साहसप्रिय पुरुष सर्वांनाच प्रिय

असतो '...इत्यादि वाक्यें त्याच्या डोळयांपुढें सारखीं नाचत होतीं–त्याला विचार करावयाला लावीत होतीं. 'स्त्रिया पुरुषाला पराक्रमी बनविण्याला समर्थ असतात. कित्येक अघटित पराक्रम पुरुषांच्या हातून केवळ सुन्दर, सद्‌गुणी स्त्रियांच्या प्रोत्साहनानें, शब्दानें, अटीनें, पणानें घडलेले आहेत,' असें त्याच्या वाचनांत अनेकदां आलें होतें. त्याच्याशीं मालतीच्या विचारांचें बरेंच साम्य असल्याचें पुरुषोत्तमाला पटलें होतें आणि त्यावरच त्याचा एकसारखा विचार चालला होता. आपण निर्भय, धाडसी, पराक्रमी, जबाबदार, कर्तबगार व्हावयाचें ! पण कसें व्हावयाचें ? पण झाल्याशिवाय उपायहि नाहीं ! नाहीं तर आपली धडगत काय ? लुच्चे, लबाड, ठक आपल्याला नुसत्या धाकदपटशानें लुबाडतील, नागवितील आणि मग ? आपलें कसें होईल ? आपली हानि आणि जगाचें हंसें, असें व्हावयाचें ! काय हें जिणें ! खरेंच, मनुष्याला जबाबदारी पाहिजे ! धाडस, निर्भयता, कर्तबगारी पाहिजे ! पण ती आणावयाची कुठून ? मिळवावयाची कशी ? एकाद्या मालतीसारख्या मुलीनें मला तसा होण्याचा उपदेश करावा ? तिलासुद्धां मी असा भित्रा बावळट आहें, याचें वाईट वाटावें ? मी धैर्यवान्‌ व्हावें, आणि लोकादराला पात्र व्हावें म्हणून तिनें मनीषा बाळगावी ?–बस्स ! झालेंच पाहिजे आपल्याला कर्तबगार–निर्भय–धाडसी ! अरे, पण व्हावयाचें कसें ?'

पुरुषोत्तमाच्या डोक्यांत वरील विचारांचें चक्र एकसारखें जोरानें सुरू झालें होतें. एका बिंदूपासून विचाराला सुरवात होऊन ब्रह्मांड फिरून विचार पुनः मूळ बिंदूंत मिळे, आणि पुरुषोत्तमाची स्थिति मोठी चमत्कारिक होई ! त्याला वाटे आर्यावर्तांत असा नेभळट–बावळट–भित्रा –निरुपद्रवी–निष्क्रिय मी एकटाच आहें, कीं सगळेच माझ्यासारखेच आहेत ?

वरीलप्रमाणें अलीकडे त्याची विचारसरणी झाली होती. एक दिवस असाच तो विचारांत गढला होता. तोंच त्याच्यापुढें मालती दत्त

म्हणून येऊन उभी राहिली. ती किंचित् हंसत आहे, असें त्याला वाटलें. तो विचारतंद्रींतून खडबडून जागा झाला. त्यानें मालनला विचारलें, ‘ आज अशी अवेळींच इकडे कुणीकडे ? तुला कसलें पुस्तक पाहिजे आहे काय ? ’

‘ नाहीं. मी आज आपल्याकडे मुद्दाम आलें आहें ! ’

‘ कां ? ’

‘ आपल्या इनामगांवीं झालेल्या व्यापाऱ्याची चोरी अजून सांपडली नाहीं ! ’

‘ कोण जाणे ! कां ? ’

‘ मला वाटतं, आपण त्या दरोड्याचा शोध कराल, तर त्यांत आपल्याला यश येईल. ’

‘ म्हणजे ? काय म्हणतेस तूं हें ?–’

‘ तेंच सांगतें. त्याचसाठीं मी आपल्या इथं आलें आहें. परवां आपण बोलत असतां ‘ शौर्य गाजवायला–निर्भय व्हायला–जडीबुट्टी –मंत्रतत्रयुक्त कांहीं जिन्नस असेल, ’ असें कांहीं तरी आपण बोलल्याचं आपल्याला आठवत असेलच ! ’

‘ होय. ’ पुरुषोत्तमानें मन्त्रमूढाप्रमाणें उत्तर दिलें.

‘ मीं त्या दिवशींची सारी हकीकत सहज म्हणून एक दिवस आजीजवळ सांगितली. त्यांत गंमत झाली. आजीनं ती गोष्ट खरी आहे म्हणून सांगितलं. आपल्या घरीं तशा जिन्नसा पुष्कळ आहेत, होत्या, असंहि ती म्हणाली. कोणत्याहि लहानमोठ्या कामगिरीच्या वेळीं आपल्या घरची मंडळी तशी जिन्नस जवळ बाळगीत; अन् हातच्या कामांत फत्ते मिळवीत. त्या जिन्नसा आतां आपल्या आजीला माहित आहेत कीं नाहींत, हें माहित नाहीं. पण तशाच जिन्नसांतील एक जिन्नस आमच्या आजीजवळ, केव्हां मागं आली आहे. ती जवळ असल्यापासून आजीला कशांत कांहीं उणं पडलं नाहीं; कशाची भीति वाटली नाहीं.

कधीं कसल्या कामांत अपयश आलं नाहीं ! इतकंच काय, पण मी जी तिच्या घरीं आल्यापासून प्रत्येक परीक्षेंत पास होत आहें, त्याला कारण तीच जिन्नस होय !' इतकें म्हणून ती थांबली. हंसली. पुरुषोत्तमहि हंसला;

'मग पुढें ?' पुरुषोत्तमानें हंसत विचारलें.

'पुढें काय ?' मालती पुढें म्हणाली. 'आजी म्हणाली' 'पुरुषोत्तमपंतांची ती जिन्नस त्यांची त्यांना परत द्यायला मी तयार आहें. त्यांनीं आपल्या पूर्वजांप्रमाणं व्हावं अशीच माझी इच्छा आहे. ही जिन्नस त्यांनीं सतत जवळ बाळगिली, तर त्यांनां कुणाची भीति वाटायची नाहीं. जातील तिथं ते यशस्वी होतील; त्यांनां कुणी भेवडावूं शकणार नाहीं !' इतकें म्हणून तिनें पदराखालून एक जिन्नस काढून पुरुषोत्तमाच्या हातीं दिली. त्यानेंहि ती मुकाट्यानें घेतली आणि तिच्याकडे तो पहात राहिला! त्या जिन्नसाकडे त्याचे डोळे खिळून राहिले होते. ती वस्तु म्हणजे पुरुषोत्तमाच्या पूर्वजांच्या पराक्रमाची गुप्त शक्ति होती! केवढी सामर्थ्यवान् वस्तु ती! आणि पाहिली तर दीड इंच लठ्ठ–टीचभर लांब हस्तिदंती–तुळतुळीत असा एक कसला तरी तो तुकडा होता !

'या वस्तूच्या जोरावर तो दरोडा तुम्ही पकडाल, अशी माझी खात्री आहे. आजीचीहि खात्री आहे!' मालती त्याच्याकडे पहात उद्गारली.

त्या वस्तूकडे आणि मालतीकडे आळीपाळीनें पुरुषोत्तम पहात होता.

'माझी आजी म्हणाली, ही वस्तु आपल्या हातीं गेल्यापासून आपले ग्रह बदलतील–आपलं पूर्वचरित्र बदलेल, आपण लोकप्रिय व्हाल–आजीला संतुष्ट कराल! पण त्याचबरोबर आम्हां गरिबांनाहि त्यांनीं विसरू नये. ज्या वल्लीच्या जिवावर आम्हीं निर्भय आयुष्यक्रम चालविला तो तसाच–ती वस्तु इतउत्तर आपल्याजवळ राहूनहि–चालविण्याकरितां विसरूं नये म्हणूनहि तिनं सांगितलं आहे !–' यानंतर

मालती तेथें एक सेकंदहि थांबली नाहीं. जशी ती आकस्मिक आली, तशीच विद्युद्वेगानें नाहींशीहि झाली !

या सर्व घडामोडीचा पुरुषोत्तमाच्या मनावरहि फार विलक्षण परिणाम झाला ! हातांतील त्या अद्भुत वस्तूनें त्याला पूर्ण भारलें. आपल्या पूर्वजांची अमोलिक चीज–पराक्रमाचा प्राण–कर्तबगारीची मंजूषा–त्याच्या हातांत येतांच तो क्षणार्धांत विचारानें, विकारानें निराळा झाला ! त्याला दुनिया निराळी दिसूं लागली ! आपण पराक्रमी आहों, कर्तबगार आहों, कर्तुमकर्तुअन्यथाकर्तु शक्तीचे आहोंत ! अशा त्याच्या डोक्यांत स्वैर कल्पना थैमान घालूं लागल्या ! इतकेंच नव्हे, तर काकतालीयन्यायानें कां होईना, पण आपल्या इनामदारीच्या गांवीं पडलेला दरोडा जर मीं पकडला–अरे बापरे ! मी दरोडा पकडणार ? पण आमच्या पूर्वजांच्या पराक्रमाची शक्ति माझ्या आतां आपण होऊन हस्तगत झाली आहे !

पुरुषोत्तमाच्या विचारौघाला एकदम जोरानें निराळी दिशा लागली आणि तो कार्योन्मुखहि झाला. एक दिवस लवकरच आजीची आज्ञा घेऊन पराक्रमाच्या आकांक्षेनें इनामदारीच्या गांवीं जावयाला पुरुषोत्तम निघाला. या स्थित्यंतराच्या वेळचें पुरुषोत्तमाचें विचारा–विचारांचें आंदोलन चांगल्या चांगल्या बुद्धिमंतांनाहि मनोरंजक झालें असतें. अर्थात् हें आंदोलन पुरुषोत्तमाला विशेषच आनंददायक आणि उत्साहकारी झाल्यास नवल काय ? त्यांत आणखी विशेष हा, कीं, पुरुषोत्तमाला या विचारांच्या विचित्र आंदोल्यावर बसविणारी मूर्ति-मालती पुरुषोत्तमाच्या विचारदृष्टीपुढें सतत होती.

( ५ )

‘ इथून स्टेशनवर जायचा रस्ता कुणीकडून आहे हो ? ’

‘ कुणाला रे वाट विचारतोस ? चुकायला अगोदर कुणीं सांगितलें होतें ? ’

'पण सांगितलें तर–सांपडत नाहीं म्हणून विचारतों आहें.'

'नाहीं सांपडत तर नदींतल्या पलीकडल्या त्या डबक्यांत जीव दे! स्टेशनचा रस्ता दाखवायला तुझ्या बापजाद्यांनीं इथें आम्हांला पगारी नोकर नेमलें नाहीं.'

संध्याकाळीं चार वाजून गेले होते. एका लहानशा नदीच्या कांठीं दोन राकट राक्षस आपले पाय घाशीत, अंगावरील वस्त्रें धूत–आपल्या रांगड्या भाषेंत एकमेकांची थट्टामस्करी करीत–आणि दांत विचकीत असतांना एका प्रवाशानें पाहिले. हा प्रवासी बऱ्याच दूर ठिकाणाहून आला असावा, असें त्याच्या रंजीस झालेल्या चेहऱ्यावरून दिसत होते. त्याला स्टेशनवर जाऊन ××कडे जाणारी गाडी गांठावयाची होती. नदीपासून स्टेशनहि फारसें दूर नव्हतें. नदींतून–वाळवंटांतून वाट नक्की सांपडण्याला किंचित् अडचणीची होती. इतक्यांत नदीवर दोन मंडळी त्याला दिसली. त्या राक्षसावतारांकडे पाहून आमचा अल्पवयी–सुकुमार प्रवासी पहिल्यांदां तर सर्दच झाला! पण स्टेशन जवळ आहे; आजूबाजूस हांकेच्या अंतरानें शेतांत राबणारे शेतकरी काम करीत आहेत, हे त्या प्रवाशाला माहीत होतें; त्यामुळें, कीं आणखी कशानें कोण जाणे, आमच्या प्रवाशानें आपलें मन चटकन् सांवरलें. भीति बाहेर दिसूं दिली नाहीं. त्यानें आपलें उगीचच विचारावयाचें म्हणून किंवा थोडी फार भीति होती तीहि धुडकावून द्यावयाची होती म्हणून त्या मंडळीबरोबर बोलावयाचा प्रयत्न केला.

तो प्रांत–ती नदी खरेंच सांगावयाचें तर बरीच आडवळणाला होतीं! एका मोठ्या शहराहून दुसऱ्या अति दूरच्या मोठ्या शहराला जाणारा तो आगगाडीचा रस्ता होता, एवढेंच काय तें! साधारणतः कोणीहि एखादे भलेंबुरें कृत्य करून त्या प्रांतांतल्या सामान्य लोकांत मिसळला तर तो उमगावयाला कठीणच, अशी त्या प्रांताची स्थिति होती. बाह्यतः येथील लोक अति गरीब, निरुपद्रवी असे दिसत! पण

बाह्य देखावाच पुष्कळ वेळां चकभूल करतो, तसा प्रकार या ठिकाणा-संबंधानें नसेलच, असें मात्र म्हणतां आलें नसतें !

नदीचें स्वच्छ काळेंभोर पाणी पाहून, हातपाय धुण्याची वगैरे प्रवाशाला साहजिकच इच्छा झाली; पहिल्या मंडळीच्यापासून बऱ्याच अंतरावरील एका खडकावर तो प्रवासी गेला. आणि आपला पटका वगैरे काढून ठेवून तो हातपाय धुवावयाला लागला. त्याचें लक्ष—सूक्ष्म लक्ष त्या दूरच्या राकट राक्षसांकडेच वेधलें होतें. याला कारण त्यानें त्यांचीं उर्मट उत्तरें ऐकिलीं होतीं, त्यांचा बाष्कळ कोटिक्रम त्याच्या कानांवर येत होता; शिवाय त्यांनीं थोड्या अंतरावर, बाजूला आपलें बरेंचसें सामान आपल्या फाटक्या-तुटक्या वस्त्रांखालून झांकण्याचा प्रयत्न केला होता. त्यांतून एकदोन सुंदर उंची लेदर ब्यागा, एकाद दुसरी चांगली संदूक, एकदोन छोट्या पण भक्कम ट्रंका, इत्यादि जिन्नसा व त्यांबरोबरच कांहीं उंची वस्त्रें, आपलें अस्तित्व जाहीर करीत होतीं. तेंहि त्या प्रवाशाच्या सूक्ष्मावलो-कनांतून सुटलें नाहीं. जिन्नसा आणि ते लोक यांचा एकदमच विचार करूं लागलें तर—सामान त्या मंडळीचें नसावें, किंवा सामानाची ती मंडळी नसावी, असें एकाद्या समजूं लागलेल्या मुलानेंहि कबूल केलें असतें.

आमच्या प्रवाशाला त्या लोकांबद्दल शंका आली—बळावत चालली, कांहीं वेळानें दृढहि झाली ! त्यांत त्या लोकांकडे साहजिकच लक्ष्य असल्यामुळें थट्टेच्या वाक्यांतून एखाद दुसरें वाक्य आपल्या शंकेला पोषक आहे, असेंहि त्या प्रवाशाचें मन त्याला सांगूं लागलें. हें लक्ष्यांत येतांच आमच्या प्रवाशाची स्थिति निमिषमात्र अगदीं प्रेक्षणीय झाली. पण त्यानें महाप्रयासानें तसल्या स्थितींतून सुटका करून घेतली, आणि अगोदर येथून काढता पाय घेण्याच्या नादाला तो लागला. त्याची अतोनात तारांबळ उडाली. पण मौज अशी, कीं ज्या लोकांना

तो भ्याला होता, त्या लोकांचें या प्रवाशाकडे लक्ष्यहि नव्हतें ! ते आपापसांतच गुंग होते !

प्रवासी झपझप पावलें टाकीत मागें पुढें पहात तेथून चालता झाला. जातांना त्यानें मनाशीं कांहीं निश्चयहि केल्यासारखा दिसत होता. त्या वाळवंटांतून वांकडींतिकडीं वळणें घेत मार्ग शोधीत प्रवाशाची स्वारी स्टेशनवर दाखल झाली. त्यानें अगोदर स्टेशनमास्तरची गांठ घेतली. खाजगी कांहीं बोलण्याची इच्छा दर्शविली. छोटें स्टेशन तें; गर्दी फारशी नसेच. त्यांत स्टेशनमास्तर भल्यापैकीं माणूस ! आणि त्या आडवळणाच्या बाजूला एरवींच्या पॅसेंजरांच्यापेक्षा थोडासा पांढरपेशा पॅसेंजर पाहून त्या मास्तरनें प्रवाशाचें एकांतांतलें बोलणें ऐकण्याचें कबूल केलें. ऐकतांच तो मास्तरहि आश्चर्यानें थक्क झाला ! पण आश्चर्य बाजूला ठेवून त्यानें प्रवाशाचें म्हणणें ऐकण्याचें कबूल केलें.पंजाबमेल पाऊण तासांत यावयाची होती. त्या स्टेशनपासून तालुक्याचा—पोलीसस्टेशनचा गांवहि तीनचार स्टेशनांच्या अंतरावरच होता. स्टेशनमास्तरानें अगोदर प्रवाशानें दिलेली ‘ वायर ’ केली. पंजाबमेल टपालची बॅग घेण्याकरितां एकदोन सेकंद या स्टेशनवर थांबत असे. तार रवाना झाल्यावर स्टेशनमास्तर व आमचा प्रवासी बोलत बसले. प्रवाशाच्या सांगण्यावरून रात्रपाळीच्या पोर्टरला हांक मारून मास्तरनें त्याच्या कानांत कांहीं सांगून त्याला रवानाहि केलें. ही सूचनाहि त्या प्रवाशानेंच केली होती.

झालें; पंजाबमेल आली. दोन सेकंदांच्या हॉल्टमध्यें पंजाबमेलमधून सशस्त्र पोलिसांची छोटीशी तुकडी उतरली. आमचा प्रवासी पुढें झाला आणि कांहीं सांकेतिक खुणा होऊन प्रवासी वाटाड्या बनला, आणि पोलिसतुकडी गुपचुप त्याच्या मागून चालू झाली !

अल्पावधींतच नदीवरच्या राकट राक्षसांना या पोलिसतुकडीनें वेढून त्यांच्या सामानासुमानासह गिरफदार केलें आणि प्रवाशासह मंडळी पुनः स्टेशनवर येऊन, लवकरच एक पॅसेंजर ट्रेन आली तींतून पोलिसस्टेशनवर गेली !

कर्मधर्मसंयोग असा चमत्कारिक असतो! आमचा प्रवासी, आपला पूर्वपरिचित मित्रा, बावळा पुरुषोत्तमच होता ! आणि त्याच्या पूर्वपुण्याईनें त्यानें जे दोन लोक संशयावरून पकडले होते, तेहि दरोडेखोरांच्या टोळींतीलच असून त्यांना लुटींत जी वांटणी मिळाली होती, ती घेऊन ते मोठ्या आनंदानें आपल्या घरीं निघाले होते. पुरुषोत्तमही त्या दरोडेखोरांच्या शोधासाठींच घराच्या बाहेर त्याला मिळालेल्या अद्भुत वल्लीच्या जोरावरच घराबाहेर पडला होता ! त्या कामांत कसें पडावयाचें, कोणत्या मार्गानें जावयाचें, कोणाचें साहाय्य घ्यावयाचें, याचीसुद्धां त्याला नीटशी कल्पना नव्हती. पण तें सगळें घडून येण्यापूर्वीं केवळ कर्मधर्मसंयोगानेंच वरील गोष्ट घडून आली. पुरुषोत्तमानें प्रसंगावधान साधून, धोरण राखून, धैर्य धरून, सुचलेल्या युक्तीचा पटकन् फायदा घेतला आणि त्यांत त्याला कल्पनेबाहेर यशहि आलें.

( ६ )

पकडलेल्या दरोडेखोरांनीं आपल्या साथीदारांचीं सरकारांत नांवें सांगितलीं. मुद्देमाल सर्व हातीं आला. एका ××× गुजराती व्यापाराच्या मालाबरोबर, आणखी कित्येकांचा कित्येक वर्षांचा मालहि हातीं लागला.

\+ \+ \+

दरोडा पकडणाऱ्या पुरुषोत्तमाचा गौरव सरकारी रीत्या झाला. त्याला नेमलेलें दहा हजारांचें बक्षीसहि मिळालें. पुरुषोत्तमाचे फोटो वर्तमानपत्रांतून, मासिकांतून येऊं लागले. त्याच्यावर स्तुतिसुमनांचा नुसता वर्षाव होऊं लागला !

\+ \+ \+

आतां पुरुषोत्तम पूर्वींचा मित्रा–बावळटबहाद्दर राहिला नाहीं ! त्यानें त्यानंतर एका पाठीमागून एक अशीं अनेक महत्त्वाचीं, साहसाचीं

कामें हातीं घेऊन तीं तडीला नेण्याचा सपाटा चालविला! या सर्व वेळीं त्याची ती महत्त्वाची वस्तु सदैव त्याच्याजवळ असे.

\+ + +

पुरुषोत्तमाच्या आजीला फार आनंद झाला; तसाच मालतीच्या आजीलाहि फारच आनंद झाल्याखेरीज राहिला नाहीं.

आपल्याला ही स्थिति येण्याला कारण मालती, हें पुरुषोत्तम नेहमीं आजीसुद्धां सर्वांजवळ बोलून दाखवूं लागला. पुरुषोत्तमाच्या आणि मालतीच्या आजीनें संगनमत करून पुरुषोत्तम आणि मालती यांची बाह्यतः लाजत–पण अंतःकरणांतून गुदगुल्या होत असलेल्या मनः-स्थितींत संमति घेऊन देवब्राह्मणांच्या साक्षीनें, मधुरवाद्यांच्या वातावरणांत, विहिणींच्या कलकलाटांत, दुर्गा पंडित, बयो यांसारख्या करवल्या–मेहुण्यांच्या घाईगडबडींत पुरुषोत्तमाला मालतीचा परमेश्वर, आणि मालतीला पुरुषोत्तमाची भाग्यदेवी बनविलें !

अशींच वधुवरं ‘ लक्ष्मीनारायणा ’सारखीं योग्य, असेंच सर्वांना वाटत असल्यास नवल काय ?

पुष्कळ दिवसांनंतरची गोष्ट. अशाच कोठल्याशा महत्त्वाच्या कामगिरीवर पुरुषोत्तम गेला. जातांना आपली महत्त्वाची जिन्नस बरोबर न्यावयाला तो विसरला किंवा मालननें त्याला विसरावयाला लावलें. पण पुरुषोत्तम कामगिरी फत्ते करून आलाच! त्याला ‘हें कसें झालें’ म्हणून थोडें आश्चर्य वाटलें. त्याबद्दल मालतीजवळ त्यानें बोलून दाखविलें. मालती हंसली आणि म्हणाली -‘आहे काय त्या वस्तूंत? निर्जीव बिचारी वस्तु ती ! तिच्यांत काय सामर्थ्य असणार? ती वस्तु का कुठे पराक्रम गाजवील ? ’

‘ म्हणजे काय म्हणतेस तूं ? ’ थोडेसें आश्चर्यानें पण हंसत हंसत पुरुषोत्तम म्हणाला.

‘ म्हणजे काय ? सामर्थ्य—पराक्रम आपला आपल्याजवळच आहे, नी होता ! पूर्वी तो आपल्या ठिकाणीं निद्रितावस्थेंत होता. तो जागृत करण्याची कामगिरी फक्त त्या निर्जीव वस्तूला पुढं करून आपल्या व माझ्या आर्जीनीं युक्तीनं केली एवढंच ! दुसरं काय ? ’ मालतीनें पूर्वीची माहिती सांगितली.

‘ असें ? मग ती वस्तु तरी काय होती—आहे ? आम्हांला—भित्र्या भागूबाईला पराक्रम करायला लावणारी ती वस्तु—’

‘ ती आपल्या वडिलांच्या जुन्या ‘ **छत्रीची मूठ** ’ आहे, दुसरं कांहीं नाहीं ! ’ असें सांगून मालतीनें ज्या छत्रीची मूठ काढली होती, ती जाऊन आणली; ती मूठ कपाटांतून बाहेर काढली, आणि छत्रीला ती बसवूनहि दाखविली.

पुरुषोत्तम व मालती खूप हसलीं !

---

# ७

# गृहिणी सचीवः।



‘ तें पोलक्याच्या खिशांत चट्‌दिशीं काय लपवलंस ? मी पाहिलं पण ! तूं नाहीं म्हणून मी ऐकलं पाहिजे ना ? माझ्याशीं आणि लपंडाव ? तें कांहीं नाहीं मला काय तें कळलंच पाहिजे हं ! ’

‘ कुठं आहे काय ? कांहीं तरीच ! मी कुणापासून कशाला काय लपवूं ? लपंडाव कशाचा ? कांहीं तरीच ! इश्श ! ’

‘ अशा उडवाउडवीनें मी फसेन असं तुला वाटतें ? ’

‘ मी कुठं म्हणतें आहे पण तसं ? ’

‘ मग काय तें कळूं दे तर मला ! ’

‘ पण माझ्याबद्दल इतका अविश्वास ? ’

‘ हो ! ’

‘ हो ? काय तरी बाई चमत्कार ! आपल्यावरूनच जग ओळखायची ही रीत वाटतं ? ’

' म्हणजे ! मी तुझ्याशीं अविश्वासानें वागतों वाटतं ! असं एक तरी उदाहरण माझ्या बाबतींत तुला दाखवितां येईल काय ? आठवण कर ! तुझ्या माझ्या विवाहापासून–पहिल्या खेपेला घरीं आल्यापासून–तूं मी बोलायला लागल्यापासून चुकून तरी अविश्वासानें मी तुझ्याशीं वागलों आहे असं दाखीव–'

' वागणाराला कुठं त्याची जाणीव असते ? '

' पण दाखवशील तर खरी ! '

' रागवायचं होईल त्याची काय वाट ? पुरुषांचा राग अगदीं नेहमीं नाकाच्या शेंड्यावर थयथयत असतो ! खरं बोललेलं आवडलं पाहिजे. सहन झालं पाहिजे ना ? '

' हें कांहीं तरीच ! स्वतःचा अपराध झांकण्याकरितां तुम्हां बायकांना हें असं बोलायचं बरं सुचतं ! '

' मला माझा अपराध मुळींच झांकायचा नाहीं. इतकंच नव्हे तर माझ्या हातून मुळीं अपराधच झाला नाहीं; हें मी केव्हांहि सिद्ध करून देईन. पण इकडचा अपराध त्यामुळं मात्र नाहींसा होणार नाहीं हें खचित ! माझ्याविषयीं इकडे अविश्वास दाखविला जातो हें घालूं कां माप पदरांत ? '

' पोलक्यांत काय लपविलंस तें दाखव अगोदर ? '

' मग आपलं माप आपल्या पदरांत घालूं ? '

' तुम्ही बायका उगाचच संशयी असतां बुवा ! '

' पुरुषांना ' संशय ' हा शब्दसुद्धां माहीत नसतो ना ? छेः छे ! मुळींच नाहीं ! तरी तो पुरुषांचा भाऊबंद आहे म्हणून बरं ! बिचारी ' शंका ' सुद्धां नव्हे ती ! ' पोलक्यांत ' काय ठेवलं हें दाखव म्हणून इतक्यांत नाहीं तरी शंभरदां म्हटलं असेल, तें संशयाशिवायच ! '

' बायका शिकल्या म्हणजे अशा बरोबरीच्या नात्यानें बोलूं लागतात ! अशा तूं–मी करूं लागतात ! शब्दाला शब्द देतात !–हं,

काय तुझं म्हणणं ? माझे अपराध माझ्या पदरांत घालणार आहेस ? घाल. मला अविश्वासू ठरविणार आहेस ? ठरींव !—'

'पाहिलंत—कसं रागावयाचं झालं तें ? पुरुष असे जेव्हां तेव्हां रागावतात म्हणून बायका खरं असलं तरी बोलत नाहींत—मूग गिळून बसतात—'

'पण मी रागानें म्हणत नाहीं ! खरंच ! खरंच हं, सांग तर खरं—–'

'मी पोलक्याच्या खिशांत कसली घडी ठेविली ही पहायची ती ! आहे कोरा कागद ! कांहीं संशयाला जागा नाहीं ना ? हवं असलं तर स्वतः सगळे पोलक्याचे खिसे चासपून पहायचे. आपला अधिकार आहे. मी नाहीं म्हणत नाहीं कीं कसली हरकत घेत नाहीं ! झालं ! आतां नाहीं ना संशयाला कुठली जागा ?—–'

'पण संशय येईल अशी वागलीस कां मग ?'

'मुद्दामच !'

'कां ?'

'एखाद्यानं संशयास्पद वर्तन केलं नी त्याचं, विचारलं तरी कारण सांगितलं नाहीं, म्हणजे दुसऱ्याला कसं कसं होत असतं हें पहावं म्हणून !'

'म्हणजे मलाच हा प्रत्यक्ष धडा दिलास वाटतं ? पण—मी—'

'तेंच मी आतां सांगणार आहे—–'

'आज अगदीं तूं असं वागण्याचा चंगच बांधला आहेस ? नेहमींची तूं—प्रेमळ, मायाळू, मित्री, माझा कल पाहून वागणारी अशी तूं आज कांहीं दिसत नाहींस. आजचा तुझा नवा अवतार दृश्यमान होत आहे. हा अवतार मी पूर्वीं कधींच पाहिला नव्हता !'

'बघितलाच नाहीं तर दिसायचा कसा ?'

' म्हणून आज दाखवायचा निश्चय आहे का ? '

' हो--'

' मग उशीर का? त्या अवताराच्या दर्शनानें आम्हीं किती कपटी, धूर्त, अविश्वासू आहोंत हें आमच्या प्रचीतीला येणार आहे ना ? होऊं दे तर एकदां तुझ्या मनासारखं--"

' हें पाहिलंत–पुन्हा रागवायचं झालं–'

' खरंच नाहीं रागावलों–खरंच नाही रागावत. तुझ्यावर मला रागावतांच येत नाहीं ! तूच सांग, तुझ्यावर मी कधीं आजवर रागावलों आहें का–'

' असं आहे म्हणूनच तर–'

' आज माझ्यांतलं वैगुण्य माझ्या पदरीं सप्रमाण बांधायचं ठरविलं आहेस ? होय ना ? हांस–खुशाल हांस ! तूं कुत्सित-पणानें कितीहि हंसलीस तरी मला कांहीं राग यायचा नाहीं; समजलीस ? कां, आतां कां बोलत नाहींस ? कांहीं सुचत नाहीं ? कशी सुरवात करावी हें कळत नाहीं? पण थांब; जिन्यांत कुणाचीं तरी पावलें वाजताहेत–बाहे-रचे कुणी तरी–'

' नमस्कार–!'

' नमस्कार दिवाणजी–या, बसा असे ! फार दिवसांनीं इकडे वाट चुकलांत ! सहज इकडे कुठें गेलां होतात. ते जातां जातां–'

' छे: छे: ! सहज कशाला येतोय ?–सहज आम्हांला इकडे तिकडे कोण फिरूं देणार ? मुद्दाम आलों आहें आपल्याकडेच ! मालकांनीं मुद्दाम पाठविलें आहे मला ! म्हणाले कीं, सगळीं कामें बाजूला ठेव. एकहि काम नाहीं झालं तरी चालेल. पण त्यांच्याकडे जा आणि त्यांना घेऊ-नच ये–म्हणून आलों आहें. दुसरं काय ?–'

' असं–असं !–मी येणारच होतों–येणार आहेंच–पण-जरा–हें पहा, दिवाणजींना एक पेलाभर चहा तरी देऊं या '

'अं–हं ! चहा नको–खरंच नको !–मी तशाकरतां नाहीं म्हणत. मला चहाच सध्यां सोसत नाहीं–मग काय चलतांना बरोबर माझ्या–?'

'आज संध्याकाळपर्यंत आलों तर नाहीं का चालणार ! आज अगदीं खास येतों ! निश्चिंत असा तुम्ही ! येतों म्हणजे येतोंच ! तुम्हांला बोलणें बसूं देणार नाहीं किंवा पुन्हां तुम्हाला हेलपाटाहि पडूं देणार नाहीं, मग तर झालं ?—'

'आमच्या हेलपाट्याचं काय ! आम्ही बोलून चालून नोकर लोक ! मालकांनीं सांगितलं कीं गेलं पाहिजे. मालकाकरितां जोडे-फाड करणं आमचं कामच आहे मुळीं ! यापूर्वी दहापांच वेळां आलों होतोंच कीं नाहीं ? त्याबद्दल कुठें मी तक्रार केली होती ? आणखी आज तरी कुठें करतो आहे ? यापूर्वी एकदां येऊन गेलां असतां–किंवा काल संध्याकाळीं समोरासमोर पाहून मालकांना आपण मुद्दाम भेटण्याचें टाळून शेजारच्या गल्लींतून झटकलां नसतां–खरं नसेल हें कदाचित्–तुमचं लक्षहि नसेल. तुम्हीं सहजहि त्या गल्लींतून शिरलां असाल. कबूल आहे, तें मला मान्य आहे. तुमच्याबद्दल माझी खात्री आहे; पण आमच्या मालकांची तशी समजूत मात्र झाली. त्याला काय करणार ? एवढ्याकरितां त्यांनीं मला पिटाळलं. मी आलों. तुम्ही मोठे; ते मोठे. तुम्हां दोघांच्या या धक्काधकींत आम्हां गरिबांचे हाल होतात झालें ! मेहेरबानी करून याच वेळीं माझ्याबरोबर चलला असतां तर–बरं ! तुमची मर्जी ! संध्याकाळीं तरी या, मालकांना तसं सांगतों मी–बरं, माफ करा. येतों तर नमस्कार !–'

'हंऽऽऽ ! हुश्श ! हें एक लचांड आहे लेकाचं–काय ?– तूं तरी म्हणजे अशी होशील '

'तो माणूस इथं आल्यापासून मी इथून केव्हां एकदां आंत जाईन असं झालं होतं ना इकडे ? इकडच्या दृष्टीवरून, माझ्याकडे चार-

पांच वेळां रोखून पाहिलं त्यावरूनच मी ताडलं होतं. पण मी मुद्दामच इथून हाललें नाहीं. म्हटलं–'

'माझी कशी फजिती होत आहे तें पहावं–'

'नव्हे ! इकडे माझ्याशीं कसं अविश्वासानं नेहमीं वागायचं असतं, माझ्यापासून कांहीं गोष्टी कशा लपवून ठेवायच्या असतात हें सांगून सिद्ध करण्यापेक्षां 'हा सूर्य हा जयद्रथ' या न्यायानें सिद्ध करून देण्याचा हा प्रसग आहे असें मला वाटलं म्हणूनच मी इकडच्या इच्छेकडे दुर्लक्ष करून बळेंच इथं थांबलें !–मी म्हणत होतें तं हेंच बरं का ! हेंच अं ! पण इतकं कांहीं लगेच उदास होऊन–शून्य दृष्टीनें खिडकीच्या बाहेर पहायला नको कांहीं !– काल रात्रीं घरीं यायचं झालं त्यावेळीं असंच उदास असायचं ! मी विचारणार होतें–पण मागें मला पुष्कळदां थांग लागूं दिला नव्हता, कांहीं तरी उडवाउडवीचीं उत्तरं दिलीं होतीं म्हणून मी कांहींच विचारायचं नाहीं असं ठरवलं नी स्वस्थ राहिलें. हो ! नुसतं विचारून काय करायचं ? दाद मिळाली पाहिजे. तेव्हां हें आज असं विचारावं म्हटलं !–मी गेल्या कांहीं दिवसांत कितीदां तरी पाहिलं; आतां आला होता तो गृहस्थ येऊन गेला कीं आपलं अस्वस्थ व्हायचं. बेचैन राह्यचं. विचारलं तर बोलायचं नाहीं–सांगायच नाहीं ! खरंच गडे, हा कोण ? तो कां येतो ?–कुणाकडे चला म्हणतो ? आहे काय हें सगळं गुपित ?–आतां तरी मला सांगायचं होतं !'

'अशी एकसारखी सतावूं नकोस तूं आणखी !–झालं तेवढं पुष्कळ झालं आहे. तुझा हट्टच असेल तर सांगेन मग सगळं ! म्हणजे मग तुलाच कळेल कीं मी जें कांहीं लपवीत असे तें माझ्याकरतां नसून–'

'बरं तर ! केव्हांहि सांगावं. माझी हरकत नाहीं. केव्हां तरी पण सांगावं, एवढंच माझं म्हणणं !'

+ + +

‘ कसा काय झाला आहे आतांचा सैंपाक ? ’—

‘ कसा काय म्हणून काय विचारतेस ? प्रत्येक जिन्नस इतका छान झाला आहे म्हणतेस–’

‘ होय ना ?–मग हें एवढं–’

‘ अग पण–किती वाढणार तूं मला ?–सगळं ताट भरलं ना ?–माझं पोट म्हणजे काय समजतेस तूं ?–’

‘ आतां किनई, पुढं पाहून मुकाट्यानं घातलं आहे तें खायला लागावं कसं ?–’

‘ वा: ! वा: ! म्हणजे काय ?–’

‘ तें मग सांगेन–लक्ष देऊन जेवावं पहिल्यांदा ! ’

‘ तूं काय मला एकादं अजाण मूल समजतेस का ? ’

‘ जेवणावर लहान मुलांचें तरी कुठं इतकं लक्ष असतं ? मुला-सारखं जेवणावर लक्ष नसायचं तें नसायचं नी वर आणखी ‘ मूल कीं काय ? ’ म्हणून विचारायचं-! ’

‘ अरे पण–माझ्या पोटाचा अंदाज–मला कीं–’

‘ मला ! रोजची वाढणारी मी आहें ना ? किती वाढायचं हें मला माहीत आहे ! ’

‘ अरे बापरे ! मी रोज इतकं का खातों ? ’

‘ इतकं म्हणजे किती ? ’

‘ हें वाढलं आहेस इतकं–’

‘ बाहेर कुठें हॉटेलमध्यें–मित्राकडे कांहीं जास्त कमी खायचं झालं नसलं म्हणजे वाढलं आहे यापेक्षां नेहमीं अधिक खायचं असतं–’

‘ वा: ! हॉटेलची माझी संवय मोडली आहे. आणखी रोज रोज स्नेहीहि कुणी भेटत नाहीं–’

' होय ना ? मग आणखीसुद्धां मी वाढीन तितकं घेतलं पाहिजे ! माणसानं निदान जेवायच्या वेळीं तरी जरा चित्त थारीं ठेवावं. सात-सायास करून आम्हीं कांहीं जिन्नस करावेत नी–'

' पण तूं केलेल्या जिनसांना मी कधीं नांवें ठेविलीं आहेत का ?'

' जिनसांना नुसतं नांवाजून नाहीं भागत. तीं मनासारखीं घेऊन खाल्लीं म्हणजे करणाराला बरं वाटतं हो !—'

' तुम्हां बायकांचा भयंकर जुलूम आहे बुवा ! '

' जुलूम करण्यापर्यंत मजल आणावीच कां पण पुरुषांनीं ?–आणखी किनई, हातांतला घास हातांत–तोंडांतला तोंडांत–असं राहून बोलण्या-पेक्षां खातखात बोलायला कसली हरकत आहे का ? '

' शिकस्त झाली तुझ्यापुढें –'

' खात–खात बोलायचं गडे ! '

' तूं वाढशील तितकं खाण्याचा आग्रह का पण तुझा ? '

' अन्नमय प्राण असतो नी प्राणमय पराक्रम असतो म्हणतात. इकडं खावंहि खूप–नी पराक्रमहि खूप करावा अशी माझी फार फार इच्छा आहे, म्हणून मी आग्रह करतें हो ! एरव्ही मला तरी काय करायचं आहे ? '

' आतां धन्य आहे तुझ्यापुढें ! आग्रह करकरून जेवायला वाढा-यची खोड माझ्या आईला होती-त्यानंतर तिची परंपरा तूं चालविली आहेस—'

' तथास्तु ! सासुबाईंचा आग्रह चालूं द्यायचं होत असे ना ? तसाच माझाहि पण चालूं दिला पाहिजे. मग हें ठरलं तर ! पानावर येऊन बसल्यावर, आम्हीं वाढूं तें, वाढूं तितकं, मुकाट्यानं घेतलं पाहिजे–खाल्लं पाहिजे. तक्रार चालायची नाहीं कीं हट्ट करायचा नाहीं ?'

' हें कबूल केल्यावर वाटेल तुला बरें ? '

' हो ! '

'मग कबूल ! झालं मनासारखं ?–कां आणखी कांहीं आज्ञा ?–'

'इश्श !–'

+ + +

'शनिवार आहे नाहीं आज ?'

'त्याच्याबरोबरच 'गंधर्वां'चं 'स्वयंवर' आहे हे सांगायचं असेल !'

'कसं अगदीं मनांतलं ओळखलंस !'

'तें ओळखलं नी 'स्वयंवर'ला 'चल' म्हणून म्हणायचं व्हायचंय, हेंहि पण ओळखलं !'

'शाबास ! शाबास ! शाबास ! पति–पत्नि एक म्हणतात तें याचमुळें ! मनकवडी म्हणायचं तें याचकरतां ! शहाणी म्हणायचं तें याचसाठीं !–मग येणार ना नाटकाला ?'

'कां ? कुणी मित्रमंडळी नाहींत वाटतं आज बरोबर ?'

'मला नाटक पाह्यची इच्छा आहे आज ! तिथें जाऊन चावट-पणा कांहीं करायचा नाहीं !–'

'म्हणजे काय ?–'

'मित्रांच्या चांडाळचौकडींतून जायचं म्हणजे नाटक पाहाणं नाहींच होत !-नुसता चावटपणाच होतो. मध्येंच उठायचं. मध्येंच बसा-यचं. बाष्कळ कोटयाच करायच्या--बाहेरच्या हाटेलांत जाऊन तासचे तास बसायचं आणि परत यायचं. असं तें नाटक होतं ! अणि चहा पीत तुझ्याबरोबर नाटक पाहणं म्हणजे त खरं नाटक पाहाणं– '

'तें कसं काय '–?

'नाटककाराचं नाटयलेखनांतलं कौशल्य, नटांचं अभिनयांतलं मर्म, हें तूं असलीस म्हणजे इतकं सुंदर समजाऊन सांगतेस–हंसूं नकोस, थट्टा समजूं नकोस--पण तूंच मला कित्येक नाटकं समजावून दिलीस, त्यांची श्रेष्ठता पटवून दिलीस, नाटकाच्या आणि नटांच्या

सुंदर अभिनयांत समरस कसं व्हायचं तें तूंच मला शिकवलंस, हें निरभिमानानें केव्हांहि सांगू शकेन ! '

' बोलायला लागलं म्हणजे भारीच बोलायचं ! '

' मग येणार ना ?– '

' अन् नाहीं आलें तर–'

' माझ्या मनाचा हिरमोड केल्याचं पाप पदरीं घेशील !–माझ्या अंतःकरणाचा हिरमोड करणं तुला आवडेल का ?–'

' हें काय हें ?–अगदीं काय असं करायचं तें ?–'

' स्वयंवराला येणार ? येणार कीं नाहीं बोल ? येणार ! येणार ! हें एक ठरलं !–'

' नाहीं ! '

' कां ? '

' माझी इच्छा ! '

' ठीक आहे ! माझी इच्छा– नव्हे निश्चय ऐक, तूं जेवायला घातल्याखेरीज जसं माझं पोट भरायचं नाहीं हे ठरल्यासारखं आहे, तसेंच तूं बरोबर असल्याखेरीज नाटक–सिनेमाहि पण माझ्या उपयोगीं नाहीं; इतकेंच काय, पण अष्टाधिकार तूं माझ्यावर गाजवायचेस व मी ते गाजवून घ्यायचे हा या शुभ घडीलाच निश्चय जाहीर करीत आहें !–'

' हूं: '

' कां ? माझा हा निश्चय तुला लटका वाटला ?–तुला अष्टाधिकार दिले ते—'

' मी म्हणतें त्याचे निम्मे माझ्या पदरांत पडले तरी मी भाग्यशाली होईन ! पण तेवढं होणंच किती कठीण आहे ! मग अष्टाधिकाराच्या गोष्टी कशाला हव्यात ? '

' असं कां बरें !–तुझ्या कोणत्या अधिकारावर मी गदा आणली आहे ?'

' पण तसा अधिकार मी अजून कोणावर गाजविला नाहीं नी खरं सांगायचं तर मला तसा अधिकार मिळाला आहे कुठं ?—'

' कां बरें ? घरीं आल्यापासून तूं आपला ताबा चालवित नाहींस ? तसे अधिकार मी तुला दिलेले नाहींत ?—'

' सोपींव खातीं दिलीं आहेत–तींहि जुलमानेंच ! शिवाय केव्हां लहर फिरून तीं काढून घेण्यांत येतील याचा नेम कुठं आहे ?–राखीव खात्यांची तर गोष्टच बोलायला नको !—'

' तूं काय म्हणतेस त्याचा मला मुळीं अर्थच कळत नाहीं !'

' अंगलटीं येणारा अर्थ पुरुषांना कधीं कळतो का ?'

' हें मी नाहीं ऐकणार अं तुझं बोलणं !–माझ्या जेवणाचा ताबा तुझ्या हातीं दिला आहे !–'

' मी घेतला आहे. तो दिलेला नाहीं. शिवाय माझ्या हातून तो कधीं हिरावला जाईल याचा नेम नाहींच !'

' ललितकलांचा उपभोग घेतांना तूंच मजजवळ पाहिजेस असं मीच कंठशोष करून सांगत असतो ! तो अधिकार तुझ्याकडेच–'

' तोहि इकडच्या लहरीवर आहे. माझ्या नाहीं. ' नाटक–सिने-माला ' ' चल ' म्हटलं तर मी निघायचं ! मी तसं म्हटलं तर ' उत्तर ' काय मिळेल याची निश्चिति कुठं आहे ?–तेव्हां अधिकार दिला म्हण-ण्यांत दिखाऊ औदार्यापेक्षां अधिक तें काय आहे ?–'

' अं ?–'

' अं ? करण्यासारखं त्यांत काय आहे ? खरं तें बोललें. '

' बरें, तुझ्यामाझ्या प्रेमसंबंधांत–तूंच माझी ऊर्वशी, देवांगना, रंभा असं मी आजवर मानीत आलों नाहीं काय ?—'

‘ कोण जाणें ! ’

‘ म्हणजे ? यावरहि तुझा विश्वास नाहीं ?–’

‘ पण सत्य हें एक स्वतःला आणि दुसरें सर्वेश्वराला माहीत ! पण मी म्हणतें, असो. त्याबद्दल मी भाग्यशाली समजतेंच नाहीं तरी ! मी तितकी आवडलें नसतें, आणि आवडेल अशी सवत आणिली असती तर मी काय करणार होतें ? तेव्हां तेवढ्यापुरती आणि या क्षणापर्यंत तरी मी पूर्ण भाग्यवान् आहें, हें मी कबूल करतें !–’

‘ खरोखरच धन्य आहे तुम्हां बायकापुढें हं ! पुरुषांनीं तुमच्याशीं कसं वागलं म्हणजे तुम्ही संतुष्ट व्हाल, हें परमेश्वराला तरी कळेल कीं नाहीं कोण जाणें —’

‘ इतकं तें कठीण आहे अं !–’

‘ तुम्ही बायका इतक्या संशयित दृष्टीनें सदासर्वदा पुरुषांकडे पहात असतां अं ? ’

‘ असं पाहण्याइतकं बायकांना कळायला लागलं, याबद्दल पुरुषांना कां वाईट वाटावं ? त्यांची का इतकी तारंबळ उडावी ?–अन् ही तारंबळ इतक्यांतच ? अष्टाधिकारांपैकीं उणेपुरे दोन तीनच अधिकार आमच्या हातीं पडले आहेत–तेहि जातीलच ही भीति असतांना आणि चौथ्या अधिकाराची अजून पुरती गोष्टहि निघाली नसतांनाच ? केवढा हा पुरुषांचा निष्कारण थयथयाट आणि गोंगाटपणा ? ’

‘ अबबब ! काय किचकट बोललीस हें ! बायकांना जरा सैल सोडलं, थोडी सवलत दिली कीं, त्या वाटेल तशी निरर्थक टकळी कशी चालवितात, याचा प्रत्यय तूं मला या वेळीं चांगलाच आणून दिलास !’

‘ खरं ना हें ?–बरं तर ! इथं थांबू तरी कशाला मग ? आपलं स्वयंपाकघरांत स्वराज्य संभाळतें–जातें–’

‘ थांब ! थांब ! निघाली आपली ! इतका राग यायला काय झालं ?– माझ्या एवढ्या बोलण्याचा तुला इतका फणकारा आला, आणि तूं तर

आज माझ्यावर शस्त्रच उपसलं आहेस! पत्नीधर्मांचे सर्व कायदे झुगारून देऊन, जिव्हास्त्रानें मला ठार करण्याची पाळी आणलीस, पुरुषांच्या–पतीच्या अनादिसिद्ध समजल्या जाणाऱ्या हक्कांची नुसती पायमल्ली चालविली आहेस, त्याचा मला किती राग यायला हवा होता ? माझ्याजागीं दुसरा एखादा असता तर तो बायको बोलली म्हणून जीव द्यायलाच गेला असता, नाहीं तर वैतागून संन्यासाची तयारी तरी करता ! पण मी पहा कसा समुद्रासारखा शांत आहें !–'

'पण तो खवळेल केव्हां याचा तरी नेम कुठें आहे ?–शिवाय माझ्या ठिकाणीं दुसरी एकादी असती तर तिनंहि पण इतकं बोलून घेतलं नसतं. ती उठली असती नि माहेरीं चालती झाली असती. एकादवेळीं आकाशपाताळ एक करून कपाळ फोडून घ्यायला बसली असती! तशीच एकादी आधुनिक शहाणी असती—'

'तर तिनें काडीमोडसुद्धां मागितली असती–'

'पण माझ्यासारखी चेचवड बायको मिळाली आहे म्हणून–'

'म्हणूनच विचारतों कीं आज 'स्वयंवर'ला येणार कीं नाहीं ?'

'माझ्या अटी मान्य असल्या तर येईन !'

'कोणत्या तुझ्या अटी ?'

'माझ्याकडे कसेबसे जे दोन तीन अधिकार आहेत ते पक्के व्हावेत.'

'बरं ! पुढं ?—'

'मी मागतें तो अधिकार मला मिळाला पाहिजे आणखी तो आजच्या आज मिळाला पाहिजे–'

'अरे वाः ! तूं तर अगदीं फर्मानच सोडायला लागलीस !'

'वेळच तशी आली आहे !'

'बरं, कोणता अधिकार तो ?'

' तो द्यायला अत्यंत कठीण वाटेल. आढेवेढे घेण्यांत येतील. पण तो मिळाला पाहिजेच !–'

' पण कोणता तो ?–सांगितल्याखेरीज–'

' गृहिणी सचीवः ! ' हा अधिकार नुसता सुभाषित भांडारांतच पडून राहिलेला आहे. तो अधिकार मला अमलांत आणायचा आहे ! '

' म्हणजे काय ?—'

' पुरुष बाहेर जे व्यवहार करतात, त्याचा थांगपत्ता आम्हा बायकांना मुळींच लागूं देत नाहींत. आमची सल्लामसलत विचारीत नाहीत- ' बायकांची अक्कल चुलीपुरती' म्हणून आम्हांला तुच्छ लेखतात. आपल्याच अकलेच्या बळावर उलाढाल्या करतात आणि ते व्यवहार गळ्याशीं आले म्हणजे आपल्या अर्धांगीसह–तिचा कांहीं एक अपराध नसतांना–दुःखांच्या गर्तेत गाडून घेतात ! ' स्त्रियांची कायदे-शीर दुर्दशा करण्याची शक्ति पुरुषांच्या जवळ आहे ' ती तो अधिकार आमच्या हातीं नाहीं म्हणूनच ! तो अधिकार आम्हांला मिळाला पाहिजे. त्या समान हक्काची आम्हांला गरज आहे. त्यासाठीं आम्ही असंतुष्ट आहोंत ! '

' पण तो अधिकार कोणी द्यायला कशाला पाहिजे ? पात्रता असली कीं तो मिळणारच !–'

' हें गुळमुळीत उत्तर नको आहे मला !–'

' पण पात्रता अंगीं आणा नी घ्या तो अधिकार ! '

' आम्हांला पाण्यांत तर पडूं द्या. मग आम्हीं पोहायला शिकूंच !'

' वाटेल त्या बाबतींत स्त्रियांचं ऐकून वागलं आणि गोंधळ माजला तर–'

' तीच जगाची समजूत आम्हांला बदलून टाकायची आहे. त्याचकरतां सचिवी हवी आहे–'

'पण स्त्रियांचं ऐकून जगांत वागणाराची 'बायल्या, बाईलवेडा म्हणून थट्टा करतात त्याची वाट काय?'

'तसं ऐकून घेऊन संसाराचं स्वराज्य सुयंत्रित चालविणं चांगलं कीं, तेवढाच त्रास टाळण्यासाठीं घरादाराचा सत्यनाश करून घेणं बरं?'

'कांहीं असलं तरी तूं म्हणतेस तो सचिवपदाचा अधिकार अर्पण करणं कठीण आहे–'

'हिन्दुस्थानला स्वराज्य देणं सरकारला जितकं कठीण वाटतं तितकंच–'

'म्हणजे असंच म्हणेनास कीं आम्हा पुरुषांना हिंदुस्थानाचं स्वराज्य पाहिजे असेल, तर आम्ही तुम्हाला सचिवगिरी बहाल केली पाहिजे–'

'म्हणजे अजून याबद्दल शंकाच आहे वाटतं!'

'बरं, दिलेल्या अधिकाराचा दुरुपयोग झाला तर–'

'सर्वसमर्थ सरकार दिलेले अधिकार परत घ्यायला तीन पायावर तयार असतें, हें ध्यानांत आहे–'

'आणि तशीच पाळी आली तर–'

'अधिकारप्राप्तिनंतर तो संभाळायचा कसा याची काळजी दुसऱ्याला कशाला? आमचं आम्ही पाहून घेऊं!–'

'ठीक आहे. दिले आहेत समजा अधिकार!–आतां तरी 'स्वयंवर'ला–'

'छेः! आतां तसं विचारायचा अधिकारच दुसऱ्याला नाहीं! आतां आम्ही आश्वासन देऊं-'

'कीं आज 'स्वयंवर' ला नेण्यांत येईल! वाः खूप आहांत बाई-साहेब!'

' वाः ! एवढ्यानं कुठं झालंय ! मिळालेला अधिकार मी लगेच वापरून पहाणार आहें ! मिळालेला अधिकार शोभेसारखा नुसता अंगावर घालून ठेवण्याकरितां नाहीं ! '

' ठीक आहे, जशी तुमची मर्जी ! जसा तुम्हांला त्या अधिकाराचा उपयोग करून घ्यायचा असेल तसा खुशाल करून घ्या ! आमची ना नाहीं ! '

\+ + +

' प्रसंग असा आहे कीं, ते सावकारमहाशय आहेत आमच्या बाबांचे मित्र म्हणविणारे. बाबांचा आणि त्यांचा 'देण्याघेण्या'चा बराच दिवसांचा ऋणानुबंध आहे. प्रसंगीं बाबा त्यांच्याकडून लागेल तेवढी रक्कम आणीत व ती यथावकाश सव्याज फेडीत रहात असत. बाबांच्याकडे बाकी कितीशी आहे, हें त्यांनीं कधीं पाहिलें नाहीं, आपण किती फेड केली आहे–किती सावकारांचें देणें लागतों, याबद्दल बाबांनीं कधीं विचार केला नाहीं. देणं देत राहायचं, असा बाबांचा अव्याहत क्रम होता. अशाच स्थितींत बाबांनीं हें जग सोडलं. दादासाहेब सावकारांनीं बाबांच्या मृत्यूनंतर दोन तीन महिने मौन धरलं, पण त्यानंतर त्या म्हाताऱ्यानें माझ्यामागें ससेमिरा लावला आहे, ' येऊन भेटून जा. बाबांचे हिशेब पहा. मागील संबंध पुढें चालू ठेव, ' हेंच त्या म्हाताऱ्याचं म्हणणं ! मला हा सावकारी पाश नको आहे. बाबांचे कागदपत्र नाहींत. म्हातारा गोड बोलून कोणत्या गोत्यांत घालील याचा मला भरंवसा नाहीं. त्याची भीति भेवडावीत आहे. त्याच्या गोड बोलण्यालाच मी भितों आहें, आणि एकसारखा पाठीमागें लागतो, दिवाणजीला धाडीत असतो, असा तो एकसारखा पाठपुरावा करीत असल्यामुळें त्याच्या सद्धेतूबद्दल मन साशंक होतें, त्याला मी काय करणार ? त्याच्या पाशांत अडकू नये ही इच्छा माझी व त्याचा प्रयत्न तर तसा ! अशी ही आम्हांमध्यें झटापट चालू आहे. म्हाताऱ्यानं बाबांच्या खातीं केवढी रक्कम चढवून ठेविली

आहे भगवान् जाणें ! सावकारी व्यवहाराची गुंतागुंत ब्रह्मदेवालासुद्धां उकलायची नाहीं !–यांत मींच हात टेकिला आहे. तिथें तुला सांगायचं काय ? आणि तूं सल्ला ती काय कपाळाची देणार ? '

' याचकरितां यापूर्वी मला यांतलं कांहीं सांगितलं नव्हतं ना ?–'

' होयच मुळीं !–'

' पण हीच केवढी तरी चूक झाली असं मी म्हणेन ! '

' झालं तें गेलं. आतां सारी हकिकत सांगितली आहे. व्यवहाराच्या कठोर खडकावरून तुला रखडायला लावून कष्ट देऊं नयेत म्हणून म्हणत होतों, पण तुला सुख घ्यायची इच्छा नाहीं–माझ्याबरोबर कष्टांत पडायचं आहे. पड बापडी ! हं, या प्रसंगीं काय सल्ला देतेस ती दे पाहूं! '

' हं ! आतां कसं विचारलंत ? आतां मला बरं वाटलं. गुपीत सगळं सांगितलं, हें पण किती चांगलं झालं ! मला त्यावर विचार करतां आला. आतां त्यावर सल्ला देणं किती तरी सोपं झालं आहे –'

' मग दे ना ती सल्ला. पडूं दे एकदां सचिवगिरीचा उजेड !–'

' दादासाहेबांच्याकडे सरळ–सरळ जाऊन भेटावं–हिशेब पहावेत–'

' अहाहा ! अकलेचा उजेड ! म्हणे सरळ सरळ जावं ! उचलली जीभ लावली टाळ्याला ! दादासाहेबांनीं तितक्याच सरळ सरळ मला तोफेच्या तोंडीं द्यावं–'

' त्यांच्या तोंडाच्याच ना ? मग त्यांत फारसं काय बिघडणार आहे ? '

' तसं झालं म्हणजे तुला आनंद होईल, नाहीं ?

' इकडून असं वागणं झालं नाहीं. मुद्दाम टाळाटाळी होत आहे, वडिलांचं देणं बुडविण्याचा बेत आहे, अशी दादासाहेबांची वांकडी समजूत इकडच्या अशा वर्तनानं एकदां दृढ झाली आणि आजपर्यंतची सहानुभूतीची त्यांची दृष्टि बदलून मग खऱ्याखोट्यासाठीं त्यांनीं इकडे जर कोर्टांत खेचलं, तर मग खचित वाईट वाटेल. त्यापेक्षां त्यांच्या

नुसत्या तोफेच्या तोंडीं जाण्यानें भावी आपत्ति-नेहमींची भीती तरी–टळेल, या कल्पनेनं मला आनंद झाला, तर त्यांत काय बिघडलं ?–'

'हो !–तूं म्हणतेस त्यांतहि थोडं तथ्य आहे.'

'आणखी जरा शांतपणानं विचार होईल तर थोड्यापेक्षां जास्त तथ्य असल्याचं आढळून येईल !'

'तो थेरडा कोर्टांत खेचायला कमी करायचा नाहीं !–'

'मग ?–'

'आणि समक्ष जाऊन भेटलों तर भलतेच हिशेब दाखवून घरा-दाराचा ताबा मागून, आम्हांला सार्वजनिक सडकेवरून फिरायला लावा-यलाहि ते कमी करायचे नाहींत !'

'काय व्हायचं असेल तें लवकर तरी होईल. सारखा हृद्रोग लावून घेण्यापेक्षां, चट्दिशीं काय तो सोक्षमोक्ष झालेला काय वाईट ?–शिवाय–'

'शिवाय काय आणखी ?–'

'प्रत्यक्ष प्रसंगापेक्षां त्या प्रसंगाची भडक भीति अधिक भेडसावीत असते, हें मीच इकडे सांगायला हवं असें नाहीं !'

'म्हणजे तुझें म्हणणें काय कीं मी त्या थेरड्यापुढं जाऊन उभं राहिलंच पाहिजे, त्याशिवाय तरणोपाय नाहीं.–'

'निदान पुरुषांना तरी अशी डर शोभत नाहीं. पूर्वींचे वीर रणांगणांत उडी घ्यायला कचरत नसत असं म्हणतात, हें खरं तरी आम्हां बायकांना कसं वाटायचं ?– '

'जीवनार्थ कलहाच्या–या युद्धाच्या–रणांगणांत मी छातीठोक उडी घेतली पाहिजे, हें अगदीं निर्विवाद आहे !—'

'मग उशीर कां ? आजचं काम उद्यांवर नाहीं टाकायचं !–'

'पण–समज–तुझी ही सल्ला सुफलदायी न होतां उलट अधिकच त्रासाला कारण झाली तर—'

'स्वतःच्या चुकीचा परिणाम स्वतःला कित्येकदां भोगावा लागतो, त्यावेळीं मनाची समजूत कशी घालायची असते ?—'

'ती गोष्ट निराळी.'

'नाहीं एकच ! पतिपत्नी मुळीं दोन नसतातच !'

'अगदीं निरुत्तरच केलंस ! निघालंच पाहिजे मला एकदम'

'हो ! का पुन्हां दिवाणजी घरीं यायची वाट पहायचीय् ?–'

'छट्–पण ते पहा दिवाणजी समोरून येताहेत–कोटटोपी चढवून त्यांना वाटेंतच गांठतों आणि परत नेतों–आलों हो दिवाणजी! पुढें येण्याची तसदी नका घेऊं. हा आलोंच पहा–'

'सांगितल खरं स्वारीला–उत्तेजनहि दिलं–काय होतं पहावं ! –सचिवपद अढळ रहायचं असेल तर परमेश्वर सत्याचा वाली, स्त्रीजातीचा पाठिराखा असेल, आमची उन्नती व्हावी, आम्हाला उजळ माथ्यानं समानहक्क मिळावेत, आमच्या हातून श्रेष्ठ प्रतीचं कार्य व्हावं, अशी त्याची मर्जी असेल तर होईल सारं नीटनेटकं ! मी तरी त्याची काळजी कशाला करूं उगीच ?–मी कांहीं सल्ला देण्यांत चूक केली नाहीं अशी माझी मनोदेवता सांगते आहे !–कांहीं म्हटलं तरी स्वारी परत येईपर्यंत जीवाची काळजी थोडीच रहाणार आहे ?'

'काय झालं ?–'

'पुष्कळ–पुष्कळ झालं !–'

'पण काय ? मुसळधार पाऊस पडला, कडक थंडीनं हुडहुडी भरली, रखरखलेल्या निखाऱ्यावरून चालावं लागलं;–का मध्यान्हींच्या सूर्यनारायणानं अंगाची लाहीलाही केली ? कां याच्यापुढे तसं कांहीं होणार ? चट्दिशीं सांगावं गडे ?–माझा जीव कसा खालींवर व्हायला लागला आहे–'

'तसं कांहीं झालं नाहीं आणि होणारहि नाहीं !–'

'मग आणखी काय झालं ?–'

'तुझी सल्ला लाखाची ठरली !' 'मी गेलों म्हणूनच चांगलं झालं. मी गेल्यावर दादासाहबांनीं गंभीरपणानं दिवाणजीलां आमचे हिशेब काढायला लावले.

'मग– ?'

'मग काय ? दादासाहेबांची पक्की खात्री होती कीं आमच्या-कडे खूप बाकी फुगलेली असावी म्हणून पण–'

'पण काय ? तुझी सल्ला लाखाची ठरली–तुझं सचिवपद शोभा-दायक झालं म्हणतों तें एवढ्याचकरतां. आमच्या बाबांनीं त्यांच्याकडे इतकी रक्कम भरली आहे कीं आतां आम्ही तर त्यांचं देणं एक कपर्दिका लागत नाहींच, पण उलट हजारावर आमचीच रक्कम त्यांच्या पेढीवर पडून आहे, असं आढळून आलं !'

'छान झालं ! देव पावला !'

'तुझ्यासारखंच मला वाटलं, मी आनंदांत फुलून गेलों ! तिकडे दादासाहेबांचा चेहरा खर्रकन् उतरला ! त्यांनीं तें लपविण्याचा प्रयत्न केला इतकंच ! म्हाताऱ्यानं हिशेबांत ढवळाढवळ केली नव्हती.–त्याच्या आंत–आणि तुझ्या सल्ल्यावरून हें कबूल केलंच पाहिजे–गेलों म्हणून फार उत्तम झालं !'

'होय कीं नाहीं ? मग आम्हीं व्यवहारी सल्लाहि योग्य तोच देतों, हें पटलं ना ?'

सोळा आणे पटलं आणि त्या तुझ्या अतुल गुणाबद्दल–अलोट चातुर्याबद्दल–निस्सीम प्रेमाबद्दल हें बक्षिस '

'अगबाइ, हें काय हें ?–भलत्या वेळीं भलतंच कांहीं तरी !–इश्श दारसुद्धां अगदीं सताड उघडं–निदान दार लोटायचं तरी.'

---

# ८

# पोलिसी पाहुणचार



त्या गांवची हवा चांगली आणि त्या गांवींच मनोहराच्या मावसभावाचें घर होते. मनोहर आजारी पडला व डॉक्टरांनीं त्याला कांहीं दिवस रजा घेऊन चांगल्या हवेंत जाऊन राहिल्यास औषधापेक्षांहि प्रकृति लवकर सुधारेल अशी सल्ला दिली. म्हणून सहकुटुंब मनोहर तेथें येऊन राहिला होता. डॉक्टरांची सल्ला खरी ठरली होती. मावसभावाच्या घरीं येऊन राहिल्यानंतर अल्पावकाशांत मनोहराच्या प्रकृतींत झपाट्यानें फरक पडूं लागला होता. त्याचा मावसभाऊ त्याला बंधुप्रेमाचा लाभ उत्तम प्रकारें देत होता. त्याची पत्नी–त्याच्या पथ्यपाण्याकडे पहावयाला अष्टौप्रहर मोकळी असल्यानें दक्षच राहत असे. मनाला व शरीरालाहि स्वाभाविकच विश्रांति मिळूं लागली –हवापाणी त्या गांवचें उत्तमच. मग मनोहराची प्रकृति सुधारण्याच्या मार्गाला लवकर लागली तर त्यांत काय नवल ?

मनोहराची गांवांत फारशी ओळखदेख कोणाशींच नव्हती. प्रथम प्रथम तो कुठेंच घराच्या बाहेर पडत नसे. नंतर जसजसें त्याला बरें वाटूं लागलें तसतसा तो हलके हलके कुठें तरी उगाचच हिंडू फिरूं लागला. शहरांत राहण्याची संवय. वाचनाचा नाद. स्वतः फारसा बोलका नसला तरी मंडळींत मिसळून गप्पासप्पा ऐकण्याचा छंद मनोहराला फार, परंतु त्या गांवांत तो जाणार कोठें ? बोलणार कोणाशीं !

त्याच्या मावसभावामुळें एक दिवस त्याला ' पोस्टां 'त जावयाला मिळालें. त्या गांवचें ' पोस्टऑफिस ' म्हणजे काय ? एका शाळेंत–एका कोपऱ्यांतील दोन खणांची जागा. छोटेंसें पोस्टाचें कपाट. शाळेंतीलच बाकें दोहो बाजूस मांडून केलेलें ऑफिस ! शाळेच्या हेडमास्तरांकडेच पोस्टमास्तराचें काम ! शाळेंतल्या खुर्चीवर जाऊन बसले म्हणजे शाळा-मास्तर; ' पोस्टऑफिस 'च्या जागेंत बसून काम करूं लागले कीं तेच पोस्टमास्तर ! पोस्टाची थैली येण्याच्या वेळीं मास्तरांच्या ओळखीपाळखीची झालेली आंवतीभवतीची गांवांतील प्रतिष्ठित, लब्धप्रतिष्ठित चार मंडळी पत्रें पाहावयाला म्हणून, पत्रें लिहावयाला म्हणून, मास्तरांशीं चार इकडच्या तिकडच्या गप्पा झोडायला म्हणून आपलीं किंवा दुसऱ्याचीं वर्तमानपत्रें, मासिकें आलीं असतील तीं मास्तरांच्या ' कृपेनें ' फोडून वाचावयाला मिळतात म्हणून तेथें जमावयाची.

तेथेंच गांवांतल्या कुटाळक्या, भानगडी, रहस्यें यांवर मन मानेल तसा जमलेल्या मंडळींत उहापोह चालावयाचा. तशीच चर्चा वर्तमान-पत्रांतील, नियतकालिकांतील, कुणी कांहीं मजकूर वाचून त्यावर सुरू व्हावयाची. कोणी मध्येंच मास्तरांना त्यांचें मत विचारीत. मास्तर केव्हां यासारखें तर केव्हां त्यासारखें मत ठोकून देऊन वेळ साजरी करीत.

म्हणजे ' पोस्ट ऑफिस 'ची जागा म्हणजे गांवांतल्या झब्बूंचा क्षणभर त्या जागीं जमून वाटेल त्या विषयावर, वाटेल त्या व्यक्तीवर, वाटेल त्या लेखावर हव्या त्या देशभक्तावर, पाहिजे त्या अधिकाऱ्यावर मनमोकळेपणानें बोलण्याचा तो एक अड्डाच होता.

तें ठिकाण मनोहरानें पाहिलें. चार मंडळी एकत्र बसून बोलताहेत, कांहीं वाचताहेत, मास्तरासारखा शाहणा त्यांत आहे हें पाहून मनोहरला बरें वाटलें. एकदां दोनदां तो मावसभावाबरोबर आपलीं पत्रें पाहावयाला म्हणून तेथें आला. पहिल्या खेपेस मास्तरांनीं आदरपूर्वक मनोहराबद्दल त्याच्या मावसभायाकडे 'हे कोण?' म्हणून पृच्छा केली. त्यावेळीं त्यानें दोघांचा परिचय करून दिला.

त्यानंतर मनोहर बहुतेक तेथें येऊन थोडा वेळ टेकूं लागला. मास्तरांच्या कृपेनें त्याला 'पोस्टां'त येणारीं वर्तमानपत्रें, नियतकालिकें पहावयाला मिळूं लागलीं.

तेथें जमणाऱ्या मंडळींत वर्तमानपत्रांतल्या एकाद्या राजकीय वगैरे लेखावर जेव्हां रणकंदनें माजत, हमरीतुमरीवर प्रकरणें येत, त्यावेळीं मनोहराची त्यामुळें करमणूक तर होईच. पण मोठमोठ्या देशभक्तांनीं देशांत चालविलेल्या चळवळी खेडोपाडीं आतां पोचल्या आहेत, पचल्या आहेत, रुजल्या आहेत, अशी त्याची कल्पना होऊन त्याला बरेंहि वाटे. देशभक्ताची स्तुति आणि अन्यायी अधिकाऱ्यांची हेटाळणी, निंदा, तिरस्कार ती मंडळी निर्भयपणानें करतांना मनोहरानें ऐकलें म्हणजे तो अगदीं स्तिमित होऊन जाई! तो चकित मुद्रेनें सर्वांच्याकडे भारावल्या दृष्टीनें पहात राही.

मनोहराचें शहरांतलें राहणें. पोषाख खादीचाच असला तरी नीटनेटका, टापटिपीचा, डोळ्यावर सोनेरी चष्मा—पण स्वभाव अगदीं अबोल. त्यामुळें त्या मंडळींत तो जाऊन बसू लागल्यापासून ती ती मंडळीं त्याच्याकडे निरनिराळ्या चष्म्यांतून पाहूं लागली होती. कोणाला वाटे हा खादीवाला आहे अर्थात् तो गांधीभक्त असलाच पाहिजे. म्हणून त्या धोरणानें बोलतांना एखादे वेळीं मास्तरांप्रमाणें त्यालाच मत विचारीत. त्याच्या अबोलपणानें कोणाला वाटे, टेहळणी करावयाला आलेला हा कोणी गुप्त बगलबच्चा तर नसेल? म्हणून त्याच्याकडे कांहींजण साशंकतेनें पहात.

मनोहर बहुतेक बोलतच नसे. आपला वाचनांत दंग असे. केव्हां बोलावयाची जरूरच वाटली तर एकदोन शब्दांत उत्तर देई. ती मंडळी त्याच्या त्रुटित बोलण्यानें अधिकच गोंधळून जात.

मनोहर म्हणजे त्या जमणाऱ्या मंडळींना थोडेंसे गुढच वाटूं लागला होता इतकें खरें !

त्या मंडळींच्यॉ अर्वाच्य गोष्टी. गांवांतल्या लोकाच्या निंदा, कुचाळक्या, घमेंडीच्या गोष्टी, अरेरावीच्या बाता, त्यांच्यांत मुरलेलें अगाध अज्ञान यांची मनोहराला अजून चांगलीशी ओळख पटलेली नव्हती. म्हणजे तोही त्यांच्या बोलण्यावरून त्या मंडळींना 'पक्की' 'हुशार' 'चतुर' 'कर्तव्यदक्ष' 'निर्भय' असेंच मानूं लागला होता.

—२—

'तुम्हीं कांहीं म्हणा. पण गांधीयुगांत पोलिसांच्या बागुलबोवाला पोरीबाळीसुद्धां भीत नाहींत. मुंबईसारख्या ठिकाणीं चळवळींत भाग घेणाऱ्या बायकामुली पोलिसांना हाताबोटावर नाचवीत असतात. गांधींनीं तुरुंगाची भीति आणि पोलिसांचा धाक यांना कवडीमोल करून टाकलें.' सर्वांगाभोवतीं ब्लँकेट लपेटून 'पोस्ट ऑफिस'चें थोडेंसें दार अडवून, कोंवळ्या उन्हाला पाट देऊन बसलेल्या एका सद्‌गृहस्थांनीं नवीनच आलेल्या वर्तमानपत्रावरून डोळे फिरवित मध्येंच मान वर करून, आजू-बाजूच्या मंडळीकडे पहात, पिस्तूलछाप विडीच्या तोंडांतील धुरा-बरोबर वरील वाक्यांचा आवाज काढला. गांवांत वाटावयाला जाणारा पोस्टाचा शिपाई पिशवींतून आलेल्या पत्रांवर पोस्टाचे छाप बडवून तीं नीट जुळवत होता. मास्तर वर्गातल्या मुलांना बराच वेळ करावें लागेल असें पुष्कळसा आंकडेमोडीचे उदाहरण घालून 'पोस्ट-आफिसचें'चें लेखी काम उरकण्यांत दंग झाले होते. पुढच्या गांवीं जाणारा पोस्टाचा रनर आपल्या ताब्यांत आलेल्या पोस्टाच्या पिश-वीला लाख उन्ह करून शीलबंद करण्यांत गढला होता.

f कुणी कार्ड पाकिट विकत घेण्याकरिता खोळंबले होते! कुणी अडाणी, 'दादा आमचा कागुद लिवा' म्हणून ओळखीच्या माणसांशी सलगीनें आणि आर्जवानें विनवित होते. एक बाई मुंबईस काम करणाऱ्या आपल्या नवऱ्याकडून मनिआर्डर आली आहे काय म्हणून पोस्टाच्या शिपायाला विचारीत होती. याप्रमाणें मंडळी आपापल्या धांदलीत असतां, मुंबई, पोलीस, चळवळ वगैरे शब्द कानीं पडतांच सर्वांनीं ते उच्चारणाराकडे क्षणमात्र कान टवकारले. त्याच वेळीं नित्याच्या बैठकींतील दुसरे एक थोडे उतार वयाचे आंगात बंडी, डोकीला गंगाजम्नी कांठाच्या उपरण्याची टापशी, कानांत जानवें अडकलेलें, हातांत पाण्यानें भरलेला तांब्या, असे एक गृहस्थ पान तंबाखू खाऊन पिचकारी मारीत तेथें आले. त्यांच्याच मागोमाग 'पोस्टाची वेळ' साधून मनोहरही येऊन दाखल झाला.

'काय आबा?' आतांच आलेल्या गृहस्थानीं वर्तमानपत्र हातीं असणाऱ्या गृहस्थास तेथें येऊन बसत, सभोंवार पहात विचारलें, 'आज काय तुमच्या गांधींचा पराक्रम वर्णन केला आहे वर्तमानपत्रवाल्यानें?'

'पराक्रम म्हणून काय विचारतां बाबा?' मनाप्रमाणें श्रोता मिळतांच त्या गृहस्थानें आपला मोर्चा प्रश्न विचारण्याकडे वळविला. 'गांधींच्या पराक्रमानें लोकानीं पोलिसांना गाय बनविलें आहे. इतके दिवस लोक पोलिसाच्या पाहुणचाराला बळी पडत असत. पण आतां पोलिसच लोकांच्या पाहुणचाराला भ्यायला लागले आहेत. पोरंबाळ पोलिसांना वाकुल्या दाखवतात. पोरीबाळी पोलिसापुढें नाक खाजवून त्याची गंमत करतात. आतां बोला! गांधींचा आणखी कोणता पराक्रम पाहिजे तुम्हांला?'

'खरं म्हणतां कीं काय?' जवळ बसलेल्या गृहस्थाजवळ खुणेनें पानतंबाखूची चंची मागत ते गृहस्थ म्हणाले, 'बाकी असेलही खरें

म्हणा. पण हे वर्तमानपत्रवाले राईचा पर्वतसुद्धां पुष्कळ वेळां करतात. उगाच भडक रंगांत वाटेल त्या क्षुल्लक बातम्या अव्वाच्या सव्वा रंगवित असतात, म्हणून विचारतों.' बोलतां बोलतां मनोहराकडे त्यांचें लक्ष गेलें. त्यांना ठराविक शंका आली. त्यांनीं त्या धोरणानेंच तें वाक्य उच्चारिलें.

'हं तुमचं कांहींतरीच बाबा ! हे मुंबईवालेच येथें बसले आहेत; त्या मंडळींतच हे वावरणारे. त्या परिस्थितींत वागणारे आहेत. यांनाच विचारा कीं ! वर्तमानपत्रें खोटें काय म्हणून लिहितील ? आणि तशीं तीं लिहूं लागलीं तर त्याच्यावर विश्वास कोण ठेवील आणि त्यांचा खप कसा होईल ? अहो बाबा, मुंबईचे राहाणेवाले लोक शिकलेले असतात. त्याना कायदेकानु कळतात.' नंतर तोच मनोहराकडे वळून त्यानें त्यालाच विचारिलें, ' काय हो मुंबईवाले, वर्तमानपत्रें खोटें लिहितात काय ?'

मनोहरानें तोंडापुढचें वर्तमानपत्र बाजूला केलें, दोघांनाहि पटेल असें सांगण्याचा प्रयत्न करण्याचें ठरवून, त्यानें आपल्या मितभाषेंत सांगावयाला सुरवात केली; ' वर्तमानपत्रें लिहितात तें अगदींच खोटं नसतं, पण त्याचं असं आहे—आतां हें खरें कीं—एकंदरींत मुंबईची परिस्थिति निराळी—'

' आणि इकडची वेगळी. मी तेंच म्हणतों. '

आजच्या बैठकींत इकडच्या आणि मुंबईच्या लोकांचा आणि पोलिसांचा विषयच वरील मंडळींत वरीलप्रमाणें निघाला. बोलण्याचा ओघ मुंबईकडून लगेच आपल्या गांवापुरत्या विषयाकडेच वळला.

मास्तरांच्या हातांतलें काम संपलें. सरकारी गृहस्थ ते. आपल्या बैठकींत—पोलिसांचा—सरकारी—विषय पाहिजे कशाला ? असें मनात येऊन, तो बदलण्याच्या निमित्तानें मास्तरांनीं मनोहराला विचारलें, ' आतां कशी काय आपली प्रकृति ? इथें आल्यापासून चांगली सुधारलेली दिसते. आतां लवकरच मुंबईकडे कूच करणार असाल नाहीं ? बरं वाटू

लागल्यावर तुम्हां मुंबईस राहिलेल्या मंडळींना असल्या खेडेगांवांत कसें चैन पडणार ?

‘ तें कां मास्तर ? मला इथंहि चांगलें करमलं. या मुक्कामांत पाहाण्यासारख्या, ऐकण्यासारख्या, लक्ष्यांत राहण्यासारख्या, उपयोग करून घेण्यासारख्या अनेक गोष्टी मला वाटल्या. संवयीची गोष्ट सोडून द्या. पण आतां एक दोन दिवसांत माझी मुंबईला जाण्याची वेळ आली आहे; जावें लागणार आहे, तरी पण इथें आणखी राहिलों असतों तर बरं झालं असतं—असेंच निघतांना मला वाटेल. ’ मनोहरानें उत्तर दिलें.

त्याच्या उत्तरानें तेथील लोकांच्या मनांत अनेक तर्ककुतर्क आल्याशिवाय मात्र राहिले नाहींत. सर्वच मंडळी त्याच्याकडे निरनिराळ्या दृष्टीनें पाहूं लागली. वास्तविक मनोहरानें सरळ, योग्य तेंच सांगितलें होतें.

त्या मंडळींतच नेहमीं मोठमोठ्या गोष्टी ऐकत बसणारा एक नांगऱ्या याही वेळीं बसला होता. मास्तर–मनोहराचें बोलणें थांबतांच त्यानें गांवांतील नवीन एक बातमी तेथें फोडली.

‘ आबा, आपल्या भागाचा त्यो खान फौजदार बदलून गेला आन् त्याच्या जागीं लगोलग नवा फौजदार आलाबी ! भारी बाबा त्या खान फौजदाराचा ह्या भागांत दरारा ! लै शिव्या हसडायचा ! आन् असा बदहडायचा कांहीं पुसूं नगा. आतां ह्यो आलाया—’

‘ आतां आला आहे तो ब्राह्मण फौजदार आहे. शिवाय शिकलेला आहे. त्या दाढीवाल्यांत आणि याच्यांत थोडंतरी अंतर पडायचंच ! ’ बाबा त्या नांगऱ्याकडे वळून म्हणाले.

‘ म्हंजी बरं. न्हाई तर ह्योबी त्या खानापरमानंच असला तर मग सुईच नाहीं राह्यली. त्यो बामण म्हणायचा नाहीं, शेतकरी म्हणायचा नाहीं, अक्षी संमद्यास्नी झोडपायचा ! नवा बामण झाला तरी फौजदारच त्यो;

आपला आम्हां गरिबास्नी हात दावल्याबिगार राहील व्हय? नांव कशाला घेता राव?' त्या नांगऱ्यानें आपलें पोलिसाबद्दलचें ठाम मत ठोकून दिलें.

'नवाच आला आहे फौजदार' आबा म्हणाले, 'पाहूंया कसा वागतो आहे, कसा वागवतो आहे. बाकी कसाहि वागला तरी तो बोलून चालून फौजदार! आम्ही खेड्यांतील अडाणी–शेळयामेंढ्या-प्रमाणें आहोंत तेथपर्यंत, तो आपल्याला कसाहि वागविणारच! मुंबई-वाल्यांनीं जसं गांधींचं शिक्षण उचललं तसं आम्हीं घेतलं पाहिजे; आणि निडर झालं पाहिजे. त्याशिवाय उपयोग काय?'

पोलिसांचा विषय चालतां चालतां खराच तेथें तितक्यांत एक पोलिस शिपाई दत्त म्हणून आला! त्यानें आंत डोकावून पाहिलें. सर्वांना न्यहाळलें आणि आपल्या गुरगुरणाऱ्या आवाजांत–खिशांतील एक पिवळा कागद काढीत पुकारलें, 'मनोहर माधव देशमूख येथें कोण आहे?'

'मी तो!' मनोहरानें स्वतःच म्हटलें, 'काय आहे?'

मास्तर–मनोहरादि तेथें असलेल्या सर्वांनीं एकदम चमकून त्या शिपायाकडे पाहिलें.

'आपल्याला आतांच्या आतां फौजदारसाहेबांनीं बोलावलं आहे.' त्याच्या हातांत तो पिवळा कागद देत शिपाई म्हणाला. 'मी आपल्या घरीं जाऊन चौकशी केली. आपण पोस्टांत असाल अशी माहिती घरीं कळली म्हणून येथें आलों. चला आपण. असाल तसे बोलावलें आहे फौजदारसाहेबांनीं. पुढें घालून घेऊन यायला मला हुकूम दिला आहे!'

मनोहरानें कागद वाचला. शिपायानें तोंडीं सांगितला तोच मजकूर हडेलहप्पि भाषेंत होता. मनोहर त्या अकल्पित प्रकारानें बराच गोंधळला. तेथें असलेल्या मंडळींतही बरीच चलबिचल झाली.

'मला फौजदारांनीं बोलावलें आहे?' मनोहर चमत्कारिक रीतीनें शिपायाकडे पहात म्हणाला.

'आपणच मनोहर माधव देशमुख–मुंबईवाले ना? आपणासच बोलाविलें आहे. बरोबर घेऊन येण्याचा हुकूम आहे मला, चला. आटपा. मग उशीर का?' मनोहरला आतां मुकाट्यानें उठावेंच लागलें. फौजदार कोण? आपला त्याचा संबंध काय? आपल्यामागें अकारण हें कसलें सरकारी आणखी कुलंगडें आहे? इत्यादि अनेक प्रश्नचिन्हें त्याच्यापुढें उभीं राहूं लागलीं. तो उठला. शिपायाला 'चला' म्हणत तो निघाला. जातां जातां त्यानें तेथें बसलेल्या मंडळीकडे अगदीं अहेतुकपणें पाहिलें. तीं सर्व मंडळी एकमेकांच्या तोंडाकडे, शिपायाकडे, मनोहराकडे आळीपाळीनें भीतियुक्त आश्चर्यानें तो दिसेनासा होईपर्यंत पहात होती. त्यानंतर तेथें कुणी फारसं थांबलेंच नाहीं. ज्यानें त्यानें मुकाट्यानें आपला रस्ता सुधारला!

आबाच्या मनांत आलें 'हा मुंबईचा खादीभक्त मुंबईस चळवळींत कांहीं गडबडगुंडा करून आला असावा. तें पोलिसमार्फत प्रकरण येऊन त्याला येथें पकडण्यांत येणार असावें. आतां याच्याबद्दल वर्तमानपत्रांत कांहीं तरी खास येणार!'

बाबाला वाटलें, 'खादीचा पोषाख करून मुकाट्यानें आपल्यांत येऊन बसणारा सरकारी गुप्त पोलिस खात्यांतलाच खास असावा. गांवांतलीं, आपल्यांतलीं कुलंगडीं त्याला जीं सांपडलीं असतील तीं तो फौजदाराला ऐकवणार. लवकरच गांवात फौजदार गडबड उडवून देणार. कांग्रेसबद्दल बोलावयाची चोरी–कांग्रेसवाल्याला मदत करणाराचें पाप. आतां हा गुप्तपोलीस ऑफिसर कोणती संक्रांत आणतो आहे आणि कोणती नाहीं, हें एक देवच जाणें!'

मास्तर रुमाल डोक्याला गुंडाळीत–गळयाभोंवतींचें उपरणें सांवरीत क्लासावर आले. पण त्यांचें तोंड उतरलेंच होतें. त्यांचें शिकवण्यावर कांहीं लक्ष लागेना. 'हा मनोहर कोण? पोस्ट ऑफिसांत, आम्हीं कुणाचीं कॅलेंडरें, कुणाचीं बुकपोष्टस् [ वाचनीय पुस्तकें ], एकादें व्यापाऱ्याचें

पार्सल–मधल्या–मध्येंच दाबतों, तें तर यानें पाहिलें नसेल ? तसली बातमी फौजदारींत देऊन आमच्या नोकरीवर हा पाणी तर आणणार नसेल ?–तसं झालें तर आलीच आपली कंबक्ती–त्याला येथें बसून देत होतों हीच मुळीं आपली चूक !'–मास्तरांना विचार सतावूं लागलें.

–३–

फौजदाराचा तो काळसर तकतकीत वर्ण, ते मिशांचे आकडे, डोकीवरची उंच फर कॅप, तोंडांत भला जाडा एका कोपऱ्यात धरलेला तो चिरूट, आंगांतला जांभळा ब्लेझरचा कोट, तलम स्वच्छ धोतराचा घातलेला तंग काचा, पायांतले पॉलिश केलेले चकचकीत उंच बूट, यामुळें स्वारीचा रौद्रावतार चांगलाच दहशत बसविणारा. त्यांत त्याला साजेशा आवाजाची देणगी ! सभोंवतीं त्या भीतिदायक गंभीरपणांत भर घालणारी त्यांची नोकर मंडळी, बैठकीच्या जागेतले निळ्या रंगाचें अभ्रे चढविलेल्या खुर्च्या, कोचें, राऊंड टेबल इत्यादि सामान, दाराला लावलेले सरक पडदेही त्याला उठाव आणणारेच. त्या सर्व परिस्थितीचा सामान्य प्रेक्षकावर दहशत बसविणारा परिणाम व्हावयाचा. त्या जागेंत पाऊल टाकतांच मनोहराचें अगदीं तसेंच झालें. तो तेथें पोचला त्यावेळीं फौजदारसाहेब कोणावर तरी मेघगर्जनेप्रमाणें गर्जत होते; एकाच्या अंगावर धाऊन जाण्यासारखाच त्यांचा पवित्रा होता. तेच गरगरणारे डोळे क्षणभर मनोहराकडे वळले !

बिचारा मनोहर ! त्याच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला. जीभ कोरडी पडावयाची वेळ आली कंबर गेल्यासारखें त्याला वाटूं लागलें. बुद्धि बधीर झाल्यासारखें त्याला झालें. फौजदारांनीं त्याला पाहिलें पण या–बसा काहीं म्हटलें नाहीं.

विनापराध आपणाला कां आणलें आहे ? आपल्यावर कोणतें बालंट लादण्यांत आलें आहे ? आपल्याला अटक झाल्याचें मावस-भावाला कळलें, प्रियपत्नी इंदूला कळलें, तर त्यांच्या जिवाचें काय होईल ?

आपल्याला येथून सोडविण्याचा ते प्रयत्न करतील का? यापूर्वीच आपणाला मुंबईस जाण्याची बुद्धि सुचली असती तर किती बरें झालें असतें ? पोस्ट मास्तर, तिथें जमणारी मंडळी, कुणी तरी घरीं जाऊन आपल्यावरील ही आपत्ती सांगतील काय ? केव्हां घरीं हें वर्तमान कळेल? आपण अराजक म्हणून, राजद्रोही म्हणून, अत्याचारी म्हणून, का खुनी, दरोडेखोर चोर म्हणून आपल्याला धरून आणले आहे? असले हजारो विचार मनोहराच्या डोक्यांत, डोळ्यापुढच्या काजव्याप्रमाणेंच चमकले.

'पोस्ट ऑफिसांतून' फौजदारसाहेबांच्या कचेरींत—ही फौजदार-साहेबांची कचेरी तूर्त फौजदारांनीं आपल्या रहात्या घरांत—बाहेरच्या दिवाणखान्यांतच थाटली होती.—येतांना वाटेंत, जरा वांकडी वाट करून बरोबरच्या शिपायाच्या सवलतीनें आपल्या घरीं जावें, घरच्या मंडळींना आपल्यावरील प्रसंगाची कल्पना द्यावी आणि मग पुढें सरकावें, असें मनोहराच्या मनांत कितीवेळां तरी आलें. त्यानें तसा थोडासा प्रयत्नही करून पाहिला. पण त्या पोलीस शिपायानें त्याचें मुळींच ऐकिलें नाहीं.

फौजदारांचें काम संपत आलें. त्यांना मुजरे करून मंडळी आपल्या हातांतल्या बारीक छड्या हलवीत आणि जाड्या वहाणांत पाय सरकवून चालूं लागली. आतां कोठें फौजदारसाहेबांचें मनोहराकडे लक्ष वेधलें. इतका वेळ मनोहर आंतल्या बाजूस उभाच होता. मिशीला आणखी पीळ भरीत पोलिसी हुकमी आवाजांत फौजदार गडगडले 'तुम्हींच मनोहर माधव देशमुख काय ?—मग उभे कां वाटेंतच ?—बसा खुर्चीवर !'

मनोहर मुकाट्यानें आज्ञेप्रमाणें वागला.

मनोहराला कळेना कीं आतां किती वेळ बसवणार? कां बसविणार? आपल्याला काय विचारण्यांत येणार आणि आपली सुटका केव्हां कशी होणार ?

' मला कां बोलावलें आहे ? ' असें चट्दिशी खुलासा करून घेऊन निसटावें म्हटलें—त्यानें कितीहि मनांत आणलें तरी त्याची जीभ उचलेना.

मनोहराचे तशाच स्थितींत चांगले दोन अडीच तास गेले. तो जागचा हलला नाहीं. त्याला सोडवून न्यायला कुणीही त्या बाजूला फिरकलें नाहीं. मनोहर अगदीं हताश झाला.

मध्येंच केव्हां तरी पलिकडच्या दारांतला पडदा किंचित् बाजूला झाल्याचें, कुणीतरी तेथून हलकेंच डोकावून पाहिल्याचें मनोहराच्या लक्षांत आलें. त्याच्या कानीं कोणाचा आवाज आला. लुगड्याचा पदरही त्याला दिसला. आंत कुणी बायका आपापसांत हंसत बोलत आहेत असें मनोहराला वाटलें. पण त्याकडे चित्त वेधण्याइतकें—अधिक लक्ष देण्याइतकें—मनोहराचें चित्त त्यावेळीं ठिकाणावर कुठें होतें ?

फौजदारांना इतक्या वेळानंतर मनोहराशीं बोलावयाची लहर आली. आणि त्यांनीं मनोहराला विचारलें ' काय देशमूख, तुम्हांला पकडून कां आणलें आहे कळलं काय ?'

' नाहीं. ' मनोहरनें कसेंबसें उत्तर दिलें.

' या गांवांत तुमचा कांग्रेस कार्याचा प्रचार कुठपर्यंत आला आहे ? सरकारविरुद्ध वागण्याची लोकांची कितपतत तयारी केली आहेत तुम्ही आतांपर्यंत ?...'

' छे: छे: ! तें—मी—मला...'

' त त-प-प म-म काय ? ' फौजदार जरा मोठ्यानेंच ओरडले. 'आम्ही काय जाणत नाहीं या गोष्टी ? अशा त-त-प-प-म म नें आम्हीं फसूं अशी तुमची कल्पना आहे काय ? मुंबई सोडून अशी खेडींपाडीं तुम्ही कां हिंडत असतां हें आम्हाला समजत नाहीं, असें समजूं नका !'

नसता अपराध फौजदार बळेंच आंगीं चिकटवूं लागल्यावर मनोहर तरी काय बोलणार ? बापडा स्वस्थच बसला.

'हं, मग काय देशमुख? तुम्ही काय सरकारचे गुन्हे केले आहेत याची कांहींच माहिती नाहीं म्हणतां? ठीक आहे! त्याची आठवण होईपर्यंत आणि त्याचा उच्चार करीपर्यंत आम्ही तुम्हाला इथून सोडणार नाहीं–ज्यावेळीं आठवण होईल–ज्यावेळीं कबूल कराल–त्यावेळीं, त्यानंतर पुढें तुम्हांला कसें वागवावयाचें हे आम्ही ठरवूं. बाकी, मला ठाऊक आहे, इकडचा अशिक्षित खेडवळ असो कीं आपल्यासारखा शहरांतला सुशिक्षित कांग्रेसभक्त असो. त्याला आमचा मनाजोगता पोलिसी पाहुणचार मिळाल्याशिवाय तो आम्हांला हवी ती माहिती सुखासुखी द्यायचा नाहीं. पण हें पहा, देशमूख, आमचा पोलिसी पाहुणचार आपल्याला मिळणारच आहे. त्याशिवाय तुमची इथून सुटका नाहीं. काळजी करूं नका!' फौजदारांनीं सुनावलें.

तितक्यात आंतून नोकर 'जेवायला झालें आहे. पानें मांडली आहेत अशी वर्दी द्यायला बाहेर आला.

फौजदार जेवायला आंत जातील तेव्हां आपण येथून एकदम पसार व्हावें असें मनोहराच्या मनांत आलें नसेलच असें म्हणतां येणार नाहीं. पण त्या भीरुच्याकडून तें घडणें अशक्यच; या शिकलेल्या सामान्य सभ्यांनीं नुसत्या शौर्याच्या गोष्टी बोलाव्या, वर्तमानपत्रें वाचावींत आणि नुसता मतामताचा गलबला करावा; मनोहर जागचा हलला नाहीं. त्याच्या आंगांतील सर्व शक्ति कुठें पार गेल्यासारखें त्याला झालें होतें.

फौजदारांनीं कपडे उतरले. ते आंत जायला निघाले. जातां जातां त्यांनीं मनोहराला हुकूम फर्मावला, 'देशमूख, कपडे काढा. तुम्ही आमचे अपराधी असलां–मी फौजदार–सरकारी नोकर असलों तरी–मीहि तुमच्याचसारखा ब्राह्मण आहे, तुम्हांला उपाशी ठेवावं असें मला वाटत नाहीं. माझ्याबरोबर जेवण करा; आम्ही असाहि पाहुणचार द्यावयाला तयार असतों आणि तसाहि पाहुणचार देणें आमचें कर्तव्य असतें. जेवायला चला. नंतर दिवसभर विचार करा. उठा!–'

मनोहरला उठणेंच भाग पडलें. तो फौजदारच्या हातचें बाहुलेंच बनला; फौजदाराच्या वर्तनातला विसंगतपणा त्याला समजला. पण त्याचें कारण त्याला उमजेना. 'आलीया भोगासी असावें सादर' या न्यायानें त्यानें कपडे काढले. तो फौजदारांच्या मागोमाग घरांत निघाला.

— ४ —

फौजदारसाहेबांच्या घरचा जेवणाचा थाट तर बादशाही होता. फौजदारसाहेबांच्या पाटाजवळ मनोहराचा पाट होता. हा फौजदार सैतान आहे का साधु आहे हेंच मनोहराला कळेना. आपल्याला अपराधी म्हणून आणतो काय ? तरी पण त्याच्या मनावर जो पहिला अनपेक्षित परिणाम झाला होता—त्यामुळें त्या गांवीं येतांना मनोहराला जसे आपण आजारी होतों, तसेच आजारी एकदम झालों असें वाटूं लागलें. मध्यें आपणाला बरें वाटूं लागलें हेंदेखील खोटें अशीच त्याची भावना झाली. तो जेवायला बसला. पण जेवतांना त्यानें मान कांहीं वर केली नाहीं.

मनोहर घाबरला आहे, मलूल झाला आहे, हें फौजदारांनीं ओळखलें होतें. त्याचा जेवणावर परिणाम होऊं नये म्हणून त्यांनीं दक्षतेनें पाटावर येऊन बसतांच त्याला उद्देशून म्हटलें, 'हें पहा देशमूख, आतां जेवण होईपर्यंत तरी मी फौजदार नाहीं कीं तुम्ही गुन्हेगार नव्हत. आमच्या इथें पोटभर जेवलें पाहिजे. त्यांत कुचराई होतां कामा नये. तुम्हीं येथें आपल्या मावसभावाकडे सहकुटुंब आहांत-ते तुमच्या जेवणाकरितां घरीं वाट पाहातील हें मला माहित आहे. मी त्यांना अगोदर निरोप पाठविला आहे. तुमची सुटका जेवणाकरितां माझ्याकडून, घरच्या जेवणाकरितां-होणार नाहीं, म्हणून कळवलें आहे. समजलांत.'

फौजदारांचा आवाज जात्याच कर्णकटु असला तरी ते यावेळीं मनोहराशीं आदरानें व प्रेमानेंच बोलत होते. त्यांच्या बोलण्याचे अर्थ करावे तसे होण्यासारखेच होते. मनोहर त्यावेळच्या आपल्या मनोवृत्तीं-प्रमाणेंच करून घेत होता.

आंत बायकाबायकांत 'हें काय ग, तूंच वाढायला गेलं पाहिजेस. मी नाहीं तुझें ऐकणार अं भलत्याच गोष्टींत ' अशी कांहीं तरी कुजबुज चाललीच होती. ती बाहेर स्पष्ट ऐकावयाला येत होती.

ब्राह्मणानें चटण्याकोशिंबिरी वाढल्या. एका बाईंनीं मुख्य मुख्य पदार्थ वाढले. वाढप झालें.

' मनोहरपंत, हं करा सुरुवात. जेवतांना कांहीं मनांत आणायचं नाहीं अं ! ' फौजदारांनीं मनोहराला हुकूम फर्माविला.

आंतल्या बाजूस मृदु हास्यध्वनि झाला. फौजदारही गालांतल्या गालांत हंसताहेतसे वाटलें.

मनोहर जुलुमानें एकेक घास तोंडांत कोंबीत होता. पदार्थ वाईट होते, त्याला आवडण्यासारखे नव्हते, असें नव्हे; पण त्याला घांसच गिळत नव्हता. पोलिसी पाहुणचार त्याला जुलुमाचाच वाटत होता.

इतक्यांत कुणीसें वाढावयाला आलें. मनोहराच्या पानापुढें तें माणूस उभें राहिलें. हवें नको म्हटल्याशिवाय वाढवायाचें कसें ? अशी पंचाईत पडली. मनोहराचें लक्ष कुठें होतें कुणास माहिती ?

' मनोहरपंत, अहो, तुमचें लक्ष कुठें आहे ? तुमच्यासारख्या मुंबईत आयुष्य वेंचलल्या सुशिक्षित माणसानें आमच्या पोलीसी खाक्याला इतकं भिऊन जावें! आश्चर्य आहे बोवा! तुम्हीच जर असे वागूं लागलांत तर खेडवळ लोक आमच्यापुढं गोगलगाय झाले, तर त्यांना तुम्ही कां हंसावें ? असल्या भित्र्यांनीं स्वातंत्र्यप्राप्तीच्या नुसत्या लंब्या लंब्या आपापल्या खोलीचीं दारें लावून आंत गप्पाच माराव्यात म्हणावयाच्या ? ' फौजदारांनीं आपली सरबत्ती सुरू केली. ' आणि इंदूताई, तुम्ही तरी अशा मुकाट्यानें कां उभ्या आहांत ? पतीराजांचें जेवणाचें मान तुम्हांला माहित नाहीं ? तें एक परक्याच्या घरीं येऊन बायकोला लाजून खालीं मान घालून आहेत. पण तुम्हींसुद्धां लाजतां ? ' हवं आहे का ? एवढं जरी विचारलं असतें, तरी तेवढ्या आवाजावरून तुम्हांला ओळखून त्यांनीं वर पाहिलें नसतं कां ? '

मनोहरानें चमकून वर पाहिलें, तों फौजदारांच्या घरांत आपल्याला नकळत, आपली लाडकी पत्नि इंदू आपल्याला वाढायला उभी! इंदू हंसते आहे, फौजदार हंसताहेत, दारांत उभी राहिलेली फौजदारांची पत्नि—इंदूची सख्खी मावसबहिण—आऊताई एकमेकांकडे व आपल्याकडे पाहून हंसत आहे, असें दृश्य मनोहराला दिसलें.

मनोहराला आतां हायसें झालें. त्याचा चेहरा आतां प्रफुल्लित झाला. बरेंचसें परिस्थितीचें कोडें त्याला आतां उलगडलें. त्याच्या चेहऱ्यावरून भीति पळ काढीत होती. गोंधळ आपलें चंबुगबाळें उचलीत होता, आनंदाचें आगमन त्वेरेनें होत होतें. आतां त्यालाहि हंसूं आलें, त्याचा चेहरा यावेळीं खरोखरच पाहाण्यासारखा—फोटो काढण्यासारखा—झाला होता. ' इंदूताई, हें पाहिलेंत आपल्या पतिराजांचें शौर्य ? ' फौजदारांनीं आपल्या मेहुणीची चेष्टा केली.

' आऊताईच्या घरीं यायला इतकं कशाला भ्यायचं तें ? ' इंदूताई मनोहरालाच उद्देशून म्हणाली, ' फौजदार जगाला असतील. आपल्याला काय त्याचं ? काल देवदर्शनाला गेलें, तिथं आऊताईची अचानक गांठ पडली. नुकतीच बदली होऊन आल्याचं कळलं. आपण मुंबईला एकदोन दिवसांत जाणार म्हणून सांगितलें; तेव्हां तिनें इकडे यायचा आग्रह केला. मी कबूल केलं. सकाळीं मला घरीं बोलावणं आलं. 'पोष्टांत' दुसरं बोलावणं गेलं. आऊताईचा चांगला पाहुणचार आहे तर—'

' आम्हीं काय ! आम्ही पाहुण्यांच्या ताटांत मीठभाकर घातली आहे—गोड मानून घेणें त्यांच्याकडे आहे. ' फौजदारांनीं हंसत म्हटलें.

' इंदूताई, तूंच बाई आपली आग्रहानं वाढ. ज्याचं माणूस त्याला ठाऊक. मनोहरपंत, जेवतांना कसला इतका संकोच ? आमचा गरीबाचा पाहुणचार लक्षांत तर राहिला पाहिजे ! '

' पोलीसी पाहुणचार हा ! मी कसा विसरेन ? ' एवढेंच मनोहर धिटाइनें हंसत म्हणाला.

# ९

# निर्माल्य !

निर्मलेचें लगीन झालें. लोक म्हणाले हजारांतली जागा मिळाली. जोडा विठ्ठलरखमाईसारखा शोभतो. निर्मलेला सासू होती, दोन नणंदा होत्या, एक दीर होता, जाऊबाई होती, सासरा होता. गांवांत पाटील-कीला साजणारा वाडा होता. तर गांवचा अर्धा शिवार पाटलांच्याच मालकीचा होता ! शेजारणी पाजारणी निर्मलेच्या आईजवळ येऊन म्हणूं लागल्या, गोकुळासारख्या गजबजलेल्या घरांत तुमची लाडकी लेक पडली. तिनं नशीब काढलं !

शेजारी, इष्टमित्र निर्मलेच्या वडिलांना भेटले कीं म्हणूं लागले, ' निमुचे दादा, बेश केलंत. एकुलत्या एका लेकीला चांगली उजवलीत. हुंडा दिलात. पण राजबिंडा जांवई मिळविलात. मोठं घर आहे. दांडगा मळा आहे. खूप कुणबावा आहे. बारा बैल गोठ्याला. दहा माणूस घरांत जेवायला. तुमच्या लेकीला काय कमी आहे ! खात्या गव्हाणीला

ती लागली. जमीन जुमला गहाण टाकलांत. ऋणपाणी केलंत पण पोरीच्या जिवाकरतां केलंत हेंच चांगलं. ऋणपाणी फिटेल. जमीन जुमला सुटेल. पण आजची घडी उद्यां येईल का? तुमच्यासारखीं पोरीच्या सुखाकडे पाहणारीं–पदराला चाट लावून घेणारीं–माणसं आज काल आहेत कुठं आपल्यांत?

ऐकून निर्मलेच्या आईला हायसें झालें!

ऐकून निर्मलेच्या वडिलांना आंगावर मुठभर मांस आलें असें वाटलें! चार दिवस वाजलं–गाजलं. पहिपाहुणे आले. घरांत, मांडवांत गर्दी उसळली. मुंडावळ्या–बाशिंग बांधलें. घोड्यावरची वरात निघाली. मैत्रिणींनीं थट्टामस्करी केली. आतषबाजी झाली! रुसणीं फुगणीं झालीं. मानपान झाले. सर्वत्र आनंदीआनंद झाला! वऱ्हाड निघालें. निर्मलेला बरोबर नेलं.

जातांना नाथाजी नवरदेव घोड्यावर स्वार झाला होता. घोडा थयथय नाचत होता! बुरखा बाजूला करून हळूंच मधून मधून गाडींतूनच निर्मला चोरून मारून इकडे तिकडे पहात होती. नाथाजी तिला देवासारखा दिसत होता. त्याच्याकडे पहात असतां आपण केवढ्या भाग्यशाली–असें क्षणाक्षणाला निर्मलेला वाटत होतें!

\+ + + +

सासर–माहेर, माहेर–सासर अशा निर्मलेच्या पहिल्या पहिल्या चार दोन खेपा झाल्या. त्या वेळांत माहेरीं माहेरवाशीणीचे लाड आणि सासरीं घरीं आलेल्या लक्ष्मीचे–नव्या नवरीचें–सूनबाईचें, जावेचें, भावजयीचें उठबस ‘ कौतुक ’ चालावयाचें! माहेरचा माणूस आला कीं जरासे आढेवेढे घेऊन धाडून द्यायची. माहेरीं सासरचा मुराळी आला कीं बिनबोभाट न्हावूंधुवूं घालून, नवी लुगडें–चोळी करून, फराळा–आराळाची बरोबर बुत्ती बांधून देऊन सासरीं पाठवणी करायची! निर्मलेच्या आईनें कांहीं उणें पडूं नये म्हणून जीवापाड जपायचें; तर निर्मला सासरीं आली

कीं काकदृष्टीच्या सासरच्यांनीं कांहीं उणें आहे काय एवढेंच पहावयाचें, या पलीकडे विशेष कांहीं नसावयाचेंच !

\+ + +

वडिलांच्या, भावाच्या जीवावर नाथाजी खुशालचेंडूसारखाच वागे. नाथानें नव्या नव्या पैरणी, नवे नवे जरीकाठी पटके, नवी नवी रेशीमकाठी अष्टीची (धुवट) पंजीं वापरावींत. पानपट्टयांनीं तोंड रंगवावें. तंबाखू खाऊन पिचकाऱ्या माराव्यात. गांवोगांवच्या जत्रा--यात्रा धुंडाळाव्यात. कुस्त्याच्या फडांतून हिंडावें. तमाशे पहावेत. तमाशे करावेत. आज कुठें जत्रा आहे, याची चौकशी करावी. उद्यां कुठें कुस्त्यांचा फड आहे, तिकडे जाण्याची तयारी करावी. हाच मुख्य नाथाचा महत्त्वाचा उद्योग होता. पाटील म्हणत, आहेत चार दिवस इकडे तिकडे पोराचे हिंडण्याचे, हिंडेना. भाऊ म्हणे, आपल्या जीवावर धाकट्या भावानें दोन दिवस खेळायचें नाहीं, मजा मारायची नाहीं तर कुणाच्या ? खेळेना ! नाथ्याचे कोणी सोबती हौशी म्हणत, कोणी रंगेल, बाजिंदा म्हणत; आणि त्याच्या हौशीला, रंगेलपणाला व बाजिंदेपणाला उत्तेजन देत !

नाथाचा चालू रोजगार असा होता–पण असें चालणें तरी वाईट का?

\+ + +

सासरीं निर्मला नुकतीच आली होती. ती आली त्यावेळीं नाथाजी कुठें जवळच जत्रेला गेला होता. तो आला. घरीं निर्मला आल्याचें त्याला कळलें. जेवायच्या वेळेला ती त्याच्या दृष्टीला पडली. त्याची आई स्वयंपाकांत होती. जाऊबाई आपल्याच कामांत गढली होती. नणंदा इकडेतिकडे दूर दूरच तरंगत होत्या. नवऱ्याला वाढायची पाळी निर्मलेवर आली. सासूबाईनीं सागितलें. पहिल्यांदा तिला कसेसेंच झालें; पण ती तत्परतेनें पुढें आली. नवऱ्याला वाढलें. लाजल्यासारखें वाटलें तरी तिला एकंदरींत आनंदच वाटत होता. ती खालच्या मानेनें पण आनंदित अंतःकरणानें आपले व्यवहार नीटनेटकेपणानें करीत होती. नाथा-

जीचे डोळे तिच्यावर एकसारखे खिळले होते. तिचें लाजणें, मुरडणें, थबकणें, पदर सावरणें, याकडे नाथाजी नुसता आशाळभूतपणानें पहात राहिला होता. तिची मधुर हालचाल, गमतीची तारंबळ, हंसू आणणारी तिची त्रेधातिरपिट, त्याला एकंदरींत भारीच रमवीत होती.

+ + +

' शुः शुः ' कानावर शब्द येतांच निर्मलेच्या हरिण डोळयानीं भरंकन् इकडे तिकडे पाहिलें. तिचें—सशाचें—काळीज एकदम् लकलकलें. ती जागच्या जागीं थबकली. पलीकडे नाथा उभा होता. त्यानें तिलाच उद्देशून शुः शुः केलें होतें. निर्मला आनंदली. बावरली. तिच्या विशाळ भालप्रदेशावर घर्मबिंदूंची मुंडावळ चमकली. नाथा तिच्या दृष्टीस पडला ! ' थांब जरा ! अशी पळतेस का ? ' शब्द कानावर पडले. इतक्यांत तो जवळ पण आला. ' वर पहा ग ! लाजतेस कां अशी ? ' निर्मलेला तेथून धूम ठोकावी असें वाटलें. पण पाय जागचे हालेनात. पायांतली सर्व शक्ति नष्टच झाली ! नाथानें तिचा एक हात आपल्या हातांत घेतला. दुसऱ्या हातानें तिची हनुवटी वर उचलण्याचा प्रयत्न केला. ' बोलायचं नाहीं का ? हा अबोला कशासाठीं ? आतां बोलल्या खेरीज सोडणार नाहीं-जेव्हां तेव्हां आपलं–'

नाथा आणखी पुष्कळ पुष्कळ बोलला. निर्मलेच्या मनांतून खूप बोलायचें होतें. मान वर करून नाथाला डोळे भरून पहावें, असेंही तिला मनापासून वाटत होतें. पण तिच्या तोंडून शब्द फुटेना कीं त्याला पाहण्याकरितां मान वर होईना. नाथाजवळून दूर सरण्याची तिची दुर्बल धडपड झाली. नाथाच्या डोळयाला डोळा द्यावा, त्याच्याकडे गालांतल्या गालांत पाहून मृदु हंसावें, कांहीं तरी विचारावं, कांहीं तरी बोलावं, आपल्या देवाला बरं वाटेल अशी कांहीं तरी कृति करावी, असं निर्मलेला किती किती वाटत होतं; पण तिची हृदयाची धडधड थांबली नव्हती. ओठाला कोरड पडली होती, त्याला जीभ फिरवून ओलावा आणण्याचा निष्फल प्रयत्न ती कितीदां तरी करीत होती.

पंचप्राण एकवटून आपल्याला एकादा तरी शब्द उच्चारतां येईल का, आपली सुटका कशी करून घेतां येईल या फिकीरींत निर्मला तशीच हतबल उभी होती. उतावळा झालेला नाथा तिच्या कानांत आणखी कांहीं हितगुज सांगण्याकरितां का गालावरचे गुलाब हुंगण्याच्या निमित्तानें आपलें तोंड जवळ जवळ आणीत होता—

इतक्यांत, जवळच्या खिडकींतून वइन्स हंसल्याचा, पलीकडे सासूबाई खोकल्याचा, बाजूला जाऊबाई शिंकल्याचा, शेजारून दीर खाकरल्याचा आणि बाहेर मामाजी शिंकल्याचा निर्मलेला एकदम भास झाला. तितक्यांत इकडून तिकडे कोणीसें गेल्याची चाहूल लागली. तीमुळे नाथासुद्धां चमकला. त्याच संधीचा फायदा घेऊन निर्मलेनें चपलाईनें स्वतःला नाथापासून सोडवून घेतलें आणि तेथून डोळ्याचें पातें लवण्याच्या आंत पोबारा केला !

निर्मलेला त्याच्याजवळून निसटतांना काय काय वाटलें असेल ?

\+ + +

नागपंचमीला लकी आणावयाच्या, सुना धाडावयाच्या अशी चाल. त्याप्रमाणें नागपंचमीला निर्मला माहेरीं आली. तिचे वडील कुतुकुतूच करीत होते. आईचा जीव उडून गेला होता. तरीही लेक घरीं आल्याचा दोघानाही आनंद झाला. आईनें लेकीकडे पाहिलें. लेक तिला सुखी दिसली नाहीं. निर्मला प्रसन्न नव्हती. तिच्या मुखावर सदैव खेळणारें हास्य तिच्या आईला दिसलें नाहीं. आईला कारण विचारवेना. लेकीला सांगण्याचें धाडस होईना. निर्मला सुखी नसायला काय झालें होतें ?

\+ + +

नाथा अलिकडे घरीं राहीनासा झाला होता. तो घरीं किंवा शेताकडे कांहींच लक्ष घालीत नाहीं, म्हणून त्याच्याबद्दल कुरकुर चालू असल्याचें निर्मलेच्या कानावर अधूनमधून येऊं लागलें होतें. केव्हां

तिची जाऊबाई बोले, तर केव्हां सहज कुठून तिला ऐकायला येई. नाथा छंदी फंदी बनत चालला आहे. पाटील घराण्याला कमीपणा आणील असे त्याच्यांत दुर्गुण शिरले आहेत. ' केव्हां तरी भकेल आणि आपल्या जन्माचा सत्यानाश करून घेईल. ' असें ऐकलें कीं निर्मलेला धडकी भरे. ती माहेरीं आली त्यावेळीं नाथा गांवांत नव्हता. पूर्वींच दोन महिने कुठें बेपत्ता झाला होता. ती निघाली तेव्हां तर नाहीं नाहीं तसल्या नाथाबद्दलच्या कंड्या तिच्या कानीं आल्या होत्या. निर्मला आली. आईला भेटली. तिच्या कुशींत घुसून मनसोक्त रडली. तिचें रडूं तिला आवरेना. तिची आई पण तिच्याबरोबर आपले डोळे पुशीत होती !

+ + +

एक दिवस निर्मला आपल्या आजारी वडिलांच्याजवळ बसून त्यांची शुश्रूषा करीत होती. तिची आई बाहेरच्या बाजूला झाडपाखड करीत होती. तिच्याशीं कुणी तरी बोलत होतें. बोलणें हलकेंच चालूं होतें तरी त्यांत अधूनमधून निर्मलेचें नांव निघत होतें. त्यामुळें निर्मलेचें कान त्याकडे आपसुखच लागले होते. ' तुमचा जावई बिघडला. तुमच्या पोरीचें आतां कसं होणार ? तो मुंबईस गेला आहे. त्याच्याबद्दल आवई आहे कीं तो एका तमाशांत शिरला. ' शिवा–सावळा 'चा नामचंद तमाशा आहे ह्मणतात. ते महार आहेत. तुमचा जांवई त्या तमाशांत सोंगाड्या बनला आहे, तो महारांच्या हातचं खातो पितो. त्या तमाशांत नाचणारी एक बाई आहे, तिच्या गाण्यावर लुब्ध होऊन त्यानें घरादाराचें नांव टाकलें आहे. त्या नाचणाऱ्या बाईच्या नादाला लागून तुमचा जांवई तिच्याबरोबर लगीन करणार आहे असें कोणी म्हणतात; तर कुणी सांगतं कीं त्यानं त्या बाईशीं लगीन केलं आहे. कलियुगांत काय होईल अन् काय नाहीं याचा नेम नाहीं. पाटलाच्या कुळांत जन्म असून त्यानं असं करावं का ? त्याच्या बापाच्या कानावर या गोष्टी गेल्यापासून त्यांनीं खालीं घेतलें आहे. त्याचा भाऊ पिसाळला आहे. गांवांत बातमी फुटल्यापासून खळबळ उडाली आहे म्हणतात. असं कसं हो झालं !

चांगला म्हणतांना असा कसा हो तुमचा जांवई निघाला ?' इत्यादि गंहिवरून सांगणारी बाई सांगत होती. निर्मलेची आई खालीं मान घालून, डोळयांतून पाणी गाळीत ऐकत होती !

निर्मला आपण होऊन लगेच सासरीं आली. आपल्या नशिबांत काय आहे, हें तिला एकदां प्रत्यक्ष ऐकावयाचें होतें. एक वेळ चांगल्या गोष्टी खोट्या होतील. पण ऐकलेल्या वाईट गोष्टी कधीं खोट्या व्हायच्या नाहींत. उलट ऐकल्या त्यापेक्षां जास्तच वाईट असल्याचें आढळून येईल. निर्मलेचें तसेंच झालें. ती सासरीं आली तर तिच्यापुढें काय वाढून ठेवलें होतें ! सारा गांव वाटेल तें बोलतो आहे. बाटलेल्या नाथाला पाटलांनीं घरांत घेतलें तर घराला वाळींत टाकूं असें बोलत आहे, असें ऐकायला मिळालें. घरांत आतां तिच्याशीं धड कुणी बोलेना. तिच्याशीं नीट कुणी वागेना. जो तो आणि जी ती निर्मलेला हिडीस फिडीस करूं लागल्यानें तिला मरण थोडें असें दुःख होऊं लागलें. सगळे-जण जिला एकदां आपल्या घरची 'लक्ष्मी' समजत तिलाच आतां पांढऱ्या पायाची, कपाळकरंटी म्हणून म्हणूं लागले. तिचा विटाळ घरांतल्या माणसांना नकोसा झाला ! जशी कांहीं निर्मलाच महाराघरीं बाटली होती ! काय बिचारीचा अपराध होता ?

निमर्लेचीं सर्व दुष्ट स्वप्नें खरीं ठरलीं होतीं. तिला रडतां भुई थोडी झाली होती. तिची खात्री झाली कीं पूर्वजन्मीं आपल्या हातून कसलें तरी घोर पाप झालें आहे. त्याचाच वचपा या जन्मीं असा भरून काढावा लागत आहे. ती आतां कुणालाही बरी दिसेना. तिला कोणीच चांगलें वागवीना ! ती आली तरी 'तूं आलीस कां ?' म्हणून किंवा परत निघाली तरी 'जातेस का ?' म्हणून तिला कुणीच विचारीना !

एक सत्तेचं आपघर किंवा बाप घर ! पतिदेवाभावीं तिला सासर परकं झालं. ती माहेरीं आली. जिला नवरा विचारीना म्हणून माहेरीं यावें लागतें, तिला माहेरकडे असलेला 'समाज' काय–कसं बोलत

असतो, त्या यमयातना कशा असतात, याची कल्पना जिच्यावर तो प्रसंग गुदरला असेल तिलाच येणार !

निर्मला आपल्या आईबापांच्या जीवावर माहेरच्या ' समाजा 'च्या ह्या यमयातना सोसायला माहेरीं आली !

मुंबईस येणारा जाणारा कोणी भेटला, तर बहकलेल्या नाथाची चौकशी करावी, तो कधीं काळीं ताळ्यावर येऊन आपला संसार पाहील का, आपल्या बायकोला आपली म्हणेल का, भेटला तर त्याच्या मनाचा ठाव काढून, त्याला चार समजुतीच्या गोष्टी सांगून पहा, असें मुलीच्या मायाजाळानें निर्मलेची आई कळवळून सांगे. मुलीकडे पाहून ती रोज हळहळे; तळमळे ! ती दिवस काढीत होती. निर्मला दिवस कंठीत होती. पण अजूनपर्यंत मुंबईहून येणारानें तिच्या मनासारखें तिला सांगितलें नव्हतें.

निर्मला पाणी आणायला ओढ्याला गेली असतां ओढ्यावरच भाकरी खाण्याकरितां उतरलेल्या मंडळींत आपापसांत सहजगत्या भाषणें चालू होतीं.—

' मुंबईच्या ग्रँटरोडवर नाथा पाटलानें गाजवली आहे ! कमळी नाचणारीबरोबर सोंगाड्याचें काय काम झकास करतो ! नाथा त्या कमळीला काय खुलवतो ! कमळी नाथाला हावभावाच्या कसबानें आन् सुरेल गाण्यानें काय रंगवते ! शहामत आहे त्या जोडीची ! कमळा —नाथाची जोडी बघायला लोकांची ही झुंबड होते. कमळीच्या आवाजाला झार तरी काय आहे ? ती महारीण असून तिच्या आवाजानें आणि खुल्या दिलाच्या कामानेंच नाथाला वेड लावलें आहे, आणि कोणीही वेडा होईल अशीच ती कमळी नाहीं का ? नाथाजवळ पण तसंच कसब आहे; म्हणून कमळीही त्याच्यावर फिदा झाली आहे ! म्हणूनच लोकांचा तोबा उडतो ती जोडी पहायला ! बाकी, त्यांच्या गुणापेक्षांही पाटील महारणीला नादावला कसा आणि तिच्याबरोबर उभा राहायला निलाजरा झाला कसा, हें बघायलाही आपल्याकडचें माणूस

हटकून जातं ! पाटील–महारणीची जोडी बघण्यांतच पुष्कळांना गंमत वाटते ! नाथा याच गांवचा म्हणतात हो ! '

' पाटीलकीवर पाणी सोडलं खरं बेट्यानं. पण ग्रँटरोडवर नांव कमावलं. ज्याच्या अंगांत गुण आहे, तो असंच करायचाच ! आणि त्यानें असं कां करू नये ? तोच खेड्यांत कुचंबत राहिला असता, तर त्याच्या अंगच्या गुणाचं चीज आज चहूंमुलखीं होतंय तसं झालं असतं का ? ' अशीं किती तरी बोलणीं अहेतुकपणानें निर्मलेला ऐकायला मिळत.

\+ \+ \+

निर्मलेला ऐकूं नये तें ऐकावें लागे. नाथाची कीर्ती ( ? ) ऐकतांना निर्मलेला विंचू डंख मारण्याइतक्या असह्य वेदना होत–तरीही ती भान विसरून पाणी भरण्याची दिरंगाई करीत ऐकत राहीच !

\+ \+ \+

बाहेरून यायला निर्मलेला जरा वेळ झाला, तर अंथरुणाशीं खिळलेला तिचा बाप तिची चौकशी करी. त्याच्या व निर्मलेच्या आईच्या मनांत हजारों वाईट विचार येत. निर्मला ' गोरी ' आहे पण ' कपाळकरंटी ' आहे, ' अवलक्षणी ' आहे. केव्हां तिच्यामुळें तिच्या आणि आपल्या तोंडाला काळें लागेल, असें त्यांना भय वाटे. मुलीचें मन न जाणतांच बाहेरून आलेल्या तिला वैतागाच्या भरांत तिची आई म्हणे, ' कारटे, होतीस कुठं इतका वेळ ? आपल्या अब्रूची राखरांगोळी का करायची आहे तुला ? '

आईच्याच मुखांतले हे निखारेवजा शब्द ऐकले म्हणजे मात्र निर्मलेला ब्रह्मांड आठवे. तिला रडतां भुई थोडी होई.

\+ \+ \+

दिवसामागून दिवस, महिन्यामागून महिने, वर्षामागून वर्षें अशींच चाललीं होतीं. नाथाच्या गुणांचा गाजावाजा इतके दिवस मुंबईतच होत होता. आतां आपल्या मुलखीं ऐकावयाला येऊं लागला होता.

एक वेळचा जो ‘ समाज, ’ कमळी महारणीकरतां नाथा बाटला म्हणून तावातावानें त्याच्या घराण्याला वाळीत टाकावयाला तावातावानें झटत होता, तोच ‘ समाज ’ आपल्या गांवच्या जत्रा–यात्रांना भारी किमतीची ‘ सुपारी ’ देऊन नाथाचा ‘ तमाशा ’ आणण्याची जोरानें खटपट करीत होता. कमळानाथांना आणून आपल्या जत्रा–यात्रांतून नाचवूं लागला होता.

नाथाही आपल्याच मुलखांत, गणगोताच्या, सग्यासोयऱ्यांच्या गांवीं उजळ माथ्यानें जत्रा–यात्रांतून कमळी महारणीबरोबर महार साथीदाराशीं लोकांच्या नाकावर टिच्चून तमाशांत नाचण्याइतका निःसंग झाला होता !

आज अमक्या जत्रेस, उद्यां तमक्या गांवांत ‘ कमळी–नाथा ’ चा तमाशा आहे असें निर्मलेला ऐकूं येई; ती आपल्या जागींच मरून चूर होई.

\+ \+ \+

एखाद्या रात्रीं गांवाच्या धर्मशाळेसमोरच्या पटांगणांत डफावर थाप पडलेली अंथरुणावर तळमळत पडलेल्या निर्मलेनें ऐकली म्हणजे ती चटकन उठून बसे. तिला वाटे आपला नाथाच आला आहे. त्याचाच ‘ तमाशा ’ उभा राहिला आहे ! तिचें सर्वांग थरारे ! मन महिरून जाई ! चट्दिशी उठावें, नाथासमोर जाऊन उभें रहावें, ‘ हें काय करतां ? कुळाची, लौकिकाची, माझी, आपल्याला कांही चाड आहे का ? असल्या लाजिरवाण्या जिण्यावर लाथ मारा. या नर्कातून बाहेर पडा. माझ्याबरोबर संसार करायला चला, ’ असें खडसून, हाताला धरून नाथाला ओढून आणावें, असे क्षीण विचार निर्मलेच्या डोक्यांत येत असतील का ? ती शिकलेली नव्हती. तिनें जग पाहिलेलें नव्हतें. जातीवंताची अडाणी पोर ती ! आणि शिकलेली–जग पाहिलेली असती तरी बोलणं सोपं असतं. कर्म कठीण असतें ! मी–मी म्हणणाराच्या हातून जें होणं कठीण, तें निर्मलेसारख्या

निर्बल अबलेकडून कसें घडणार ? कुणीं सांगावें, तिच्या मनांत विचार येत असतील–जात असतील !...ती बसल्या बसल्याच देवाची नित्य प्रार्थना करी, ' त्यांचें मन पालटूं दे. त्या नर्काचा त्यांना वीट येऊं दे. माझी आठवण होऊं दे. माझ्याकडे येण्याची बुद्धी होऊं दे. ते बाटले आहेत म्हणणार नाहीं. त्यांचें निर्मल मनानें, अन् भोळया भावानें स्वागत करीन. आम्हीं एकत्र राहूं. सुखाचा संसार करूं. आनंदाचे दिवस पाहूं ! निर्मलेच्या मनोमन सोज्वल प्रार्थनेला परमेश्वर फळफुलें आणील का ?–कोण जाणे !

+ + +

अलिकडे ' नाथा–कमळी'च्या गोष्टी निघाल्या म्हणजे. असें ऐकावयाला येई—

—' नाथा महारणीबरोबर महार झाला खरा–पण चहूं मुलखांत त्याच्या नांवाचा ( ! ) डंका वाजतो आहे ! '

—' त्यानें नांवही कमावलें आहे आणि पैसाही खोऱ्यानें ओढतो आहे.'

—' महात्मा गांधींनीं ' अस्पृश्योद्धारा 'ची प्रचंड चळवळ चालविली आहे, तिचा पुरस्कार कृतीनें नाथानें केला आहे. '

—' समाज दांभिक असतो. तो बोलेल. पण कृती करणार नाहीं. तसें धाडस क्रांतिकारकांच्याच अंगांत असतें. त्याच कोटींतला नाथा आहे. तो ' कले 'ची सेवा करतो आहे. अस्पृश्यांचाही उद्धार नाथानेंच केला आहे. अशीं महत्कार्यें कलावंतच करूं जाणत. येर गबाळाचीं तीं कामें नव्हत ! '

' लोकांना नांवें ठेवायला काय लागतें ? नाथा पाटलानें निधड्या छातीनें ' कलें 'त केवढी क्रांति केली आहे ! केवढी समाज–सेवा चालविली आहे ! बोलघेवड्या लोकांनीं नाथा पाटलाप्रमाणें ' कृति ' करून दाखवावी, म्हणजे ती किती अवघड आहे हें कळेल. '

अशा गोष्टी वारंवार निर्मलेला ऐकावयाला येत. पण त्या अजाण बालिकेला—त्याचा चांगला अर्थ कुठून कळणार ! तिला एकच अर्थ कळत होता व होरपळवीत होता. तो हा कीं, आपला नाथा आपल्याला पारखा झाला आहे. आपण दुःखाच्या डोंगराखालीं चिरडून—मरून गेलों आहोंत.

\+ + +

नित्याप्रमाणें निर्मला पाणी आणायला पाणोठ्यावर गेली होती. तेथें लोक बोलत असलेले तिनें ऐकलें—

‘ गांवच्या नावजीबुवाची जत्रा आली आहे. जत्रेला ‘ नाथा पाट-ला’चा नांवजीक ‘ तमाशा ’ आणावयाचा आहे, ’ एक म्हणत होता.

‘ नाथा पाटील येतोय का नाहीं कुणास ठाऊक. आतांशा म्हणतात नाथाचा आणि त्या कमळीचा बेबनाव झाला आहे. नाथाला तिनें पार लुबाडलें आहे आणि त्याच्यावरच तिचें कर्ज झालें आहे. ती कर्ज दे म्हणते, हा झिटकारतो आहे. कमळी नाथावर लवकरच फिर्याद ठोकणार आहे. ’

पहिल्याचे शब्द ऐकून निर्मलेच्या काळजांत धस्स झालें ! ‘ काय, आपला नाथा तमाशा घेऊन आपल्या गांवांत येणार ?–न येईल तर बरें ! तें मरण आणखी नको !’ पण दुसऱ्याचें वाक्य कानीं पडलें तेव्हां, का कुणास ठाऊक, तिला तशांतही बरें वाटलें. ‘ नाथाचें व कमळीचें बिनसलें आहे. तो कर्जबाजारी झाला आहे. ती त्याच्यावर फिर्याद ठोकणार आहे ? चांगलं आहे.’

—‘ नाथा आतां त्या जगाला विटेल. कंटाळून तेथून निघेल. आपल्याकडे येईल. मग चांगलं होईल–असं होईल तर सोन्याहून पिवळं होईल. देव पावेल. ’

निर्मलेच्या मनांत असेंच आलें असेल नाहीं ? तिच्या मेलेल्या आशेला किंचित् जिवंतपणाची धुगधुगी आली असल्यास त्यांत नवल काय ?

'असें होईल का?' असें मनांतल्या आशेला विचारीत निर्मला पाणी भरायचें सोडून बाजूच्या उंच दगडावर, पायावर रिकामी घागर घेऊन किती वेळ बसली होती. लोकांचीं बोलणीं ती ऐकत होती.

भानावर येऊन तिनें घागर भरली. घरीं आली. पाणोठ्यावर ऐकलें तें तिनें कोणत्या कीं हेतूनें आपल्या आईला इत्थंभूत ऐकविलें.

आईनें आपल्या निस्तेज डोळयांनीं एकदां लेकीकडे निरखून पाहिलें.

\+ + + +

गांवांत जत्रेची धूम माजून राहिली होती. सभोंवतालच्या दहा-वीस गांवांतील लोकांच्या झुंडी जत्रेला लोटल्या होत्या. जत्रेचा विशेष म्हणजे 'नाथा पाटील कमळीसह' जत्रेला आला होता. त्याला गांवच्या जत्रेच्या पुढारी पाटलांनीं, हौशी रसिकांनीं, त्यांची भारी 'सुपारी' मान्य करून मुद्दाम आणलें होतें. नाथा आपल्या तमाशाच्या कमळी व इतर ताफ्यासह स्टेशनवर उतरला तेव्हां खुद्द गांवच्या पाटलांनीं आणि गांवांतल्या हौशी जवानांनीं आपआपल्या खिल्लारी बैलांच्या जोड्या जोडून आपापल्या गाड्या नाथाला आणण्याकरितां पाठविल्या होत्या. जो तो म्हणे, आपल्या गाडींत नाथा पाटलानें आणि कमळी महारणीनें बसलें पाहिजे. केवढी रसिक लोकांची रसिकता ही!

नाथा, कमळी आणि त्याचे साथीदार यांची सरबराई तरी केवढी थाटाची! त्यांच्या खाण्याची, दारुपाण्याची किती लोकांनीं चंगळ करून टाकली होती! कांहीं म्हणतां कांहीं उणें पडूं दिलें नव्हतें! कलावंतांची काळजी रसिकांनीं घ्यावयाची नाहीं तर कुणीं?

नाथा दिमाखानें गांवांत आला. छातिठोकपणानें आपले गुण (!) त्यानें जत्रेंत आख्खा दिवस आणि आख्खी रात्र करामतीनें जगापुढें मांडले!

शेजारच्या सदूकडून निर्मलेच्या आईला बारीक चौकशी करून कळलें होतें कीं नाथा–कमळीचा बेबनाव झाला आहे, नाथा लवकरच त्या जगाला रामराम ठोकणार आहे ! ही गोष्ट खरी आहे. त्यावरून जीवाचा धडा करून पोरीच्या सुखासाठीं निर्मलेच्या आईनें त्याच सदूला 'नाथाजी 'ची हरतऱ्हेनें बाजूला भेट घे, आणि कसेंही करून घटकाभर त्याला घरापर्यंत आण; असें सांगितलें. त्यानेंही तें कबूल केलें. तो निर्मलेचीं दुःखें जाणीत होता. निर्मलेचा आजारी बाप कपाळावर हात मारून घेत होता. तिच्या आईचें डोळ्यांचें पाणी अहोरात्र खळत नव्हतें. निर्मला तर जत्रेच्या त्या दोन दिवसांत अंधाऱ्या खोलींतून बाहेर आली नाहीं. आंतल्या आंत आपण मरून जाऊं तर देव पावेल, असें तिला होऊन गेलें होतें. जत्रा संपली तरी गांवच्या पाटलांनीं आणि आणखी बड्या धेंडांनीं नाथाला 'खाजगी बैठकी'-करितां मुद्दाम ठेवून घेतलें होतें.

त्याच वेळीं शेजारच्या सदूनें संधी साधून नाथाजीला एकांतीं गांठलें. बाजूला घेतलें. मिन्नतवारी केली आणि 'निर्मले 'च्या घरीं येतो म्हणून कबूल करविलें. वेळ ठरवून टाकली.येण्याबद्दल त्यानें 'कमळे'च्या गळ्याची 'आण' घ्यायला लावली. ती त्यानें घेतली. ती आनंदाची गुढी घेऊन सदू निर्मलेच्या आईकडे नाचत बागडतच आला ! त्यानें मी नाथाला घेऊन येतों, निश्चित असा, म्हणून निश्चयपूर्वक सांगितलें.

\+ \+ \+

जेव्हां निर्मलेच्या आईकडून तिच्या आजारी वडिलांना कळलें कीं जावईबुवा घरीं यायचे आहेत, तेव्हां त्यांच्या डोळ्यांत पाणी उभें राहिलें. त्यांनीं भक्तिभावानें देवाला हात जोडले. 'मुलीचं भलं होऊं दे' हीच त्यांची देवाला प्रार्थना होती. नंतर त्यांनीं बायकोला सांगितलें कीं जावयाशीं नीट बोला. रागवूं नका. वाईट–वकट–टाकून बोलूं नका. चांगलेपणानें वागवा. अन् ती तरी खुळी होती त्याला वाईट वागवायला ?

म्हटल्याप्रमाणें सदूनें नाथाला आणलें. घरांत त्याला सोडलें व तो बाहेरच्या बाहेर चालता झाला. नाथा निडरपणानें घरांत शिरला. अस्थिपंजर झालेली सासू त्याला सामोरी झाली. ' या बसा ' म्हणून तिनें त्याला पाट बसायला घातला. प्रथम तो थबकून जरा बाजूलाच उभा राहिला. त्याची त्यालाच शरम वाटली कीं काय न कळे ! पुन्हां त्याला ' बसा कीं ! ' म्हटल्यावर तो बसला. सासूबाईच्या तो पायाही पडला. ती त्यानें माणुसकी दाखविली. तेवढ्यावरून म्हातारीला जरा धीर आला. तो उगाच इकडे तिकडे पहात होता. घराची, घरांतल्या माणसांची भीषण अवकळा त्याला खायला येईल कीं काय अशी तर त्याला भीती वाटली नसावी ? म्हातारीनेंच नाथाच्या प्रकृतीची चौकशी केली. एकेका शब्दांनीं आपल्या घरची हकीकत सांगितली. डोळ्यांत येणारें पाणी हरघडी परतविण्याचा आणि कंठ गद्‌गदून येत होता तो साफ करण्याचा म्हातारी आटोकाट प्रयत्न करीत होती. जरा वेळानें तिनें आंत डोकावून निर्मलेला चहा आणि कांहीं फराळाचें घेऊन यायला सांगितलें.

निर्मला—अनेक दिवसांच्या दुःखानें होरपळून शरीराची वेल सुकली आहे, मुखाचें पुष्प कोमेजून गेलें आहे, अशी निर्मला—सर्व जीवशक्ति एकवटून, आईच्या आज्ञेनें चहा फराळाचें घेऊन आली. तिनें तें नाथापुढें ठेवलें. त्याला नमस्कार केला आणि बाजूला झाली. तिचें काळीज धडधडत होतें. डोळ्यांतून पाणी बाहेर येऊं पहात होतें. हृदयांत दुःखाचे कढावर कढ येत होते. तें दिसूं नये, ऐकायला जाऊं नये म्हणून निर्मला कशीबशी बाजूला झाली. दूर बाजूला तोंड करून भितीच्या आश्रयानें उभी राहिली. नाथाच्या तोंडून निघणाऱ्या शब्दावर तिचें भवितव्य अवलंबून होतें. जीवाचे कान करून ती ऐकण्यासाठीं ताटकळत होती.

म्हातारीनें जिव्हाळ्यानें घोगऱ्या आवाजांत नाथाजीची अधिक चौकशी केली. ' आपल्याला कर्जपाणी झालें आहे म्हणून ऐकलें. झाला

इतका ‘ नाद ’ पुरे करावा, असं म्हाताऱ्या जीवाला वाटतं. झालं तें गंगेला मिळालें. शरीर बाटतं, जीव बाटत नाहीं. दुसरा एकादा धंदा बघून, बायकोला बाळगली तर आमचे डोळे निवतील; सुखानें आमचे डोळे मिटतील. आमच्या हातून, मुलीच्या हातून कांहीं चुकलं–सवरलं असलंच तर तुम्हींच थोर मन करून विसरलं पाहिजे. अपराध पोटांत घातले पाहिजेत. आपल्या माणसाला आपणच जवळ नको का करायला ? कर्जपाणी आजचं उद्यां फिटेल. ’

हे असे तुटक, घुटके घेत, केव्हां त्याच्याकडे पहात, केव्हां डोळ्याला पदर लावीत, नाथाचें मन न दुखवेल, त्याच्या मनावर अनुकूल परिणाम होऊन द्रवेल, वळेल, असेच म्हातारी बोलत होती. तिला तें उसनें कां बोलावयाचें होतें ? ती मध्येंच थांबली. आपल्या विनवणीचा परिणाम कांहीं होतो काय हें ती पहात होती !

\+ + +

आणि खराच नाथाच्या मनावर परिणाम झाल्याचें म्हातारीनें पाहिलें. तो खालींच पहात होता. पण म्हातारी बोलत असतां एकदां दोनदां खिशांतल्या हातरुमालानें त्यानें आपले डोळे झाकले होते. ती थांबली. नाथाच्या बोलण्याची ती वाट पाहूं लागली. घरीं येण्याच्या अगोदर काय–कसें बोलावें, याची त्याला पंचाइत पडली होती. पण सासूच्या बोलण्यावर त्याला बोलणं सुचलें.

तो म्हणाला, ‘ मी तुम्हा सर्वांचा घोर गुन्हा केला आहे. पण आतां लख्ख प्रकाश पडला. तुम्ही देव माणसं आहां. माझ्यासारख्या गुन्हेगाराला घरांत येतांच लाथ मारून दुसऱ्या एखाद्यानें हांकून दिलं असतं. तोंड पाहिलं नसतं. माझी मला लाज वाटूं लागली आहे. मी पण माझ्या ‘ नादा ’ला आतां विटलों आहे. भागीदाराचं माझ्या बोडक्यावर कर्ज नसतं तर आत्तां त्याला लाथाडलं असतं–एक हजाराचं कर्ज, पण तें फिटल्याशिवाय सुटका नाहीं. एकदां तें कर्ज फेडतों आणि मग कुठेंही एकादा शहाजोग धंदा करून आपला संसार मांडतों...’

नाथा हें बोलला. अगदीं कळवळून–गंहिवरून बोलला. म्हातारीला ' हायसें ' झालें. तिच्या आनंदाचं आउर लोटलं. निर्मलेला आपलं हरपलं श्रेय मिळणार या वेड्या आशेनं क्षणभर अस्मान ठेगणं झालंसं वाटलं !

मग म्हातारीनं गोड शब्दांनीं जावयाची समजूत घातली. धीर दिला. एक हजार रुपड्यांच्या कर्जासाठीं नको त्या नर्कांतच आणखी कशाला पिचावं ? तुमच्या कर्जाची सोय आम्हीं आपला जीव गहाण ठेवून आजच करूं. तें कर्ज धनकोच्या तोंडावर टाका आणि आजच्या आज आंघोळ करून, देवाच्या पायां पडून शुद्ध होऊन या ! उद्यां लोक ओरडतील–आपण पांढरीपुढें पदर पसरून माफी मागूं. वाहिली ती गंगा आणि उरलं तें तीर्थ समजून चालूं. कोणी आपल्याला मग टाकणार नाहीं.

म्हातारीला डोंगराएवढं समाधान झालं.

निर्मलेला भावी सुखकल्पनेनं मूर्च्छाच आली.

नाथाला केवढा तरी आनंद झाला ! त्यानें म्हातारीचे उठून पाय धरले.

' असं दुपारीं येऊन हजार रुपये घेऊन जा आणि देऊन टाकून संध्याकाळीं घरीं निर्घोरपणानें रहावयाला या ' म्हणून म्हातारीनें जावयाच्या पाठीवरून हात फिरवीत आणि तो पायां पडत असतां त्याला उदंड औक्ष चितीत म्हटलें. अनेकदां पाया पडून, हजारदां क्षमायाचना मागून व ' तिकडची निरवा निरव करून येतों; पुन्हां त्या नर्काचें तोंड पहात नाहीं. ' असें निर्वाणीचें बोलून नाथा निरोप घेऊन निघाला !

मायलेकी एकमेकीला कडकडून भेटल्या ! दोघींना वाटलं दुःख संपलं. नाथावर आपल्या बोलण्याचा–इथल्या हृदयद्रावक परिस्थितीचा परिणाम झाला. म्हातारी नाथा येण्यापूर्वीं किडुकमिडूक मोडून त्याच्या हजार रुपये कर्जाची भरती करण्याच्या तयारीस लागली.

दुपारीं नाथाकडून सदूच कर्जफेडीची ती रक्कम न्यायला आला. सदूजवळ म्हातारीनें बिनहरकत हजाराची रक्कम दिली. जातांना त्याला पण रात्रीं जावयाच्या पंक्तीला म्हातारीनें आग्रहानें बोलावलें.

नाथा परत येणार याबद्दल आतां शंका उरली होती का ?

आपलें हृदयपुष्प नाथाच्या चरणीं वाहून मनोभावानें त्याची पूजा बांधू म्हणून निर्मला मनाशीं तोच तोच विचार करीत होती. पण त्याबरोबर तिला उगीचच अजूनही हुरहूर वाटत होती. ती हुरहूर निर्मलेच्या आनंदाचा विरस करण्याकरतांच कीं काय तिच्या कानांत कटु शब्द गुणगुणत होती—

' निर्मले, वेडी आहेस तूं ! त्याच्या मनावर कसला परिणाम होणार ? बोलून चालून तो तमाशांतला ' सोंगाड्या ' आहे. आपल्या मनावर परिणाम झाला आहे हें सोंग करणें त्याच्या हातचा मळ नाहीं का ? '

निर्मला क्षणभर खट्टू होई. पण ती त्या विचारांना धुडकावी. असे दुष्ट विचार तिनें आईजवळसुद्धां सांगितले नाहींत. वेडी ! वेडी आणि दुर्देवी निर्मला !–

\+ + + +

नाथा पाटलाच्या सासूनें नाथाला हजार रुपये दिले आहेत, हें ज्या वेळीं त्याच्या कमळी आदिकरून ताफ्यांतील सर्व तमासगिरांना कळलें, तेव्हां नाथासुद्धां ती सर्व मंडळी–गांवकऱ्यांनीं त्यांना दिलेल्या मेजवानींत दंग होती. सर्वजण मनमुराद दारू पिऊन तर्रर होते. मजेंत होते. सर्वांचा जल्लोष चालला होता ! हंसत होते. आपापसांत मनसोक्त ' लाथाळी ' करून ' त्या ' सुखाची लयलूट करीत होते. कमळी आणि बाकीचे भागीदार ' नाथा 'ची चेष्टा करीत होते. कमळी नाथाच्या थोबाडींत मारून त्याची मस्करी करीत होती. दांत विचकीत होती. ' सासूनें ' पाटलाना कशाचे हजार रुपये दिले ? म्हणून विचारतां त्यानें

त्या नशेंत फुशारकीनें आपल्या गोतावळ्याला सांगितलें, आपल्या दारांत जावयानें 'तमाशा' करून हजेरी दिली पाहिजे म्हणून सासूनें हजार रुपयांची बिदागी दिली आहे!' तो खो–खो–खो–करून हंसला! 'भले शाबास, बहादूर पाटील! तुम्ही थोर, तुमची सासू मोठी! तिच्या दारांत आपण जरूर तमाशा करून हजेरी देणार! दारू पिऊन मजा करणार यार!' ... ...

झिंगलेले दारुडे बडबडत होते. असें झालेंच पाहिजे म्हणून नाथा साथीदारांना भर देत होता ... ...

रात्र पडली तशी म्हातारी आणि निर्मला नाथाची उत्कटतेनें प्रतीक्षा करीत होत्या.

रात्रीं बंद केलेल्या दारापुढें डफावर थाप पडली! गणगवळण सुरू झाली. रात्रभर तमासगिरांनीं दारांत धुडगूस घातला. नाथानें आपल्या सासूचे हजार रुपये असे फेडले!

निष्पाप पण दुर्दैवी–खोट्या आशेच्या झुळुकेनें क्षणभर तजेला धरणारें निर्मला–सुमन दारुण घावानें सुकून निरंतरचें निर्माल्य झालें!

———

# १०

# प्रीतीचें देऊळ

‘अरे हें काय! अशा आड रानांतही इमारत कोण–कसली बांधतें आहे बोवा?––’

‘तें देऊळ आहे!’

‘देऊळ? देवळाची इमारत? कसलें देऊळ? कोणाचें? कोण बांधतो आहे?’

‘देऊळ होय? प्रीतीचें देऊळ आहे तें! प्रीतीची देवी या जंगलांत येऊन राहिली आहे. कोकणांतून एका गोसाव्याच्या मागें लागून आली ती याच जागीं थांबली. ती मागें जाईना आणि पुढें असलेल्या गावांतहि जाईना. मग काय करणार? देवी गोसाव्याच्या आंगांत संचरली. तिनें दृष्टांत दिला. आपल्या भक्तांनीं आपलं देऊळ इथंच बांधावं! ज्या भक्तांचं व भक्तिणींचं देवीनं चांगलं केलं आहे, त्या भक्त-भक्तिणींनीं देऊळ बांधावयाला खर्च केला पाहिजे. प्रीतीदेवी पावावी म्हणून ज्यांनीं तिला नऊनवस केले आहेत, त्यांनीं पण वाटेल तर

देवाळाला पाहिजे तितकी मदत करावी आणि तशाच प्रकारनें ही देवाळाची इमारत बांधली जात आहे--'

+ × ×

मी आमच्या बापूंच्या गांवीं त्यांच्याच अत्याग्रहाच्या निमंत्रणावरून चाललों होतों. ख्रिस्टमसची अनायासें सुट्टी होती. सुट्टीचे चार दिवस मी कुठें तरी काढावयाचे ठरविलेच होते. तोंच बापूंचें पत्र सकुटुंब या असें आलें. म्हणून विशेष विचार न करतां मंजिरीसह (अर्धांगी) निघालों. स्टेशनवरून बापूंचें खेडेगांव सात आठ मैलांच्या आंत बाहेर असेल. रस्ता डोंगरांतून, घाटांतून असला तरी सभोवतालचें सृष्टिसौंदर्य नितांतसुन्दर असल्यामुळें वाटेंतून जातांना कंटाळा म्हणून कुठें जरासुद्धां येत नव्हता !

बापूंनीं आमच्याकरितां स्टेशनवर खास देशी वहान--घरच्या दोन बैलांची गाडी--मुद्दाम मोठ्या हौसेनें आपल्या धाकट्या भावाला बरोबर देऊन ठविली होती.

त्या बैलगाडींतूनच आम्ही बापूंचा गांव गाठण्याच्या नादांत होतों. बापूंचा भाऊ फार गमत्या आणि विनोदी. बैलांना चुचकारणें, गोंजारणें, गाणें म्हणणें, पळवणें आणि आमची करमणूक व्हावी म्हणून नाना प्रकारच्या गोष्टी सांगणें असें बापूच्या बंधूंनीं निरलसपणानें चालविलें होतें. त्याच्या बोलण्यानें माझी तर चांगली करमणूक होत होतीच; पण माझ्याहीपेक्षां मंजिरीची हंसून हंसून मुरकुंडीच वळत होती. प्रतिपदीं, तिला आजवर असें सुन्दर--जिवंत--गमतीदार जानपद 'लिटरेचर' व अलिखित, अप्रकाशित कसें राहिलें आहे, याचें नवल वाटत होतें. ती पुन्हा पुन्हा त्याबद्दल बापूंच्या भावाला व मला खोदखोदून विचारीत होती.

या वेळीं गाडी साधारणतः घाटाच्या मध्यावर आली होती. मी फार पूर्वी या प्रांतीं आलों होतों. तो घाट, तें सृष्टिसौंदर्य, घाटांतील रस्त्याचीं आकर्षक नागमोडी वळणें, हीं मला पूर्वपरिचित होतींच. त्यांत

आतां जुनें नवें काय हें सहजगत्या पाहात असतां घाटाच्या एका वळणावर, रस्त्याच्या एका बाजूस थोड्याशा अंतरावर, एका झाडाला बांधलेलें पांढऱ्या फडक्याचें निशाण फडफडत आहे, जवळच कसली तरी इमारत अर्धवट स्थितींत उभी आहे असें मला दिसलें. जेथें कांहींच पूर्वी नव्हतें, किंवा कधीं काळीं अशा आडरानीं कांहीं होण्याचा संभवहि नव्हता, तेथें इमारत पाहून मला आचंबा वाटला. आश्चर्योद्गार माझ्या तोंडांतून निघाला. बापूंच्या भावाला त्यासंबंधानें मी कुतुहलानें माहिती विचारली. तो त्याबद्दल एक गोष्ट सांगून आम्हा दोघांच्या—माझ्या व मंजिरीच्या—आश्चर्याची शीग चढवूं लागला.

प्रीतीचें देऊळ ! तें अशा आडरानांत ! बांधणारा गोसावी ! त्याला सहाय्य करणारे प्रीतीदेवीचे भक्त आणि भक्तिणी ! ! साराच चमत्कार ! गोसावी कोण ? त्याला या अशा देवीची उठाठेव का ? देवीच्या भक्त—भक्तिणी कोण ? कुठल्या ? आणि मागें तीन चार मैलापर्यंत मनुष्याची वस्ती नाहीं; पुढेंहि तोच प्रकार; जवळपास पाण्याची सोय नाहीं; प्रचंड वृक्ष पांथस्थाला आराम करण्यासाठीं तेथें छाया धरून आहेत, असेंहि तें स्थळ नव्हे; मग अशा ठिकाणीं हा उपद्व्याप कां ? कशाला ? माझ्या मनांत असे प्रश्न साहजिकच आले.

बापूंच्या भावाला त्यासंबंधानें माहिती होतीच. त्याच्याकडून ऐकण्याविषयीं आम्हां पतिपत्नींना फारच उत्कंठा लागली. मजिरीनें त्याला विचारावयाला सुरवातसुद्धा केली. त्यालाहि ती हकीकत सांगावयाचें नवें स्फुरण आलें.

+ + +

त्या देवळाजवळ येतांच मी व मंजिरी गाडींतून उतरून तें पाहावयास गेलों. तीन बाजूंनीं भक्कम दगडचुन्याच्या भिंती; एकाच बाजूला बरेंच ठेंगणें दार ठेवलेलें. आंत देवी म्हणून शेंदूर फासलेला ओबडधोबड एक दगड हें पाहिलें. पायांला ओलसर चिकट चिकट देवीच्या

समोरच लागलें. हे काय इथें? म्हणून विचारतां काल बोलाईचा रविवार. देवीचा वार. देवीच्या भक्तभक्तिणींनीं एकादें बकरें देवीला बळी दिलें असेल, त्याचें रक्त तुमच्या पायाला लागलें अशी माहिती बापूंच्या भावानें दिली.

'इश्श ग बाई! कांहीं तरीच' करीत मंजिरी आपले पाय आजुबाजूच्या मातीला घुसळीत आंबट तोंड करून गाडी गाठती झाली! देवळाच्या एका बाजूच्या भिंतीला कोंबडीचीं पिसें, अंड्यांचीं टरफलें, फुटलेल्या बाटलीचे मोठाले तुकडे बापूंच्या भावानें मला मुद्दाम जवळ नेऊन दाखविले.

'तुमचें खेडेगांव चांगलेंच सुधारलें कीं!' मी हंसून म्हटलें.

'तुमच्या शहरांतच तेवढी सुधारणा व्हावी नी आमचीं खेडीं तेवढीं शतकानुशतकें मागेंच रहावींत वाटतें? वा! बरेच आहांत कीं! पण तसं नाहीं अं! आमचीं खेडीं तुमच्या शहरापेक्षां प्रत्येक बाबतींत पुढें नसलीं तरी बरोबरीनें अगदीं खांद्याला खांदा लावून चाललीं आहेत, एवढें मी छातीला हात लावून सांगतों. तुम्ही ऐकते व्हा मात्र!' तो म्हणाला.

गांव गांठण्यासाठीं आम्ही गाडींत चढलों; बापूंच्या भावानें एकेक गोष्ट मजेमजेनें सांगावयाला सुरवात केली--

+ + +

'ऐकलत पंत,' बापूंचा भाऊ मला उद्देशून म्हणाला, 'तुम्ही शहरवासियांनीं प्रेमाची, प्रीतीची नुसती शाब्दिक स्तुति व आराधना करावी. लिहावें व छापावें! पण अजून प्रत्यक्ष प्रीतीचें देऊळ कोणी बांधलें आहे काय? आमच्या गांवानें हें सत्कृत्य कसें चालविलें आहे पहा!--या बाबतींत खेडीं तुमच्यापुढें निःसंशय आहेत ना? याची हकीगत गमतीदार आहे!'

हें देऊळ एक गोसावी बांधतो आहे, म्हणून मघाशीं सांगितलेंच. गोसावी म्हणजे बुवा. बुवांचे हे व्याप म्हणजे त्याची बाजी ! पण या बुवाबाजांची माहिती आहे कुठें तुमच्या नारायण महाराजाप्रमाणें किंवा उपासनी बाबाप्रमाणें या कानाची त्या कानाला ? '

' अस्सं ? आणखी काय ? '

' बुवांच्या मागें लागून कोंकणांतून त्यांची प्रीतिदेवता इथपर्यंत आली. इथेच ती खुतून रुतून बसली–नव्हे, हट्टानें तिनें इथेंच कायमचा राम म्हटला !–तेव्हां, गोसावीबोवा–अल्लख निरंजन–प्रेमाचे फकीरच ते ! त्यांच्या ठिकाणीं शहाजहान बादशहांच्या आत्म्यानें प्रवेश केला आणि त्यानें त्याला प्रेरणा केली कीं, मी आपल्या प्रियेचें आग्र्यास ताजमहाल-रूपानें अजरामर स्मारक केलें; तसेंच तूं आपल्या प्रीतीचें स्मारक या ठिकाणीं हरप्रयत्न करून कर. त्या कंगाल कुबेराला तें पटलें–तो सत्कार्यासाठीं सरसायला–'

' अं ? ' मी व मंजिरीने सारख्याच कुतूहलयुक्त आश्चर्यानें प्रश्न केला.

' गोसावी कंगाल कुबेर खरा ! पण मोठा डोकेबाज ! त्यानें आमच्या खेड्यांत प्रस्थान ठेवलें. मंत्रानें, अंगाऱ्याधुपाऱ्यानें ताईत, गंडे–दोरे यांनीं हां हां म्हणतां साऱ्या खेड्यावर त्यानें आपल्या बुवाबाजीचें साम्राज्य स्थापित केलें. तें इतकें प्रभावशाली झालें कीं–'

' किती ?–'

' किती ? हं ! तुमच्या गांधींनीं कॉंग्रेसवर, ब्रिटिश सत्तेनें हिंदुस्थानावर, बालगंधर्वांनीं रसिक जनतेवर जितकें बसविलें नसेल तितकें–'

' वाः ! शाबास ! ठीक आहे ! बरं, या बुवांना खरेखुरे वश कोण आहेत म्हणालांत ?–'

' कोण म्हणजे ? प्रेमाचे पायीक ! या बुवाची ही प्रीतिदेवी ज्या ज्या हैराण जीवांच्या नवसाला पावते ते ते जीव डोक्यांनीं चालत नवस

फडायला, बुवांच्या पायावर लोटांगण घालावयाला, आंगावरचें घ्या, पेटीतलें घ्या, पुरलेलें घ्या–ब्यॉकेंतले घ्या असें कबूल करीत येतात ना ?'

'म्हणजे ? याबद्दल थोडा जास्त स्पष्ट खुलासा कराल काय ?–' मी म्हटलें.

'हो ! हो !' तो म्हणाला पण मध्येंच मंजिरीकडे पहात जरा कचरला. पण नंतर त्यानें बेशक माहिती दिली. मंजिरी माझ्यापेक्षांहि चित्त देऊन ऐकूं लागली.

'आपला पति सोडून ज्यांच्यावर एकादीचें प्रेम आहे ती व आपली लग्नाची बायको वगळून जिच्यावर एखाद्याची प्रीती आहे तो– अशीं कुलंगडीं आमच्या खेड्यांत फार आहेत. असा तो किंवा अशी ती हींच आमच्या बुवांचीं दानतीचीं दातृत्ववान खरीं गिऱ्हाइकें ! अशां-च्याच सक्रिय सहानुभूतीवर बुवाचें या आडरानांतसुद्धां 'प्रीतीचें देऊळ' किती उंचावत चाललें आहे, हें पाहिलेंत ना ? मग तो तिचें आपल्या-वरील प्रेम कमी होऊं नये म्हणून व ती त्याचें आपल्यावरील प्रेम ओसरूं नये म्हणून बुवांच्या मध्यस्थीनें त्याच्या 'प्रीतिदेवीला' नवस करीत असतात,–व ती देवी पावली कीं मोठ्या अहमहमिकेनें ते फेडीत असतात !–आजवर ज्यांना देवी पावली त्यांच्या हातून काय झालें आहे त्याचें हें दृश्यच आहे. ज्या अभाग्यांना पावली नाहीं त्यांच्याबद्दल कोणीं काय सांगावें ? पण माझी खात्री आहे कीं, त्यांचेंहि मनोगत त्या बुवाची देवी कधीं तरी पूर्ण करणार; आणि प्रीतीच्या देवळावर सोन्याचा कळस आणि बुवांच्या मस्तकावर मोत्यांचा तुरा झळकणारच ! असें आमचें खेडें सुधारणेच्या अग्रभागीं आज आहे.'

मी आणि मंजिरी नुसता विचारच करूं लागलों ! खेड्यांत असली प्रभावी बुवाबाजी ? आणि त्यांचा असला प्रचंड भक्तगण ? किती हीन किळसवाणा प्रकार ! आम्हां दोघांच्या मनांत एकच विचार आला. एकच अर्थानें आम्ही एकमेकांकडे पाहिलें.

'प्रीतीचें देऊळ' कोण बांधतात हें समजलें. पण येथें त्याचा पुढें मागें उपयोग काय ?' मी सहजच बापूंच्या भावाला विचारलें.

'कां बरें ? उपयोग कां नाहीं ? येथें वाटसरू विश्रांतीकरितां जरी थांबत नाहीं; तरी रात्री–बेरात्रीं वाटसरूला लुबाडण्यासाठीं दबा धरून बसावयाला, आणि बुवांच्या निशाचर भगतगणांना नित्रास-निवांत एकादी अशा ठिकाणीं निवाऱ्याची जागा पाहिजेच होती नाहीं तरी ! सरकार, कां तुमची कांग्रेस, अशी चोराची सुखसोय पाहाणार आहे का ? असलीं कामें परोपकारी बुवांशिवाय कोण करणार ? हें प्रीतीचें देऊळ म्हणजे केव्हां चोराकरितां, केव्हां वन्यपशूकरतां, केव्हां अडाणी, असहाय्य, निराधार, प्रेमी जीवाच्या प्रेममीलनाकरतां, खास खास उपयोगी पडणारें आहे. त्या दृष्टीनें त्या प्रीतीच्या देवळाचें आजच्याहून भावी काळांतच महात्म्य खरेंखुरें आणि जास्त वाढणार आहे !––'

बापूंच्या भावाचें भाषण संपलें. आमची गाडी बापूंच्या दारांत उभी राहिली. आवाज ऐकून स्वागतार्थ बापू बाहेर आले. त्यांचा गांव पाहावयास आलों म्हणून त्यांना फार आनंद झालासा दिसला ज्या गांवाची बापूंच्या भावानें अगोदरच ओळख करून दिली, तो गांव बापूंनीं आम्हांला हिंडून फिरून व त्यांच्या दृष्टीनें सरळपणानें वर्णन करून दाखविला. 'लोक अन्नाला मोताद आहेत. पोटभर अन्नाला आणि जाड्याभरड्या अंगभर वस्त्राला महाग आहेत. अज्ञान आहेत. गरीब आहेत. लाचार आहेत. यांची सुधारणा घडवून आणण्याचें सरकारनें व कांग्रेसनें मनावर घेतलें आहे ही आनंदाची गोष्ट आहे ! आमच्या खेड्याच्या लोकांसारखे सालस, निर्व्यसनी लोक अन्यत्र क्वचितच सांपडतील-' इत्यादि कंठरवानें बापूंनीं आम्हांला पुष्कळ पुष्कळ सांगितलें.

परंतु बापूंच्या कल्पनेहून त्यांचे लोक किती पुढें–सुधारण्याच्या बाहेर–गेले आहेत, याची 'साक्ष' म्हणून ते बांधत असलेलें आडवळणावरील प्रीतीचें देऊळ आमच्या मनश्चक्षूंपुढून हलतच नव्हतें. त्याला आम्ही तरी काय करणार ?

# ११

# खाशाबा



सुगीचे दिवस. दिवसरात्र जनाबाई आपल्या घरधन्याबरोबर चिमण्यासुद्धां वस्तीला शेतावरच होती. काढणीमोडणीचें, मळणीचोळणीचें शेतामाळांत धूमधडाक्यानें काम चाललेलें; वैरणकाडी गोळा करावयाची तशीच पडलेली; खळ्यावर मदन तसेंच; हें सर्व सोडून शेतांतून घरीं जाणार कोण ? दोन वेळचा भाकरीतुकडा, बसणेंउठणें, सारं कांहीं शेतकऱ्यांचें शेतांवरच असणार ! असा सारा शेतावरचा पसारा शेतावर टाकून जनाबाई तरी घरीं कशी येणार ?

चिमणा लहान. गायीगुरांमागें हिंडण्याइतका मोठा व्हावयाला त्याला पुष्कळ दिवस लागणार होते. यशवंता—जनाबाईचा घरधनी,— शेतकामांत राबण्यांतच दिवस घालवी. जनाबाई कोष्ट्याच्या बायको-सारखी सगळी नसली, तरी ब्राह्मणाच्या बायकोप्रमाणें ऋणकरी कांहीं नव्हती. शेतकऱ्याची बायको अर्धी म्हणतात; त्याला जनाबाई अपवाद कशी

असणार ? दळणकांडण, भाकरी तुकडा करून, घरधन्याला आणि लाडक्या लेकाला जेवू घालून यशवंताबरोबरीनें शेतामाळांतलीं कामें करूं लागावयाचीच. भांगलण, पिकाला पाणी लावणें वगैरे ती जसें करी, तशी मळणीच्या वेळीं खळ्यावर पातीमागें हिंडणें, ऊपणणें, कणसें खुडणें, पेंढ्या गोळा करणें हें ती करीच ! शेतकऱ्याच्या बायकांचें कामच तें ! जनाबाई जरी यशवंताची पाटाची बायको, तरी थाटानें वागत नसे; यशवंताच्या बरोबरीनें कामें करी.

यशवंताला आज शेतांतल्या राखणीजोखणीचें काम जनाईच्या आंगावर सोपवून सरकारी कामानिमित्त तालुक्याला जावें लागलें होतें. कामगार पाटलाच्या आग्रहानें त्याला बैलगाडी पाटलाकरितां द्यावी लागली होती. घरादारांत, शेतमाळांत यशवंताच्या बरोबरीनें जागरुकता दाखविणारा त्याचा इमानी कुत्रा गर्ज्या त्याच्याबरोबरच गेला होता.

आणि खळ्यावर जनाबाई एकटीच होती. यशवंत परत रात्रीं वस्तीवर येण्याची खात्री नव्हती. पण तिला त्याची फिकीर नव्हती. ती अगदीं निर्भय होती. संध्याकाळबरोबरच तिनें भाकरीतुकडा केला. चिमण्यास जेऊं घातलें. आपण जेवली. चरून आलेल्या गायीगुरांना पाणी दाखवलें. त्यांच्यापुढें वैरण टाकली. फावड्यानें त्यांच्या मागचें शेण बाजूला सारून जागा स्वच्छ केली.

लोहार, सुतार, कुंभार, चांभार, अशी बैतीं खळ्यावर आपल्या बैतें—वसुलीकरितां येऊन गेलीं. त्यांनीं यशवंताची चौकशी केली. इकडच्यातिकडच्या जनाबाईशीं गोष्टी केल्या आणि ती मंडळी निघून गेली. जनाबाईनें आगटी पेटविली. रात्रभर राहावी म्हणून भरपूर रानगोवऱ्या आगटीजवळ आणून ठेवल्या. चिमण्या कुठें झोपीं गेला आहे तें पाहिलें. शेजरावर घोंगडी अंथरून तोंडावर पासोडी ओढून घेऊन तो केव्हांच झोपीं गेला होता. ‘ दिवसभर खेळून खेळून दमून-

शानी निजला ग माझा राजा ' असें प्रेमानें पुटपुटत ती पण चिमण्या-शेजारीं आडवी झाली. मायेनें त्याला आपल्या कुशींत ओढलें. शेजाऱ्याची ऊब किती छान ! थंडीच्या दिवसांत पराच्या गादींतसुद्धां अशी ऊब श्रीमंत जिवाला मिळे कीं नाहीं कोण जाणे !

अमावस्या होती त्या दिवशीं. काळोख मी ह्मणत होता. आकाशांत अनंत चांदण्या लिकलिकत होत्या. त्यांचा प्रकाशच काय, पण आगटींतल्या जाळाचा प्रकाशसुद्धां सभोंवारच्या काळोखाची भेसूरता अजून वाढवितच होता.

रानारानांत, खळयाखळयावर अजून शेतकऱ्यांची कुजबूज, कुठें लावणीच्या लकेरी, वस्तीवस्तीवरील कुत्र्यांचें भुंकणें किती तरी वेळ ऐकावयाला येत होतें. जनाबाई अजून जागीच होती. यशवंता शेतावर असला ह्मणजे तिच्या जागरुकतेची तितकी जरूरी नसे. पण आज तिला जागरुक राहणें प्राप्त होतें. सुगीच्या दिवसांत अधूनमधून, ठिकठिकाणीं भुरट्या चोरांचा उपद्रव शेतकऱ्यांना झाल्याशिवाय रहात नाहीं. त्याकरितां सावध राहावयाचें, लक्ष राखावयाचें. जनाबाई त्याच हेतूनें कितीतरी वेळ सावध होती, पण दिवसभर रानांत राबून थकल्या-भागल्यामुळें कीं काय, कोण जाणें, मध्यान्ह उलटण्याच्या आंत केव्हांच तिचा डोळा लागला !

कांहीं तरी खसपसल्यासारखें झालें. तेवढ्यानेंच जनाबाई जागी झाली. आगटी विझत आली होती. दावणीचीं जनावरें संथपणानें बसलीं होतीं. तिनें किंचित् मान उचलून उगाच हलकेच इकडेतिकडे पाहिलें. तिला कसला तरी संशय आलाच ! उडिदाचें बुचाड बाजूला होतें. मळलेल्या धान्याच्या पोत्यांची थडी त्याला लागूनच होती; त्याकडे तिची नजर गेली. कुणी तरी थडींतलें धान्याचें पोतें खालीं ओढलें आहे, त्या पोत्याला त्यानें खालीं बसून पाठ दिली आहे, आपले दोन्ही हात उफराटे करून पोतें अलगत पाठीवर घेऊन नीट धरतां यावें म्हणून, पोत्याचे दोन्ही

कोपरे गच्च धरले आहेत आणि तो उठण्याच्या तयारींत आहे, हे दृश्य रात्र धवळलेली असल्यानें तिला स्पष्ट दिसलें !

ती अगदीं बेतानें उठून बसली. चोराला चाहूल लागूं नये अशा तऱ्हेनें हलकेच उठली. यशवंता नाहीं, आपण एकट्याच आहोंत, म्हणून ती घाबरली नाहीं, भ्याली नाहीं. डर तिला शिवलीच नाहीं. चोराचा खरपूस समाचार घ्यावयाचा, हाच विजार तिनें केला. आपल्या डोळ्यांदेखत आपल्या शेतांतून चोर चोरी करून जाणार म्हणजे काय ?

चोरानें पोतें पाठीवर घेतलें व तो उठला. चालूं लागला. चार सहा पावलें गेला असेल नसेल, जनाबाईनें गुराच्या पाठीमागचें दांडकें घेतलें. शेतांतल्या सडाकडे तिनें पाहिलें नाहीं; चोर आपल्या अंगावर उलटेल, बेअब्रू करील, विनयभंग करील, अशी तिला शंकासुद्धां शिवली नाहीं. ती तशीच चोरामागोमाग गेली; आणि चोराच्या पिंढऱ्यावर सपासप हातांतलें दांडकें तिनें ओढलें ! चोराच्या पाठिवरचें पोतें खालीं पडलें. तो पळण्याच्या नादास लागला. पण ' मेल्या भुरट्या चोरा, चोरी करतोस ? पोतें पळवतोस ? ' करीत धाऊन जाऊन त्याला यथास्थित आपल्या हातचा प्रसाद देण्यास तिनें मुळींच कमी केलें नाहीं.

बाईचा आवाज कानीं पडतांच चोर थांबला. तो मागें वळला. आपल्याला प्रसाद तो देणार, असें जनाबाईला वाटलें. तिनें त्याच्या डोक्यावर आणखी एक जोराचा तडाखा लगावला व त्याबरोबर तोंडानें शिव्यांचा भडिमार केला !

चोर खालीं बसला. त्यानें हात वर केले आणि ' जनाक्का ! जनाक्का ! मारुं नगस ! चूक झाली. लै झालं. पुरं पुरं ! मी तुझ्या पाया पडतो ' तो अशी तिची गयावया करूं लागला !

चोरानें जनाबाईला ओळखलें. चोराच्या तोंडांतून ' जनाक्का ! ' शब्द कानीं पडतांच जनाबाईनें चोराला ओळखलें ! तिचें तोंड बंद झालें. त्यावर दांडकें उगारलेला तिचा हात खालीं झाला ! ती जरा

आश्चर्यानेंच त्याच्यावर ओरडली, 'कोन, कोन तूं? खाशाबा? खाशाबा? आन् तूं माझ्या शेतांमंदि चोरी करतुयास व्हय?'

'जी! जनाक्का, खाशाबाच मी! माफी कर! माझ्या भनीच्या शेतावरच डल्ला माराया आलों, मला ठावं नव्हतं! जनाक्का! लेकरावर कुरपा कर! माफी केलीया म्हटल्याबिगर पाय सोडीत नाहीं–' म्हणत त्या चोरानें–खाशाबानें–जनाबाईचे पाय घट्ट धरले.

जनाबाईच्या माहेरचा खाशाबा! तिच्या शेजारीं त्याचें घर. लहानपणीं दोघांचेंहि जिवाभावाचें प्रेम. एरव्हीं खाशाबा भारी हुच्च! आडदांड! भांडखोर! उर्मट! कोणाचें ऐकायचा नाहीं. कलागती, मारामाऱ्या करी. पण कां कोण जाणे त्या वेळेपासून जनाबाईचा त्याला प्रेमळ वचक वाटे! तिच्यापुढें आला म्हणजे पालीपुढें विचवानें नांगी टाकावी, त्याप्रमाणें जनाबाईपुढें त्याचें होई. सांगतात कीं तिच्याशीं त्याचें लगीन व्हावयाचें असेंसुद्धा घाटत होतें. पण तें घडलें नाहीं. तिचें दुसऱ्याशींच लग्न झालें. ती सासरीं निघून गेली.

आणि त्यामुळेंच कीं काय, खाशाबा वैतागला, त्यानें डोक्यांत राख घातली. गांव सोडून चालता झाला. उनाड बनला. उनाडांची चोरांचीच संगत धरली. त्यानें तो लहानमोठ्या चोऱ्या करूं लागला. त्याच्या पुष्कळ चोऱ्या उघडकीला आल्या. केव्हां दंड, केव्हां माफी, केव्हां साध्या कैदेची तर केव्हां सक्तमजुरीची, अशा अनेकदां शिक्षाहि त्याला झाल्या. त्याला कोणी सांगतासवरता-दाबतादडपता त्या वेळीं मिळाला नाहीं.

तोच खाशाबा जनाबाईच्या शेतावर काळोख्या रात्रीं चोरी करावयाला आला. जनाबाई तेथें असेल, तें तिचेंच शेत असेल, तिच्याच शेतांत आपण चोरी करावयाला आलों, हें त्याला कसें माहीत असणार! पण वेळ आली. तो चोरी करावयाला आला आणि जनाबाईच्या तावडींत सांपडला. तिच्या हातचा पोटभर मार व तोंडांतल्या असंख्य शिव्या खाऊन मग तिची त्याला ओळख पटली. तिलाहि त्याची पटली.

दोघांची ताटातूट झाल्यानंतर गांठ पडली ती इतक्या वर्षांनीं व अशा रीतीनें

खाशाबाला तिनें आपल्याजवळच ठेवून घेतलें. मायेनें त्याला वागवूं लागली. त्याच्या चोरीच्या धंद्याला त्यानें जनाबाईच्या आज्ञेनें त्याच दिवसापासून रामराम ठोकला. चोरट्याचें दुष्ट जिणें जगविण्यापेक्षां शेतांतल्या काबाडकष्टाचें, पण मानाचें, उजळ माथ्याचें जिणें घालविणें चांगलें; हें त्याला जनाबाईचें सांगणें पटलें. यशवंताच्या बरोबरीनें कपडालत्ता, धडूतकांबरूण, खाणेंपिणें आणि आपले गोड शब्द जनाबाई त्याला देऊं लागली. यशवंताला तिनें खाशाबा आपला गाववाला आहे असें न सांगतां, तो आपला भाऊ आहे, असेंच सांगितलें. तो चोऱ्या करीत असे, आपल्या येथें चोरी करीत होता, तेव्हां त्याला आपणच पकडलें, असें न सांगतां तो आपली शेतवाडी दुर्दैवानें गमावून बसला आहे अन् तो शेतकाम करावयाला आपल्याकडे आला आहे, असेंच तिनें सांगितलें.

जनाबाई यशवंताची पाटाची बायको खरी. पण तिच्यावर त्याचा भारी विश्वास. ती जें सांगेल तें त्याला प्रमाण. जनाबाई बोलेल तें, करवील तें सारें चांगलें, योग्य, फायदेशीर असलेंच पाहिजे ही यशवंताची ठाम समजूत. ती आपल्या उत्कृष्ट वर्तनानें यशवंतालाच प्रिय झाली होती, असें नाहीं; तर उभ्या गांवांत सर्वच लहानथोर तिला मानीत; तिचें गुणवर्णन करीत. शहरांत पांढरपेशांतील 'पुनर्विवाहितांना' शेजारच्या समाजाकडून उपहास, तिरस्कार, कमी लेखणें, दूरदूर करणें, त्यांच्यासंबंधानें उगाच शंका–कुशंका काढणें, नसत्या कंड्या उठवणें, अशासारखा उपसर्ग पोंचतो; तशा तऱ्हेचा त्रास आरंभीं जनाबाईला अगदींच झाला नाहीं, असें नाहीं. पण जनाबाईनें आपल्या शुद्ध-चोख वर्तनानें तसल्या त्रासाला केव्हांच बोथट केलें होतें; इतकेंच नव्हे, तर लहानापासून थोरापर्यंत सर्वांवरच चांगली छाप ठेवून दिली होती. पुष्कळ लोक यशवंताला म्हणतसुद्धां कीं, तुझ्या पहिल्या बायकोपेक्षां खरी

' लक्ष्मी ' तुला ही जनाबाईच मिळाली आहे ! यशवंताला तर पुरेपूर पटलेंच होतें. त्याला तिच्याबद्दल विलक्षण अभिमान वाटत असे !

तिनें खाशाबाला आपला भाऊ म्हणून ठेवून घेतल्यावर यशवंता काय म्हणणार ? शेतकऱ्याला, आपल्या घरच्या गायी, म्हशी, बैल, कुत्रींसुद्धां माणसाइतकींच महत्त्वाचीं वाटतात, तर खाशाबासारख्या माणसाला, ते कमी कां लेखतील ? खांद्याला खांदा भिडवून शेतांत राबावयाला एक खाशाबासारखा घट्टाकट्टा, कामसू आणि घरचा विश्वासाचा माणूस मिळाल्यावर यशवंता त्याला नको कशाला म्हणेल ?

जनाबाईच्या शेतात खाशाबा मनापासून राबूं लागला. शेत भलें कीं आपण भलें. घरींसुद्धां तो कधीं फारसा यावयाचा नाहीं. जनाबाईच्या सान्निध्यांतच त्याला गोड वाटूं लागलें.

चिमण्या त्याला ' मामा ' म्हणून हाक मारूं लागला. जनाबाई त्याला ' दादा ' म्हणे. यशवंता 'खाशाबा' नांवानेच त्याला हाक मारी ! चिमण्याची आणि त्याची छान गट्टी जमली. तो त्याला विसंबत नसें; तर चिमण्याहि त्याची क्षणभर पाठ सोडीत नसे ! जेवणेंखाणें त्याच्या बरोबर ! नांगर हाकताना, मोट चालवितांना, चिमण्याला आपल्या खांद्यावर खाशाबा वागवी. त्याला शेतांतल्याच जिनसांचे निरनिराळे खेळ करून देई. ' हा जनाचा–आता जनाक्काचा–पोर–तिचा ह्मणजे आपलाच पोर –' त्याचें कौतुक करण्यांत जनाला जास्त आनंद. ह्मणून तो तें ओळखून जास्तच करी यांत शंकाच नाहीं.

आपल्याजवळ ठेवून घेताना ' यापुढं चोरी करणार नाही. चोरीचा विचार मनात आणणार नाहीं. तें सर्व विसरून जाईन आणि चागलेपणानें राहीन. ' अशी जनाबाईनें खाशाबाकडून भाकरीची आण घेवविली होती देवावरचें फूल उचलावयाला लावलें होतें. त्यानेंहि पाश्चात्तापयुक्त अंतःकरणानें व जनाबाईच्या प्रेमाच्या आज्ञेने मोठ्या आनंदानें शपथ घेतली होती. देवावरचे फूल उचलून जनाक्काची खातरजमा करून दिली होती. परंतु त्यानंतर मात्र जनाबाइनें त्याच्या

मागील काळ्या कृत्याचा वेळी अवेळीं उच्चार करून त्याला दुखवलें नाही. हिणविलें नाहीं, किंवा लाजविलें नाहीं. शहाजोगासारखें विश्वासानें वागवलें. त्या वागविण्याचा त्याच्यावर परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. शहाण्यासुर्त्यांच्याकडून जें होत नाहीं, तें जनाबाई-सारख्या अडाणी अशिक्षित खेडवळाकडून कसें सहजासहजी घडेंत, हें एक नवल असलें तरी घडेंत इतकें खरें.

× × ×

‘ धावा वऽऽधावा ! माझ्या चिमण्याला, माझ्या राजाला, माझ्या पोटच्या गोळ्याला वांचवा ! ’ जनाबाई एकसारखी मोठमोठ्यानें ओरडत होती ! भर उन्हाळ्याचे दिवस. ऐन दुपारची वेळ.

जनाबाईच्या घरांत एका आंतून बंद असलेल्या खोलींतून धूर निघत होता. तिचा चिमण्या खोलींत किंचाळत होता. तो आंत अडकला होता ! त्यानेंच आंतून दाराला कडी लावलेली होती.

यशवंता चावडीवर कोणी पोलीस अधिकारी आले होते व त्यांनीं तलाठ्याकडून कांहीं कामासंबंधानें बोलावलें म्हणून केव्हांचा तिकडे जाऊन बसला होता. जनाबाई शेजारीं कोठें दळणकांडण करावयाला गेली होती. खाशाबा शेतावर होता.

दुपारच्या वेळीं गांवांत असें फारसें कोण असणार ? चिमण्याला सहज खेळ म्हणून खाशाबानें आगकाड्याच्या पेटीवर काडी ठेवून टिचकीनें काडी उडवावयाची व ती पेट घेऊन दूर कशी जाऊन पडते हें पाहावयाचें अशी गंमत करून दाखविली होती. त्याचाच अलीकडे त्याला छंद लागला होता. वेळीं अवेळीं, कुठेंही तोच खेळ तो खेळे. आगीचा खेळ तो ! त्याचा एखाद्या वेळीं काय भलताच परिणाम होईल हें त्या लेकाराला काय ठाऊक ! त्याच्या या अगोचर खेळाबद्दल जनाबाईनें एकदा दोनदां दटावलेंहि होते ! पण यशवंतानें व खाशाबानें त्याच्या धिटुकल्या खेळाचें लाडीकपणानें कौतुक केल्यामुळें त्यानें तो खेळ सोडला नव्हता.

चिमण्या आज घरांत चुकून एकटाच राहिला होता आणि त्याच्या हाताला काड्याची पेटी सांपडली होती. आई रागावेल म्हणून तिचा डोळा चुकवून तो खोलींत शिरला होता आणि त्यानें निर्धास्तपणानें काडीचे खेळ खेळतां यावेत म्हणून बालबुद्धीप्रमाणें खोलीला आंत कडी घालून घेतली होती.

त्याचा जो परिणाम व्हावयाचा तोच झाला होता !

पेटलेल्या काडीनें खोलींतल्या कपड्यालत्यांना आग लावून दिली होती. खोलींत धूर सपाटून कोंडला होता. चिमण्या त्यांत गुदमरून गेला होता, घाबरला होता. त्याला कडी काढण्याची शुद्ध राहिली नव्हती. दळण घेऊन आलेल्या जनाबाईनें हें पाहिलें. आंतल्या चिमण्याचें किंचाळणें ऐकलें. सारा प्रकार तिच्या लक्षांत आला. ती घाबरली. मोठमोठ्यानें ओरडावयाला लागली. लोकांना हाका मारूं लागली.

चावडीपर्यंत ती वर्दी कोणी कशी तरी दिली. यशवता, पाटील, तलाठी, तेथें असलेले लोक, पोलीससुद्धां ताबडतोब आले ! अंधेरी आंतली खोली. भक्कम भिंती, भल्या जाडजूड फळ्यांचीं दारें आणि खोलीला आंतून कडी ! सर्व प्रकार मंडळींच्या ध्यानात आला. ताबडतोब खोली कशी उघडावयाची ? चिमण्याला बाहेर कसें काढावयाचें ? भिंती पाडावयाच्या झाल्या, दार फोडावयाचें झालें तरी, हें तडकाफडकी कसें होणार ? धुरानें गुदमरून आंत चिमण्या बेशुद्ध झाला होता. त्याचें किंचाळणें, रडणेंसुद्धा बंद झालें होतें !

जी गत जनाबाईची तीच क्षणमात्र तेथें जमलेल्यांची झाली. कधीं सहसा घरीं न येणारा खाशाबा शेतांतून त्याच वेळीं कसा अचानक आला कोण जाणें !

पोलिसानें त्याला पाहिलें. त्यानें पोलिसाला पाहिलें. एकमेकांनीं एकमेकाला ओळखलें. पूर्वी कोठें तरी केलेल्या चोरीचा वहीम त्याच्या-

वर होताच. पोलिसाला वाटलें बरा अनायासेंच सांपडला! खाशाबाचें पापच त्याच्यापुढें उभें राहिलें.

खाशाबाला पाहतांच जनाबाईच्या थोडा जिवांत जीव आला. तिनें त्याला ओळखलें, 'खाशाबा-दादा, चिमण्या आंत हाय; खोलीला आग लागलिया; त्येच्या जिवाचा बचाव कर. हीं संमदी दगडावाणी एकमेकाच्या तोंडाकडे बघत उभीं हैती. तूंच त्येचा पराण वांचीव. मी पाया पडतें' असें म्हटलें.

खाशाबाला दारें सहज रीतीनें कशीं उघडावीं, हें माहीत होतें. त्यांत तो वाकबगार होता. अशीं जाडीं दारें अलगत कुलुपासुद्धां उचलून त्यानें आजवर कित्येक चोऱ्या केल्या होत्या.

तो दार उचलून बाजूला करण्याकरिता पुढें झाला. 'खाशाबा!' पोलिसानें त्यास हाक मारली. त्यानें त्याच्याकडे पाहिलें.

'साहेब, मी या वेळीं चोरी करण्याकरिता दार उचलीत नाहीं, तर–'

'खाशाबा' जनाबाई बोलून गेली, 'या वक्तीं तुझ्या चोरीचं कसाब दाव. तरच माझं पोर वाचतंया. मी कांहीं तुला चोरी करायापाई नाहीं सांगत–'

'पाटील, हा अट्टल चोर आहे!' पोलिसानें पाटलांना सांगितलें. खाशाबा चोर? यशवंतानें त्याच्याकडे डोळे फाडून पाहिलें. आपल्या बायकोकडे पाहिलें. बायकोनें आपल्या घरीं चोर बाळगला? तो चोर हें आपल्या बायकोस माहीत असून तिनें बाळगला?

'त्याला येथल्या येथें अटक करा.' पाटलाला पोलिसानें सांगितलें. खाशाबा दाराजवळ जाऊन जागच्या जागीं खिळला. आपण पकडले जाणार! तो लाचार झाला.

जनाबाईनें त्याचे पाय धरले. 'खाशाबा-दादा, माझ्या पोराला खोलीच्या बाहेर काढ. त्याला जीवदान दे! तुला सोडून द्या म्हणून मी

त्येंच पाय धरीन. तूं चोर होतास. पर आतां न्हाईस. लै निवळलास, साव झालास. मी सांगन. माझं कारभारी पर साक्ष देत्याल ! चोराचं कौसाल करूं नगस म्हणून म्या तुला शिपत घातलिया, पर मीच माझ्या पोरापाई तुला सांगतिया ! '

खाशाबानें खोलीचें दार—आंतून कडी असलेलें भरभक्कम दार—मोठ्या खुबीनें हां हां म्हणतां झटकन् उचलून बाजूला केलें.

धुराचा लोटच्या लोट आंतून बाहेर आला ! त्यांतच खाशाबा आंत घुसला. बेशुद्ध झालेल्या चिमण्याला त्यानें बाहेर आणलें.

आंतल्या चिंध्याचांध्यांत, धान्याच्या पोत्यांत आग धुमसत होती. यशवंता आणि बाकीची मंडळी तावडतोब आत घुसली. कुणी आंतून पाणी आणलें. आग विझविण्याचा उद्योग त्यांनीं आरंभला !

थोडक्याच वेळांत आग विझली. आंतील सामान बाहेर फेकून देण्यांत आलें !

बेशुद्ध चिमण्याला जवळ घेऊन, त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न जनाबाई करूं लागली.

खाशाबा आपण होऊन पोलिसाच्या स्वाधीन झाला; ' साहेब, मी चोर होतों; पण या माउलीनें मला माणसात आणल. मी तो वाईट धंदा सोडला आहे. पण मागचं पाप मला भोगलेंच पाहिजे. चिमण्याचा प्राण माझ्या हातून चोराच्या कसबानेंच वाचला. त्या कसबानें ऐवढं तरी चांगलं झालं. चला; मी खुषीनें तुमच्या स्वाधीन होतों ! '

पण खांद्यावर बेशुद्ध चिमणा असतांच जनाबाई पुढें झाली. तिनें खाशाबाला सोडविण्याकरितां पोलिसाचे खरोखरींच पाय धरले !

पाटलानें, तलाठ्यानें आणि तेथें असलेल्या आणखी मंडळींनीही पोलीस अधिकाऱ्याकडे जनाबाईचें ऐकावें अशी गळ घातली.

पण पोलीस अधिकाऱ्यांनीं अखेर काय केलें ? खाशाबाला सोडून दिलें का गिरफदार केलें ? पण त्यानंतर त्याबद्दल कांहीं कळलेंच नाहीं तर काय सांगणार ?

# १२

# गोषावाली



‘ हं ऽऽऽ ! माझ्या जन्माची ती एक दारुण कर्मकथाच आहे ! ’ एवढें म्हणून त्या बाईनें डोळयांतले अश्रु आम्हाला दिसू नयेत म्हणून बाजूला मान वळविली.

‘दारुण कर्मकथा ?’ आश्चर्यातिरेकानें मी प्रश्नार्थक पुटपुटलों. मला वाटलें, माझ्या तोंडांतील ते शब्द मीं मनाशींच उच्चारले. पण नाहीं. ते तोंडांतून बाहेर आले होते. त्या बाईच्या कानावर ते शब्द गेले.

‘ कर्मकथा ! कटु सत्यकथा ! ’ ती बाई आमच्याकडे न पाहतांच उद्गारली. आमचें आश्चर्य दुणावलें. त्या बाईची कर्मकथा–सत्यकथा-ऐकण्याची आमची उत्कंठा बेफाम वाढली.

आणि का वाढणार नाहीं ? निजामशाहींत–एका अस्सल मुसल-मानाच्या घरांत–मुसलमान गोषावालीच्या तोंडांतील शुद्ध मराठी भाषेंत उच्चारलेले ते उदास उद्गार होते. मुसलमान स्त्रीच्या तोंडांतून

मराठी शब्दाचा शुद्ध स्पष्टोच्चार ऐकूनच आम्हीं आश्चर्यचकित झालों होतों. मुळींच परिचय नसतांना–किंवा त्या घरीं तास दीड तासापूर्वी त्या बाईला पाहिलें असतांना, त्या बाईच्या सफाईच्या उर्दू बोलींत चुकून एकदोनच मराठी शब्द आले. त्यामुळेंच आचंबा वाटून जिज्ञासेनें मी धीर करून त्या बाईला माझ्या गबाळ उर्दू–भाषेंत 'तुम्हांला मराठी बोलतां येतें ?' असा प्रश्न टाकला. ती दचकली. भ्याली. शरमली. स्वतःला सावरून घेत वस्तुस्थिति लपविण्याचा तिनें तितक्यांत थोडासा प्रयत्नही केला. अस्सल उर्दूत तिनें 'आपल्याला मराठी मुळींच येत नाहीं. मग तुम्हांला तसें कां वाटलें ?' असा उलट मलाच प्रश्न करून माझें तोंड बंद करण्याचा घाट घातला. परंतु त्या बाईच्या तोंडांतून आलेले मराठी शब्द मी स्पष्ट ऐकले होते. ते मीं तिला ऐकविले. व म्हटलें—

'मुसलमान स्त्रियांनीं मराठी बोलूं नये, किंवा त्यांना मराठी येत नाहीं; असें मी म्हणत नाहीं. त्यांत आश्चर्य वाटण्यासारखेंही कांहीं नाहीं. परंतु तुमच्या तोंडच्या मराठी शब्दांचा उच्चार ऐकून मात्र मला आश्चर्य वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. मराठींतल्या कांही शब्दांचे उच्चार जिभेला जन्मजात तसाच संस्कार असल्याशिवाय भिन्नजातीयांना उच्चारतांच येणार नाहींत असें माझें ठाम मत आहे. तुमच्या तोंडचे शब्द तशाच तऱ्हेचे होते. म्हणूनच मीं त्याबद्दल विचारलें.'

त्यावर मात्र ती कांहींच बोलली नाहीं. आमच्याकडे क्षणमात्रच तिनें रोखून पाहिलें आणि झटक्यानें मधल्या दाराचा चिकाचा पडदा डाव्या हातानें बाजूला सारून ती आंत गेली. आम्ही तिच्याकडे व आपआपसांत पहात राहिलों.

\+ \+ \+

आमची नाटक मंडळी निजामशाहींतील ×××× या शहरीं होती. चांगला दोन महिने मुक्काम झाला होता. तिथल्या बऱ्याच प्रतिष्ठित—थोरामोठ्याशीं आमचा परिचय व लोभ दृढ झाला होता.

त्या मंडळींत इमामअल्ली या नांवाचे एक बडे पोलिस अधिकारीही होते. त्यांचा व आमचा त्यांतल्या त्यांत जास्त लोभ जडला होता. उमदा, आर्जवी आणि मंडळींतला माणूस होता तो. मोठा रसिक. आमच्या कंपनीच्या नाटकांवर आणि आमच्या कामावर स्वारी बेहद्द खूष ! ' आमच्या कंपनीकडे ' खास ' जेवणास आम्हीं त्याला बोलाविलें होतें व तोही मोठ्या आनंदानें आला होता. कंपनीचा मुक्काम हालण्याचे दिवस आतां अगदीं जवळ आले होते. तेव्हां त्यानें एक दिवस रात्रीं नाटकास आला असतांना, मला व माझ्या बरोबरच्या एका नट-मित्राला आपल्याकडे जेवायला येण्याचें आग्रहाचें निमंत्रण दिलें. आम्ही हिंदु. तो मुसलमान. तेव्हां आम्ही त्याच्याकडे जेवायला जाऊं कीं नाहीं, याबद्दल त्याला शंका वाटली. ती त्यानें बोलून दाखविली. आम्हांला खरोखरच संकोच वाटला. पण तो इमाम-अल्लीच्या स्नेहाळ आग्रहापुढें टिकावच धरूं शकला नाहीं. कलावंताला जात-गोताचा अडथळा कशाला ? मित्रत्वाच्या आड जातगोत येऊं शकत नाहीं. या विचारांचा पगडा आमच्यावर बसला आणि आम्ही इमामअल्लीकडील जेवणाचें निमंत्रण मोठ्या खुषीनें स्वीकारिलें.

रविवारीं दिवसाचें नाटक संपलें. त्याच दिवशीं रात्रीं आम्ही इमामअल्लीकडे जेवायला गेलों.

इमामअल्ली वस्तुतः एक पोलिस अधिकारी, परंतु त्याच्या घरचा थाट पाहिला तर कांहीं और होता. आम्हांला तर क्षणभर वाटलें कीं आम्ही एकाद्या बादशहाच्या वैभवशाली वाड्यावर पाहुणे म्हणून गेलों आहोंत. गेल्याबरोबर कोट टोपी काढून आरामांत कुशनच्या खुर्च्यांवर आसनस्थ झालों. अगदीं घरचेच झालों म्हणा ना. थोड्या वेळांत इमामअल्लीची बिब्बी कशालाशी चिकाच्या पडद्याआडून डोकावूं लागली. इमामअल्लीनें मुसलमानी रीत रिवाज सोडून निःसंकोचपणानें तिला बाहेर बोलावलें. आमची ओळख करून दिली. परकी भाव त्यांनीं

आमच्याशीं मुळींच ठेविला नाहीं. त्याच्या खुल्या दिलाचें आम्हांला साभिमान कौतुक वाटलें.

जेवणाची तयारी झाली. इमामअल्लीनें आमच्या करितां विशेष तयारी केली होती. तिकडे लक्ष देण्याची किंचित् हंसत त्यानें सूचना दिली. स्वतः उठून तो खोलींत गेला आणि 'व्हाइट हॉर्स'च्या दोन बाटल्या, ग्लासेस आणि सोड्याच्या चार बाटल्या यांसह स्वारी बाहेर आली! आमच्या मजलशीस सुरवात झाली. हंसत, खिदळत, कोट्या करीत दोनदा फैरी झडल्या. आम्हीं 'मजेंत' आलों.

पण मध्येंच आमच्या रंगाचा भंग झाला. घाबऱ्या घाबऱ्या एक पोलीस इमामअल्लीला सलाम करीत येऊन सांगू लागला. 'साहेब, मारवाडी मोहल्यांत एका मारवाड्याचा खून झाला आहे. ताबडतोब तिकडे जाण्याची मोठ्या साहेबांची आपणास ऑर्डर आहे.' सरकारी नोकरी, ताबेदारी, गुलामगिरी. इमामअल्ली नाइलाजानें उठले. त्यांनीं कपडे चढवले. दिलगिरीचे उद्गार पुनः पुनः काढीत ते आम्हांला म्हणाले, 'मला गेलें पाहिजे. नाइलाज आहे. नोकरी म्हणजे सुळावरची पोळी. आपला सर्वांचा विरस झाला. मी शक्य तों लौकर येण्याचा प्रयत्न करतों. पण माझी वाट पाहूं नका. आपण खुशाल जेवून घ्या. आमची मंडळी तुमच्या सरबराईत कांहीं कमतरता पडूं देणार नाहींत.' इमामअल्ली आम्हाला सांगून थांबले नाहींत, तर आंत जाऊन आपल्या मंडळीना त्यांनीं तसेंच सांगितलें. घाईघाईनें मोठ्या नाइलाजानें व नाखुषीनें ते कामगिरीवर चालते झाले. आम्हांला वरील प्रकारामुळें थोडेसें चमत्कारिक वाटलेंच. पण त्याला कोणाचाच इलाज नव्हता.

इमामअल्लीच्या बायकोनें आम्हांला जेवायला वाढलें. हवें नको असें ती मोकळ्या मनानें विचारीत होती. आग्रह करण्यांतही ती कोणतीच कसूर करीत नव्हती. आमचें जेवण झालें. आम्ही बैठकीच्या जागेंत बाहेर येऊन बसलों. पानसुपारी, सिगारेट वगैरेंची व्यवस्था करण्यासाठीं

ती बाहेर आली. त्याच वेळीं बोलतां बोलतां त्या बाईच्या तोंडून एक दोन मराठी शब्द उच्चारले गेले. त्या तशाही स्थितींत त्या शब्दाकडे माझें लक्ष वेधलें व मीं मोठ्या धाडसानें त्या बाईला त्या शब्दाबद्दल विचारिलें. त्यावरूनच आरंभीं दिलेलीं आमच्यातील प्रश्नोत्तरें झालीं.

\+ \+ \+

आमच्याशीं कांहीं न बोलतां ती बाई आंत गेली खरी. पण पुनः तिला काय वाटलें कोण जाणें! थोड्या वेळानें ती बाहेर आली व आमच्यापासून दूर भिंतीला टेंकून खालीं पहात राहिली. इमामअल्ली अजून आले नव्हते व लौकर येतील असें आम्हांपैकीं कोणासहि वाटत नव्हतें. ती आमच्याशीं बोलायलाच आली होती.

'माझी कर्मकथा आपल्याला ऐकायची आहे ना?' आमच्याकडे वर मान करून ओझरती पहात व खालच्या नाजुक ओंठावर आपले दांत किंचित् दाबीत तिनें म्हटलें.——

'ऐका बापडे—सांगते मी माझी करुण कहाणी! अशी सांगण्यासारखी वेळ या जन्मांत मला तरी कशी येणार? आणि काळजांत अष्टौप्रहर चाललेली खळबळ बाहेर ओकून थोडं तरी हायसं होण्याचा प्रसंग मला देव कुठून देणार?' असें ती म्हणाली आणि पुनः थोडा वेळ स्वस्थ राहिली. नंतर ती आपली हकीगत सांगूं लागली

'मला मराठी बोलता येतें यात काय विशेष आहे? मी दिसते तशी नाहीं. जातीनें मुसलमान नाहीं. जन्मानें हिंदु इतकेंच नव्हे तर अगदीं कुलीन ब्राह्मण कुळांत माझा जन्म झाला आहे.'

आम्ही तें ऐकून थक्क झालों. डोळे फाड फाडून तिच्याकडे पाहूं लागलों. त्या एकाच वाक्यानें आम्ही क्षणापूर्वी रंगांत दंग होतों, पण आमची नशा खाड्कन् उतरली. कुलीन ब्राह्मणाची मुलगी आणि मुसलमानाच्या घरीं? मुसलमानाची बायको? कल्पनाच सहन होईना! पण तें प्रत्यक्ष दृश्यच आमच्यासमोर उभेंच होतें.

'मी ब्राह्मणाची मुलगी आहें. अजून जिवंत असलेल्या एका ब्राह्मणाच्या नवऱ्याची बायको आहें–होतें. पण आतां काय त्याचें? आज मात्र अशा स्थितींत मी आहें आणि आतां जन्मभर या स्थितींतून माझी सुटका होणें शक्य नाहीं. माझ्याबद्दल तुम्हीं किती आश्चर्य कराल?'

ती पुनः थोडा वेळ थांबली. आम्हांला तिला काय प्रश्न करावा हेंच सुचेना.

'तुम्ही मला विचाराल, कीं अशा स्थितींत मी आपखुषीनें येऊन पडलें, तर का पडलें? आणि आपखुषीनें नसेल, तर मग अशी अवस्था कां झाली? पण काय सांगू तुम्हांला?' ती आपण होऊनच बोलूं लागली,

'माझं नशीबच खोटं. त्याला मी काय करूं? माझं माहेर अस्सल सनातनी. पक्कं वैदिकाचं घराणं. माझं सासर खरोखर सांगतें तुम्हांला, तसं कांहीं वाईट नव्हतं. खरोखरीच चांगलं होतं. माझे श्वशुर श्रीमंत, घरंदाज आणि सुशील होते. सासूही सालस होती. माझ्यावर आईप्रमाणेंच ती प्रेम करी. सासूसासरे जीवंत असेपर्यंत त्यानीं आणि त्यांच्याबरोबरच माझ्या नवऱ्यानेंही मला फार चांगलं वागवलं. सासर–माहेरच्या सुखांत मी इतकी लोळलें, कीं हजारजणींनीं माझ्या तसल्या सुखाचा हेवाच करावा. पण कपाळकरंटी मी. जन्माचं तें सुख माझ्या नशिबीं नव्हतं.

'सहा महिन्याच्या अंतरानें सासूसासरे परलोकवासी झाले. ऐन तरुण वयांत अफाट संपत्ति माझ्या नवऱ्याच्या हातीं आली. त्यांना संगत वाईट लागली. बाहेरचा नाद लागला. सासू–सासरे असतांनाच त्यांना तो नाद लागला होता. पण भीतीनें तोंपर्यंत तो चोरून मारून चाले, असें मग मला कळलें. कर्तेपण आल्यावर व शिरावर कोणाचा दाब नाहींसा झाल्यावर सर्व कारभार राजरोस चालू झाला. रोज दोन वेळां घरीं जेवणापुरतं यायचं, संसाराकडे लक्ष नाहीं. बाकी सारा वेळ रांडेकडे पडून रहायचे. पैसा अडका जिन्नसपान्नस, वस्त्रप्रावरण दररोज घरांतून त्या बाईच्या घरीं जाऊन पडूं लागलं.

' तरी मी डोळ्यावर कातडं ओढून गप्प बसत होते. कधीं एका शब्दानें बोललेंच तर खपायचं नाहीं. मला एखाद्या कुणब्याच्या बाईप्रमाणें गुरासारख मारायचं होई.

' माझ्या दुर्दैवानं लौकरच त्याहीपेक्षां उग्र स्वरूप धारण केलं. माझ्या नवऱ्यानें आपल्या रखेलीला उघडाउघड माझ्या उरावर घरींच ठेविली. पत्नी म्हणून त्यांची सेवाचाकरी मी करीत असेच. पण त्यांच्याच आज्ञेनें त्यांच्याबरोबर त्या कुलटेची सेवा करण्याचा प्रसंग माझ्यावर आला. त्यांच्या पानाबरोबर तिचं पान, त्यांच्या जेवणाबरोबर तिचं जेवण, त्यांच्या अथरुणाबरोबर तिचें आंथरुणपांघरुण करण्याची पाळी माझ्यावर येऊं लागली. तोंपर्यंत जीव मुठींत धरून माराच्या भीतीनं म्हणा, नाहीं तर आर्यललनेच्या सहज मनोधर्माप्रमाणें समजा, मी तेंहि करूं लागलं. '

' माझ्या नवऱ्याचं तेवढ्यानेंहि समाधान झालें नाहीं. त्या बाईनें जेवलेलें उष्टें काढावयाचें व तिचीं लुगडीं धुवायाची हीं कामें नवऱ्यानें मला सांगितलीं. त्यावेळीं मात्र माझ्या अपमानाचा कळस झाला असें मला वाटलें. मी तीं कामें करण्याचें स्पष्ट नाकारलें. त्याचा परिणाम, माझा जीव जाईपर्यंत मला नवऱ्याचा मार सोसण्यांत झाला. मी मनाशीं त्या क्षणींच निश्चय केला. आतां या घरीं पाणी प्यायलासुद्धां रहायचं नाहीं. हें घर माझं नव्हे. जिथं फुलं वेचलीं तिथं गोंवऱ्या वेंचायला कशाला थांबू ? ज्या नंदनवनांत वावरलें, त्याचं भयाण स्मशान झाल्यावर तिथं कशाला थाबू ?

' विचार केला. नवरा बाहेर गेला असं पाहिलं. ती हडळ माझ्या सत्तेच्या पलंगावर झोंपलेली बघितली. नवऱ्याच्या मालकीचा फुटका मणीही माझ्या अंगावर मी ठेवला नाहीं. आतां ' जिकडं पुढा तिकडं मुलुख थोडा ' असें म्हणून मी घराबाहेर पाऊल टाकलं.

' माहेरीं जाण्याचं माझ्या मनांतही आलं नाहीं ! गेलें असतें तरी त्याचा उपयोग नव्हता. नवऱ्यावर नाराज होऊन त्याला टाकून

आलेल्या मुलीला माहेरचीं माणसं घरांत सुखानं घेतील, असं माझं माहेर नव्हतं. मला या जगात इतउत्तर माहेरही नाहीं, सासरही नाहीं, असंच मी समजले. माझ्याजवळ कांहीं तरी ७।८ रुपये असतील. तशीच पायीं कल्याण स्टेशनवर आलें. स्टेशनमास्तरला कोठलं तरी तिकीट मागायचं म्हणून नगरचंच तिकिट मागितलं. गाडींत बसलें.

'नगरला आलें. ना ओळख ना पाळख. कुणाकडं जाणार ? नगरच्या स्टेशनावर माझ्यासारख्या अनोळखी, बावरलेल्या, नवख्या जीवाला आपल्या कळपांत ओढण्यात तरबेज असलेल्या—त्याकरितां जाळे टाकून बसलेल्या एका म्हाताऱ्या ख्रिश्चन बाईच्या जाळ्यांत मी अडकलें. मला तिनें आपल्या घरीं नेलें.

\+ + +

'मग काय, तिथं तुह्मी ख्रिस्ती धर्म स्वीकारलात?' ती बाई बोलती बंद झाल्यावर मी हलकाच प्रश्न टाकिला.

'नाहीं, त्या बाईचं वागणं व वागवणं मला मुळींच आवडलं नाहीं. तो धर्म स्वीकारावा हे माझ्या मनांतही आलं नाहीं. मी तिथूनही दोनच दिवसांत निसटलें. येवल्यास गेलें. तिथं रेशमाच्या कापडाचे पुष्कळ हातमाग आहेत. मला कुठल बळ आणि समयसूचकता आली कोण जाणें ! एका कारखान्यांत शिरलें. कारखानदारापुढें जाऊन उभी राहिले ! 'कारखान्यांत मला कांहीं काम द्या. मी गरीब आहें. आपण द्याल तें काम व द्याल तो पगार मी घेईन !' असें विनविलें ! कारखानदार जातीचा मुसलमान आणि भला गृहस्थ दिसला. त्यानें रोज चार आणे देईन. पहिल्यांदा तुम्हाला काम येणार नाहीं. तर कारखान्यांतील तरबेज बायकांकडून शिकविण्याची व्यवस्था करीन. तोंपर्यंत सोप्यांत सोपें असें रेशीम उकलण्याचें काम करा !' असें सांगितलें. मला काम मिळालें. मी कारखान्यांत काम करूं लागलें.

'अगदीं अल्प वेतनांत, पण मी सुखानें कालक्रमण करूं लागलें. स्वावलंबी झाल्याचा व शील आणि जात संभाळून वागतां येत आहे

याचा मला अभिमान वाटूं लागला. सत्तेचें घर सुटलें याचें दुःख हलकें हलकें कमी होऊं लागलें.

' त्याच कारखान्यांत एक तरुण मुसलमान अगदीं हलक्या जाग्यावर असलेला माझ्याशीं ओळख झाल्यावर अदबीनें आणि कळकळीने वागूं लागला. माझ्याशीं सहानुभूतीनें बोले, मर्यादेनें वागे, आडल्या पडल्या वेळीं माझ्या घरांतलें कोणतेंहि लहानमोठें काम विनामोबदला करी. कारखान्यांतून घरीं जाण्यास उशीर झाला, अंधार पडला तर घरापर्यंत तो मला सोबत करी. मला तो मुसलमान असतांनासुद्धां माझा पाठिराखा मोठा भाऊ वाटूं लागला. कारखान्यांत मी कोणाशींच बोलत नसे. सर्वांशीं तुसडेपणानें वागे. एक काय तें त्या मुसलमानाशींच बोले.

' हलके हलके आमच्या दोघांबद्दल कारखान्यांत व कारखान्याबाहेर निंदाजबजक कुजबुज होऊं लागली, पण आम्ही दोघे मनाने पाक असल्यामुळें मी तिकडे दुर्लक्ष केलें.

' अशाच स्थितींत येवल्याला माझीं दीड दोन वर्षें गेलीं. एक दिवस असा विलक्षण प्रसंग आला, कीं वेळ, काळ, स्थळ, यांनीं संधि साधली. मी ज्याला मोठा भाऊ मानीत होतें, त्याच मुसलमानानें माझा हात कामवासनेनें धरला. मी गोंधळलें, बावरलें, भ्यालें; पण वेळच वाईट आली. मी त्याचा हात त्याच वेळीं झिटकारला नाहीं. गप्प बसलें. तीच मूक संमति समजून त्या मुसलमानानें माझ्या अब्रूचा, शीलाचा, पातिव्रत्याचा बळी घेतला. '

हें ऐकून माझ्या अंगावर शहारे आले. ती बाई दोन्ही हातांनीं तोंड दाबून ढसढसां रडूं लागली.

' एकदां होऊं नये तें हातून झाल्यावर मग कुणाची लाज आणि कसली भीड ? मी उजळ माथ्यानें त्याच्याजवळ राहूं लागलें. त्यानें मला मुसलमानी धर्माची दीक्षा दिली. मी मशिदींत जाऊन त्याच्या-

बरोबर कलमा पढूं लागलें. अशा रीतीनें मी हिंदु धर्मांतून, माणुसकींतूनसुद्धां त्याच वेळीं कायमची उठलें.'

+ + +

'मी मुसलमान झालें. त्या गृहस्थाशीं निका लावून त्याच्याबरोबर जन्म काढावा असेंच मला वाटूं लागलें. पण तो निका लावून घेण्यास कबूल झाला नाहीं. त्याचें कारण मला कळेना. मी शोध करूं लागलें. सहा सात महिने तसेंच गेले. अखेर कळलें कीं हाही गृहस्थ माझ्या पहिल्या नवऱ्याप्रमाणेंच छंदी–फंदी–रंगी--ढंगी आहे. दारूबाज आहे, बाहेरख्याली आहे. म्हणूनच तो माझ्याशीं निका लावण्यास राजी नव्हता. तेव्हां तिथूनही माझें ओढाळ मन भडकलें.

'त्याच सुमारास तुमचे दोस्त इमामअल्ली कामाकारणें येवल्यास आले होते; त्यांच्या दृष्टीस मी पडलें. ओळख झाली. तिथून त्यांनीं मला आपल्याबरोबर येथें आणिलें. त्यावेळपासून मी येथें अशा स्थितींत नांदतें. हें सुख तरी कितपत आहे कोणास ठाऊक ! दुर्दैवाच्या मनांत मला आणखी टोले द्यायचे असतील तर घेतले पाहिजेत.'

त्या बाईची ही कहाणी संपली. बराच वेळ झाला होता. आह्मी तिचा निरोप घेतला; आणि तिथून बाहेर पडलों. निघेपर्यंत इमामअल्ली आलाच नाहीं. पण आह्माला त्याचें कांहींच वाटलें नाहीं.

× × ×

आह्मी घरीं परत येत असतांना कांहींच बोलत नव्हतों. परंतु दोघांच्याही मनावर त्या बाईच्या कर्मकाहाणीचा ताबा चांगलाच बसला होता. माझ्या मनांत पुन्हा पुन्हा एकच प्रश्न ठळकपणानें उभा रहात होता तो हा कीं मुसलमान लोक आम्हा हिंदूंच्या बायका आपल्या घरांत गोषावाली करितात, त्याला कारण मुसलमानांची जबर कामवासना का आमच्या हिंदु नवऱ्यांची आपल्या बायकांना वागविण्याची जुलमी, अमानुष, दुष्ट पद्धती ?

याचें उत्तर माझ्या मनाला निश्चित सापडलेंच नाहीं !

# १३

# ‘ येतील दिवस सौख्याचे ! ’

‘ कुठें गेली होतीस इतका वेळ ?–’

‘ कां ? चहा हवा आहे वाटतं ? हो, दिसतंच आहे. लिहिणंच अडलेलं दिसतंय ! करतें इतक्यांत अं !–’

‘ हें कांहीं माझ्या प्रश्नाचं उत्तर नव्हे–’

‘ कुठें जाणार दुसरीकडे ? बसलें होतें जरा त्या चंपूताईकडे; बोलावलंन् तिनं. बसावं लागलं–’

‘ पण बसून केलंस काय ? तुम्हां बायकांना एकमेकींच्या घरच्या गोष्टींशिवाय दुसरा बोलायला विषय कसला असतोय म्हणा ! चंपूताईला आज आपल्या आणखी काय गोष्टी ऐकवल्यात ? ’

‘ हो तर काय ! मला तेवढेंच काम आहे कीं नाहीं !– ’

‘ तूं नसशील सांगितल्या. तिच्या तर ऐकल्या असतील. ’

‘ होयच मुळीं. तुम्हां पुरुषांना काय होतंय कुचेष्टा करायला ? पण ज्याचं त्याला कळतं बरं का ! चंपूताई आपल्या काय काय एकेक

गोष्टी सांगत होती ! मला तर त्या ऐकून कसं रडायला यायला लागलं ! चंपूताईच्या तर डोळ्याचं पाणीच खळत नव्हतं. गरीब बिचारी चंपूताई ! तिनं कोणत्या जन्मीं कसलं पाप केलं होतं कोण जाणें ! '

असें सांगत असतां यावेळीं माझ्या बायकोच्या डोळ्यांत खरेंच पाणी आलें. तिनें आपल्या पदरानें डोळे पुसले. मध्यंतरीं आलेला चंदू माझ्याजवळ केव्हां आला हेंसुद्धां मला समजलें नाहीं.

चंपूताईच्या इतक्या कसल्या रडूं येण्यासारख्या गोष्टी तिनें ऐकल्या कोण जाणें ! सांगतांना तिच्या डोळ्याला पाणी आल्यानें मला मात्र त्या गोष्टी ऐकण्याची नकळत बुद्धि झाली. मी त्याबद्दल विचारणार तों तीच पुढें म्हणाली -

' केव्हां त्या बिचारीला सुखाचे दिवस येतील ते येवोत. आज तर तिचे हाल कुत्रा खात नाहीं. '

' असं का पण ? तिला मायेचं कुणी नाहींच कीं काय ? दैवाचा घाला तिच्यावर पडला आहे त्याला उपायच नाहीं. तर ती आतां आपल्या माहेरीं आहे ना ? मग—'

पण मला तिनें पुढें बोलूंहि दिलें नाहीं. ती माझ्यावरच उसळून म्हणाली, ' आहे; चंपूताई आपल्या माहेरीं आहे. आईबापाजवळ—भाऊभावजयीजवळ आहे. पण असून करायचंय काय ? बाप कसला मेला ? मांग. अन् भाऊ कसला तो—त्याच्यापेक्षां कसाब पुरवला. मेल्यांना दयामाया, काळीज, माणुसकी थोडीशी तरी आहे का ? लोक म्हणतात—नवरा मेल्यावर बायकांना सासर परकं होतं. सासू—सासरे विचारीत नाहींत. दीर थारा देत नाहींत. जावा पोतेऱ्याप्रमाणं वागवतात. त्यापेक्षां दगडापेक्षां वीट मऊ म्हणतात—तसं सासरपेक्षां माहेर चांगलं. पण चंपूताईला तिचं माहेर काय पण सुख देतंय ? मी म्हणतें, ती सासरींच राहिली असती तर माहेरच्यापेक्षां खचीत जास्त सुखांत असती—'

ती जरा थांबली. तिच्या सांगण्याकडे माझें लक्ष आहे हें तिनें पाहिलें. तेव्हां तिला सांगायला आणखी अवसान चढलें.

' बरं का ?' आपण होऊनच ती सांगूं लागली; ' चंपूताईला आणखी तिच्या लहान मुलाला तिचे वडील कनी तिच्या सासरहून तिच्या दिरांबरोबर भांडून–त्यांनाच हवं तसं बोलून घेऊन आले. तीं माणसं तशीं कांहीं वाईट नव्हतीं, कीं चंपूताईला सोडायला पण तयार नव्हतीं. पण त्यांचें हे कशाला ऐकतात ? त्या वेळीं चंपूताईचा यांना केवढा कळवळा आला ! तिला पोटाशीं घेऊन ते रडले किती ! त्यांना म्हणाले म्हणे, कीं ' जसा माझा एक मुलगा आहे, तसाच हा दुसरा समजेन. बैलाचीं शिंगं बैलाला कांहीं जड होत नाहींत. आपण आपल्या पोरीला घेऊन जाणार–!' अन् आले की घेऊन.' दीर मग काय करणार ? नेतात तर न्या म्हणणारच ! सज्जन बरं का ते ! चंपुताईना पाठवितांना तिच्या तनसडीबद्दलदेखील त्यांनीं मन दाखवलं नाहीं. तिच्या अंगावरचे दागिने, तिच्या नवऱ्याची सांचलेली जी काय पुंजी होती ती–चांगला दोन अडीच हजारांचा ऐवज असेल–ती सगळी निघतांना चंपुताईच्या वडिलांच्या स्वाधीन केली त्यांनीं.

' बरं मग ? बिघडलं काय त्यांत ?–' असें मी मध्येंच विचारण्याची फुरसद कीं लगेच माझी बायको चिडून म्हणाली–

' चंपूताईच आतां आणखी काय बिघडायचें राहिलं आहे ? जितकं बिघडायचं तितकं बिघडलंय. एकादा साताजन्मींचा वैरी जितकं बिघडूं देणार नाहीं तितकें चंपूताईच्या बापानं आपल्या स्वार्थासाठीं आणि भावानं आपल्या चैनीसाठीं चंपूताईच्या जन्माचं मातेरं करून बिघडवून ठेवलं आहे.'

' अग, झालं आहे काय पण ? केलं काय चंपुताईच्या भावानं आणखी बापानें ?'

' काय करायचं ठेवलं आहे तिचं त्यांनीं आणखी ? चंपुताईला घरीं आणलं. तिचें होतें नव्हतें तें आपल्या हातांत घेतलंच होतं अगोदर !'

बायकोला चंपुताईनं जें सांगितलं होतं तें जसेंच्या तसेंच ती मला सांगत होती, ' बरं का, चंपूताईला बापानें माहेरीं आणली तेव्हां काय तिचं कौतुक चाललं होतं! सगळेजण तिची आणखी तिच्या मुलाची किती जपणूक करीत असत! ' चंपूताई ! चंपूताई–! चंपूताई जेवलीस का ? चंपूताई खाल्लंस का ? चंपूताई आपल्या मुलाला दूध दिलंस का ? चंपूताई तुला झोप चांगली लागली होती का ? चंपूताईला हें हवं आहे; चंपूताईला तें आणलं पाहिजे,' असं आपलं पहिल्या पहिल्यानें केलं. पण असं न करायला काय झालें ? बगळयाचं सोंग घेऊन तिचा ऐवज घशांत घालायचा होता ना ? तेवढा गिळला. पचवला. ढेकर देऊन मोकळे झाले आहेत मेले आतां ! '

' म्हणजे ? म्हणतेस काय तूं ?—'

' म्हणायचं काय आणखी ? बापानं गोड गोड बोलून चंपूताईचा कांहीं पैसा आपल्या व्यापाराटापारांत गुंतवला आणखी जेवढा भावाच्या हातीं लागला तेवढा त्यानं घोड्यांच्या शर्यतींत उधळला ! मोकळे झाले. पैसा संपला तसं चंतुताईचं कौतुक संपलं. आतां तर चंपूताई आणखी तिचा मुलगा म्हाताऱ्याच्या आणि भावाच्या डोळ्यासमोर नकोशीं झालीं आहेत. चंपूताई चांगली नव्हती त्यांना; तिचं डबोलं चांगलं वाटत होतं. तेवढं मिळालं. त्याचा उपयोग झाला. आतां ती तरी घरांत कुणाला हवी आहे आणि तिच्या मुलाचं तरी अगत्य कुणाला आहे ? तिलाच लुबाडून आतां ती दृष्टीसमोर नको का ? तीच घरांत नको आहे का ? जेवली आहे कीं उपाशी आहे, मुलाच्या अंगांत सद्रा आहे कीं तो उघडा हिंडतो आहे, याची कुणी दादहि घ्यायची नाहीं का ?'...बोलतां बोलतां बायकोचे डोळे पुन्हां पाण्यानें भरले ! प्रत्येक वाक्य जिवाला पीळ पडून ती बोलत होती. बायका किती भावनाप्रधान असतात आणि दुसऱ्याची गोष्टसुद्धां आत्मौपम्य बुद्धीनें स्वतःच्या जिवाला लावून घेतात तरी ! तिचेंच कशाला ! बायकोच्या तोंडून चंपूताईची हकीकत

ऐकत असतांना मला स्वतःलासुद्धां कसेसेंच झालें. चंपूताईबद्दल माझ्या डोक्यांत हजार प्रकारच्या करुणकल्पना येऊं लागल्या.

' वाईटच बाई बायकांचा जन्म नाहीं तरी ! ' डोळे पुशीत कांहींशी आपल्याशींच विमनस्कपणें बायको पुटपुटत होती. ' पाठी येऊन छळीन. पोटीं येऊन छळीन. बाप होऊन छळीन. म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. मी म्हणतें, अशा दुष्ट लोकांची चांगली हजेरी कां कुणी घेत नाहींत ? त्यांच्या तोंडांत शेण कसं कुणी घालीत नाहींत ? नष्ट लोकांची कुणीतरी खोड मोडायला हवी. लंकेची पार्वती केल्यावर चंपूताईला ' तूं आमच्या घरीं राहूं नको ' म्हणताहेत. मग तिनें आपल्या मुलाला घेऊन जायचं कुठें ? अन् रहायचं कुणाच्या दारीं उभें ? सासर तिकडे तिला ठेवलं नाहीं. आतां माहेर पारखं झाल ! बाप भाऊ कसले मेले—खाटिक राक्षस ! '

' मला वाटतं चंपूताई कुठेंशी शिकायला, वगैरे जात असते ना ?—' आठवण होऊन मी विचारलें; हातांत कसलीं तरी पुस्तकें घेऊन जातां येतां कधीं तरी मला ती दिसे. तेवढ्यावरूनच मी म्हणालों, ' बिचारी शिकत असली तर बरं होईल ! त्याचा तिला पुढें मागें उपयोग होईल. आपलं आणि आपल्या मुलाचं कसं तरी पोट भरूं शकेल—शिकत असते ना कांहीं ती ? '

' हो शिकतेय ! पण आतां अशा वयांत ती शिकणार काय, अन् तिचं लक्ष लागायचं कसं ? कांहीं तरी शिवणं—टिपणं शिकत असते; पण तें तरी तिला धडपणें शिकूं दिलं पाहिजे ना ? तिला कांहीं तरी येईपर्यंत तरी तिला तिच्या बापानं संभाळली पाहिजे ना ?—'

' इतकी पाळी आणली आहे तिच्यावर ? मग मात्र शिकस्त आहे त्या लोकांच्या पुढें !

' मग सांगतें काय तर इकडे ! अस्से चंपूताईचे हाल चालले आहेत. ती अन्न खाते का अन्न तिला खातंय असें झालं आहे तिला ! बाप समंध, भाऊ खुशालचेंडू. आईचें कुणी चालूं देत नाहीं ! कीं कुणी

ऐकत नाहीं. भाऊच जर बेपर्वाईनें वागणार तर भावजय कशाला नणं-देला विचारायला बसली आहे ? ती आपल्या अन् आपल्या मुलाच्याच तोऱ्यांत ! म्हणतात नाहीं 'माल त्याचे हाल आणि चोरटा खुशाल' तशांतली गत त्या चंपुताईची! आणखी बरं का-' आणखीही कांहीं तरी ती सांगणार होती, पण इतक्यांत आमचा पुरुषोत्तम बाहेर कुठें खेळायला गेला होता तो आईची आठवण होऊन तिला शोधीत आला. 'आई! आई !' करीत तिला येऊन बिलगला. जवळ येतांच सहजच तिनेंहि त्याला उचलून कडेवर घेतलें. कडेवर बसल्यावरही त्याची कसली तरी कुरकूर चालू झालीच. मला-कां कोण जाणे-तें कांहीं आवडलें नाहीं. तशाहि मनःस्थितींत, 'काय रे ए हणगोबा, काय फाजीलपणा आहे रे तुझा ? आणि तूंहि पण त्याला फारच लाडावला आहेस बरं का ?' मी बोलून गेलों. पण त्याच वेळीं मजजवळ बसलेल्या चंदूनें केवढा व्याप केला होता ! मी लेखनास घेतलेल्या कागदांतले कागद त्यानें टरकावले होते. दौत उपडी केली होती. टाकाचें टोंक तोंडात घातलें होतें त्याकडे बायकोचें लक्ष गेलें. तिनें माझेंहि लक्ष वेधविलें आणि म्हटलें, 'पाहिलात कां आपल्या लाडक्या चंदूचा पराक्रम ? पण त्याला कशाला बोलायचं होईल ? तो आपला लाडका आहे ना ? पुरशावर प्रेम नाहीं तर त्यानं काहीं केलं तरी बोलणं होतंयच त्याला !'

तें ऐकून व चंदूचा पराक्रम पाहून मी पण खजील झाल्या-शिवाय राहिलों नाहीं. माझी त्रेधा बायकोच्या ध्यानीं आली. मी बोलण्यापूर्वीच ती मला म्हणाली-

'मी म्हणतें तें हेच ! आवडत्याला असें जवळ करायचें आणि नावडत्याला उगीचच दूर लोटायचं ! अस्सा प्रकार चंपूताईचा तिच्या घरीं चालला आहे. तिला सारेजण हिडीसफिडीस करीत असतात. तिच्या मुलाला कुणीहि धोपटीत असतात. पण तेंच-तिच्या भावाच्या मुलाचं कोण कोडकौतुक करतात! त्यानं दंगा केला तरी चालतो.

रडला तरी खपतं. अंगावर शेण आणून टाकलं तरी त्याला कुणी बोला-यचं नाहीं. मिशा ओढल्या तरी त्याचं कौतुकच चालतं. त्याचा बाप खुशाल रेसला जातो. पैसे उधळतो. नाटकं तमाशाला जातो. पण त्याला कुणी ब्र बोलत नाहीं. कसें बोलणार ? तो कर्ता–मिळवता ना ? तो तेवढा त्यांचा मुलगा. तो तेवढा त्यांचा नातू. अनू चंपूताई कांहीं त्यांची मुलगी नव्हे वाटतं ? तिचा मुलगा त्यांचा नातू नव्हे का ? पण ती नावडती. तिच्याजवळ आतां पैसा कुठं आहे ? ती कर्ती मिळवती कुठं आहे ? एकाला एक–एकाला एक असं कसं प्रत्यक्ष जन्म देणाऱ्या बापाला वागवतां येतं कुणास ठाऊक ! आणि म्हणे हे चांगले ! हे थोर !! हे शहाणे !!! आग लागेना त्यांच्या तसल्या शहाणपणाला आणि त्यांच्या त्या थोरपणाला म्हणतें मी ! ’

या माऱ्यानें मी थंडच पडलों. माझ्या बायकोनें माझ्यापुढें माझाच स्वच्छ आरसा धरला ! मी ओशाळल्या नजरेनें बायकोकडे पाहूं लागलों. ती चंपूताईच्या हकीकतीनें अगोदरच बेचैन झाली होती. त्यांतच माझी मुलाबाबत आगळीक दिसतांच माझ्यावरही तिनें ताशेरा झाडा-यला कमी केलें नाही. ‘ केव्हां बिचारीला सुखाचे दिवस दिसतील–ती मिळवती होऊन वेगळी होईल. मुलाला शिकवील. तो मोठा होईल. मिळवता होईल. मग तिला सुखाची आशा–हंऽ कुणी पाहिलंय अन् कुणी संवरलंय–’

असें अर्धवट मोठ्यानें पुटपुटतच ती तेथून आपल्या नादांत परतली. किती तरी वेळ बाहेरून आल्यापासून ती दारांत राहूनच बोलत होती. ती गेली आणि एक दीर्घ सुस्कारा सोडून मी आपल्यासमोर मांडलेल्या लेखनसाहित्याकडे दृष्टी वळविली. मनांत विचार आला–मी हातांत टाक घेतला–

ती परत आली आणि ‘ अगबाई, इकडे लिहायला बसायचं होतं ना ? चहा हवा का म्हणून विचारलं अन् मी तें विसरून आपली तशीच किती वेळ तरी बोलतच उभी राहिलें. आत्तां आणतें

अं स्टोव्हवर चहा करून. काय लिहायचं चाललंय ? गोष्ट का ? कशावर आहे आजची गोष्ट ? प्रीतिविवाह, मिश्रविवाह, घटस्फोट का पुनर्विवाह ? अशाचपैकीं कशावर तरी असेल झालं ! त्याशिवाय दुसरे विषय आहेत, कुठें सुचायला ?

असें म्हणत व पहात ती चहा करायला गेली.

खरेंच मी काय लिहिणार होतों ? ती म्हणाली त्याच कसल्या तरी विषयावर ? आणि चंपुताईची तिनें सांगितलेली करुणकथा काय कमी चिंतनीय आहे ? तिच्या आईबापाचे, भावाचे डोळे उघडण्याकरितां कांही लिहिलें तर ?—मनांत आलें, कागद पुढें ओढला. चंपुताईची करुणमूर्ति समोर आणली-' येतील दिवस सौख्याचे '—असें कागदावर लिहिलें. बायको चहा घेऊन आली. हातांत चहाचा पेला देत तिनें कागदाकडे पाहिलें आणि विचारलें, ' कुणाला येतील दिवस सौख्याचे हे ?–'

मी म्हटलें ' तुझ्या चंपुताईला ! तूं सांगितलेली तिच्याच हकीकतीची ही गोष्ट लिहितों आहे. तुझ्या यावेळच्या चहापेक्षां तूं सांगितलेली चंपुताईची कथाच मला जास्त उत्तेजक वाटली ! ' तिनें त्यावर माझ्याकडे फक्त हंसून पाहिलें. खरेंच, तिचें हास्य पाहून मला आनंद झाला !– माझी लेखणी सुरू झाली– लिहिली तीच ही गोष्ट.— **' येतील दिवस सौख्याचे ! '**

**यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम् ।**
**त्वया कृतं तु फलभुक् त्वमेव मधुसूदन ॥**

---